KÂVYASANGRAHA. 18.



# THE RÂMÂYANAS

OF

# MOROPANTA

( THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA. )

*"The Râmâyaṇa is the only poem which inspires our breasts with a love of goodness in the entire sense of the word."*

*R. T. H. GRIFFITHS, M. A*

## PART IV.

Containing 4 Râmâyanas.

( 39-42 )

*EDITED WITH*

**CRITICAL AND EXPLANATORY NOTES**

BY

VÂMANA DÂJÎ OKA,

HEAD MASTER, HIGH SCHOOL, RAIPORE

AND

S'IVARÂM TÂNBÂ DUBE, B. A.

FIRST ASSISTANT MASTER, NEILL CITY HIGH SCHOOL, NAGPUR.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGAR" PRESS,

**Bombay.**

1896.

2½ *Rupees.*

काव्यसंग्रह. १८.

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# रामायणें.

## भाग चवथा.

(३९–४२)

अष्टोत्तरशत केलीं जेणें रामायणें पृथप्रस तीं, ।
भारतभागवतादि ग्रंथ करी मान्य जे समग्र सतीं. ॥

हा

वामन दाजी ओक,
हेडमास्तर, हाय्स्कूल, रायपूर,
व
शिवराम तानबा दुबे, बी. ए.
फर्स्ट असिस्टन्ट मास्तर, नील सिटी हायस्कूल, नागपूर,

यांनीं अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन
आणि चार परिशिष्टें जोडून तयार केला;

तो

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१८९६.

किंमत २॥ रुपये.

महाराष्ट्र भाषेचें आणि कवितेचें

आस्थापूर्वक अध्ययन

करूं पाहणाऱ्या सज्जनांस

हा ग्रंथ

सप्रेम अर्पण करितों.

'काव्यसंग्रह'कार.

# अनुक्रमणिका.



एकंदर ग्रंथसंख्या ४३०४

# परिशिष्टें.

## सूचना.

हा भाग तयार करण्याच्या कामीं आम्हांस अनेक 'काव्यसंग्रह' हितैषी जनांनीं मनापासून साहाय्य केलें. रा० रा० दत्तात्रय घनश्याम सबनीस, सदाशिव मोरेश्वर भिडे, नागनाथ केशव गोडबोले, केशव विश्वास फणसे, मोरो गणेश लोंढे, रामचंद्र विष्णु सोमण, गोविंद विष्णु श्रीखंडे, प्रो० श्रीधर विष्णु परांजपे, बी० ए० व नागपुरास असणारे आमचे जुने विद्यालयीन वयस्य यांनीं अर्थनिर्णायक टीपांतील दोष, छापील प्रतींतील अशुद्धें, दुबार्थे पद्यांचा अर्थ इत्यादि प्रकरणीं मार्मिक लेख पाठवून साहाय्य केलें यास्तव या सकल सज्जनांचे फार फार आभार मानून व 'वारंवार अशीच मदत करावी' असें सविनय सुचवून हा लेख पुरा करितों.

'काव्यसंग्रह'कार.

# मोरोपंतकृत रामायणें.

## भाग चवथा.

---

## ३९. अनुष्टुब्रामायण.

(अनुष्टुभ् वृत्त.)

### बालकांड.

श्रीश ब्रह्मादि देवांहीं करुनि स्तुतिवंदन, ।
प्रार्थितां रावणवधा होय दिग्रथनंदन. ॥ १

कौसल्या प्रसवे रामा, कैकेयी भरता सती, ।
जी सुमित्रा लक्ष्मणाख्या शत्रुघ्नाव्हा सुतास ती. ॥ २

राम लक्ष्मण मागोनि ने, ज्या गाधिज नाम, हा, ।
ज्यांच्या नामें न संसारीं बाधे आधि जना महा. ॥ ३

अस्त्रें दे शत, अत्युग्रा ताटका पर मारवी, ।

---

१ या काव्याचें वृत्त 'अनुष्टुभ्' आहे म्हणून यास 'अनुष्टुब्रामायण' असें नांव दिलेलें आहे. या वृत्ताचें लक्षण श्रीक्षेमेंद्रकृत 'सुवृत्ततिलक' नामक ग्रंथांत आहे तें येथें देतों:—'पंचमं लघु सर्वेषु सप्तमं द्विचतुर्थयोः । गुरु षष्ठं च सर्वेषामेतच्छ्लोकस्य लक्षणम् ॥ १४ ॥ असंख्यो भेदसंसर्गादनुष्टुप्छन्दसां गणः । तत्र लक्ष्यानुसारेण श्रव्यतायाः प्रधानता ॥ १५ ॥' (सुवृत्ततिलक–प्रथम विन्यास), 'अनुष्टुप्छन्दसां भेदे कैश्चित्सामान्यलक्षणम् । यदुक्तं पंचमं कुर्याल्लघु षष्ठं तथा गुरु ॥४॥ तत्राप्यनियमो दृष्टः प्रबंधे महतामपि । तस्मादव्यभिचारेण श्रव्यतैव गरीयसी ॥ ५ ॥' (सुवृत्ततिलक–द्वितीय विन्यास). याचा भावार्थ:–अनुष्टुप्छंदाच्या प्रत्येक पादांत पांचवें अक्षर लघु आणि सहावें अक्षर गुरु असावें; द्वितीय आणि चतुर्थ पादांचें सातवें अक्षर नित्य लघु असावें, हें या छंदाचें सामान्य लक्षण आहे. याचे असंख्य भेद आहेत आणि मोठमोठ्यांच्या प्रबंधांत पूर्वोक्त सामान्य लक्षणाचें उल्लंघन केल्याचें आढळतें, तथापि प्रत्येक पादाचें पंचम अक्षर लघु आणि षष्ठ अक्षर गुरु असावें हा नियम अवश्य पाळला पाहिजे. श्रुतिसुखत्व अथवा सुश्रव्यत्व हेंच या छंदाचें प्रधानलक्षण होय. या काव्यांत कोणतीही चित्ररचना साधावयाची नसल्यामुळें हें पंतांच्या इतर रामायणांपेक्षां बरेंच सुरस, मनोहर आणि सुबोध उतरलें आहे. २. दशरथपुत्र. ३. आख्या=आव्हा=नाम. ४. मनोव्यथा. ५. ताटका ही सुकेतु नामक यक्षाची कन्या होती. ही मोठी बलवान् असून, जंभपुत्र सुंद याची स्त्री होती. हिला त्यापासून मारीच आणि सुबाहु, असे दोन पुत्र झाले. विश्वामित्रानें रामाकडून हिचा वध करविला. पुढें यज्ञकाळीं सुबाहु मरण पावून, रामबाणाच्या पिसाऱ्यानें मारीच उडून समुद्रांत जाऊन पडला तेव्हांपासून तो लंकेंत जाऊन राहिला. (भा० प्रा० ऐ० कोश.)

[1]स्ववंशजप्रभुजयें धरि [2]भा परमा रवी. ॥ ४
विघ्नकर्ते प्रभु पुढें टिकले न [3]खर क्षण, ।
श्रीलक्ष्मणाग्रजें केलें लीलेनें [4]मखरक्षण. ॥ ५
रामें लावुनि पायाच्या रजाच्या [5]पवना शिला ।
[6]अहल्या तारिली, श्रोत्यांगात्यांचा [7]भव नाशिला. ॥ ६
भंगी [8]भर्गधनुष्यातें, मनुष्यां तें न पाहवे, ।
वाहवे न सुरां दैत्यां, [9]गुणध्वनि न साहवे. ॥ ७
[10]ज्यां माता भूमि, तें कन्यारत्न देऊनि सादरें, ।
जामात जनकें केला, त्यजिलीच [11]रसा [12]दरें. ॥ ८
सीता देउनि रामा, दे लक्ष्मणा मग ऊर्मिळा, ।
दिल्या भरतशत्रुघ्ना बंधुच्या [13]दोन [14]दुर्मिळा. ॥ ९
भजोनि [15]परधर्मा [16]जी उग्रा भार्गवराम ती ।
श्रीरामाच्या पुण्यतेजें लावी [17]मार्गवरा मती. ॥ १०
[18]म्लानि कंटक हे दोष सारसा केतका, [19]पुरा ।
त्या न, तें स्वयशें हांसे [20]सार साकेत कापुरा. ॥ ११

---

१. स्ववंशांत उत्पन्न झालेल्या प्रभूच्या (रामाच्या) जयामुळें. २. शोभा, कांति. ३. खरप्रमुख चवदा हजार राक्षस. ४. यज्ञसंरक्षण. ५. पवन=वायु. ६. अहल्या ही गौतममुनीची पत्नी. हिचें इंद्रानें धर्षण केलें, म्हणून तिला 'तूं शिला होशील' असा शाप मुनीनें दिला. पुढें हिच्या प्रार्थनेवरून 'दाशरथी रामाच्या पदरज:कणानें तुझा उद्धार होईल' असा उ:शाप दिला. त्याप्रमाणें रामानें तिचा उद्धार केला—अशी कथा आहे. ७. संसार. ८. महादेवाच्या धनुष्यातें. ९. प्रत्यंचेचा आवाज. १०. ज्या कन्यारत्नाला भूमि माता आहे तें कन्यारत्न. ११. पृथ्वी. १२. भयें. १३. दोन कन्या. (मांडवी आणि श्रुतकीर्ति.) १४. दुर्लभ अशा. १५. पराच्या (दुसऱ्याच्या, विप्राहून अन्याच्या=क्षत्रियाच्या) धर्मा. १६. जी मति उग्रा झाली ती. १७. उत्तममार्गा. परधर्मा भजोनि जी मति उग्रा (तीव्रा—भयंकरा) [झाली] ती (मति) भार्गवराम (परशुराम) श्रीरामाच्या पुण्यतेजें उत्तम मार्गाला लावी. १८. म्लानि (निस्तेजपणा—कोमेजून जाणें) हा सारसा (कमळाला) दोष आहे, कंटक (कांटे) हा केतका (केवड्याला) दोष आहे. [परंतु] हे दोष त्या पुरा (अयोध्येला) न (नव्हते.) त्या अयोध्यानगरींत म्लानि (गरिबी) आणि कंटक (दुष्ट लोक) नव्हते—असा भाव. तें सार (श्रेष्ठ) साकेत (अयोध्यानगर) कापुरा स्वयशें हांसे=कापुरापेक्षां अयोध्यानगराचें यश अधिक शुभ्र होतें. १९. अयोध्येला. २०. हें 'संदष्टक' नामक यमकाचें उदाहरण आहे. जेव्हां द्वितीय पाद चतुर्थ पादीं आवृत्त होतो तेव्हां त्या यमकाला 'संदष्टक' असें म्हणतात. ['प्रत्येकं पश्चिमयोरावृत्त्या पादयोर्द्वितीयेन । यमके संजायेते गर्भः संदष्टकं चेति ॥' काव्यालंकार—अध्याय ३ श्लोक ७.] याप्रकारचीं यमकें पंतांच्या काव्यांत अनेक आहेत.

## अयोध्याकांड.

यौवराज्याभिषेक स्वज्येष्ठपुत्रीं करावया ।
राजा योजी, [1]गुरु म्हणे, 'हा विचार बरा [2]वैया.' ॥ १२

मागे स्ववर कैकेयी [3]मंथराभिन्नधी, 'रतो ।
[4]मनुवर्षे वनीं राम' जाहला खिन्न धीर तो. ॥ १३

पुत्रराज्यार्थ करितां प्रियेनें [5]अंतराय हा, ।
सत्यपुत्रप्रेमपाशीं म्हणे तो [6]संतराय 'हाँ !' ॥ १४

श्रीसत्यधर्म रक्षाया सोडिली सत्वर [8]क्षिती, ।
कीं [9]साधुपुत्र ताताचें सर्वस्वें सत्व रक्षिती. ॥ १५

---

१. वसिष्ठ. २. वयोमानानें पाहिलें असतां. ३. मंथरेनें भिन्न (बिघडविलेली आहे) धी (मति), जीची ती. मंथरेच्या उपदेशानें जिच्या मतींत बदल अथवा फितूर झाला ती. मंथरा ही विरोचनकन्या. रावणवधरूप देवकार्य साधण्यासाठीं देवांनीं या कुब्जावेषधारिणी अप्सरेला केकयराजाकडे पाठविलें होतें. केकयराज अश्वपति यानें दासी म्हणून हिला कैकयीपाशीं ठेविलें होतें. (सर्ग ७ श्लोक १-३० पहा.) ४. चवदा वर्षे. मनु=हा शब्द 'चवदा' याचा पर्याय आहे. कारण, मनु एका कल्पांत चौदा होतात. सहा मनु होऊन गेले. प्रस्तुतचा मनु सातवा आहे व पुढें सात मनु व्हावयाचे आहेत. प्रत्येक मनूच्या कालसत्तेस 'मन्वंतर' असें म्हणतात. ४३,२०,००० मानुष वर्षांनीं एक मन्वंतर होतें आणि अशा चौदा मन्वंतरांनीं ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. या चौदा मनूंचीं नांवें:—(१) स्वायंभुव, चैत्र शुद्ध ३ चंद्रवार, कृत्तिका नक्षत्र. (२) स्वारोचिष, चैत्र शु० १५ बुधवार, चित्रा नक्षत्र. (३) औत्तमि, ज्येष्ठ शु० १५ बुधवार, ज्येष्ठा नक्षत्र. (४) तामस, आषाढ शु० १० शुक्रवार, स्वाती नक्षत्र. (५) रैवत, आषाढ शु० १५ शुक्रवार, उत्तराषाढा. (६) चाक्षुष, श्रावण वद्य ८ रविवार, रोहिणी. [इतके मनु झाले.] (७) वैवस्वत, भाद्रपद शु० ३ शुक्रवार, हस्त. [हा चालू मनु आहे]. (८) सावर्णि, आश्विन शु० ९ रविवार, श्रवण. (९) दक्षसावर्णि, कार्तिक शु० १२ गुरुवार, उत्तराभाद्रपदा. (१०) ब्रह्मसावर्णि, कार्तिक शु० १५ सोमवार, कृत्तिका. (११) धर्मसावर्णि, पौष शु० ११ शनिवार, रोहिणी. (१२) रुद्रसावर्णि, माघ शु० ७ मंगळवार, अश्विनी. (१३) दैवसावर्णि (रौच्यसावर्णि) फाल्गुन शु० १५ गुरुवार, उत्तराफाल्गुनी. (१४) इंद्रसावर्णि, फाल्गुन व० ३० मंगळवार, रेवती. [हे शेवटचे सात मनु यापुढें यावयाचे आहेत.] ५. विघ्न. ६. साधुश्रेष्ठ. ७. हाय. ८. पृथ्वी, राज्य. ९. उत्तम पुत्र. हें 'अर्थांतरन्यास' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. विशेष गोष्ट सांगून तिला बळकटी आणण्यासाठीं म्हणजे तिचें समर्थन (दृढीकरण) करण्यासाठीं सामान्य गोष्ट सांगितली म्हणजे 'अर्थांतरन्यास' झाला. बापाचें वचन पाळण्यासाठीं रामानें राज्य सोडून दिलें तें ठीकच केलें अशी गोष्ट सांगून त्याबरून त्याच्या समर्थनासाठीं 'सत्पुत्र सर्व संपत्तीची हानि पत्करून बापाचें सत्व राखतात' अशी सामान्य गोष्ट (असा सामान्य नियम) सां-

सीतालक्ष्मणसंयुक्त श्रीराम प्रभु सद्रसें ।
गुरुतें वंदुनि निघे, वन मानुनि भद्रसें. ॥ १६

वदले वल्कलधरा रामा पाहोनि 'हा!' यती; ।
म्हणे अयोध्या निश्रीका शोका वाहोनि 'हाय!' ती. ॥ १७

राजाज्ञतें सुमंत्रें तो रथीं प्रार्थूनि वाहिला; ।
श्रृंगवेरीं प्रियसखें गुहकें साश्रु पाहिला. ॥ १८

जटा रचुनि दे आज्ञा सुमंत्रा 'परतें' असी. ।
त्यास होय प्रिय हित प्रभूक्त परं तें असी. ॥ १९

---

गितलीं आहे. केव्हां केव्हां आधीं सामान्य गोष्ट सांगून नंतर तिच्या समर्थनासाठीं विशेष गोष्ट सांगितली असते तेव्हां ही 'अर्थांतरन्यास' होतो. याचें लक्षण:—'सामान्यं वा विशेषो वा तदन्येन समर्थ्यते । यत्र सोऽर्थांतरन्यास: साधर्म्येणेतरेण वा ॥' [काव्यप्रदीप—दशम उल्लास—कारिका २३—काव्यमाला—पृ० ४१३.] या अलंकारांत 'जें झालें तें ठीक झालें, तें तसेंच व्हावयाचें किंवा व्हावें अथवा करावें, तसें करणें अथवा होणें हा सामान्य नियम आहे' असें प्रतिपादन केलेलें असतें. या अलंकाराचीं उदाहरणं पंतांच्या काव्यांत विपुल आहेत:—'दुर्बुद्धि आवडे मूढा, गाढवा जेंवि गाढवी.' [अनुष्टुभ्रामायण—श्लो० ४४.]

१. मोठ्या प्रेमानें. २. मंगलप्रद. ३. अयोध्या=अयोध्यावासीजन हें उपादानलक्षणेचें उदाहरण आहे. या उपादानलक्षणेची व्याख्या विश्वनाथकविराजानें 'साहित्यदर्पणां'त अशी केली आहे:—'मुख्यार्थस्येतराक्षेपो वाक्यार्थेऽन्वयसिद्धये । स्यादात्मनोऽप्युपादानादेषोपादानलक्षणा ॥' [परिच्छेद २।१४], 'स्वसिद्धये पराक्षेप: परार्थं स्वसमर्पणम् । उपादानं लक्षणं चेत्युक्ता शुद्धैव सा द्विधा ॥ ५ ॥' [काव्यप्रकाश—द्वितीय उल्लास]. भावार्थ:—ज्या लक्षणेनें वाक्यार्थाचा अन्वयबोध व्हावा म्हणून शब्दांच्या मुख्यार्थासह त्या मुख्यार्थानें सूचित केलेला इतर अर्थ याचें ग्रहण करतात तिला 'उपादानलक्षणा' म्हणतात. शक्यार्थाच्या सिद्धीसाठीं अशक्यार्थाचें उपस्थान करणें आणि अशक्यार्थाच्या सिद्धीसाठीं शक्यार्थाचें समर्पण (त्याग) करणें याला 'उपादान लक्षण' असें म्हणतात. यावरून जेव्हां स्वार्थाचा परित्याग न करतां पदार्थांची उपस्थिति होते तेव्हां ती उपादानलक्षणा होय. या लक्षणेच्या विवेचनांत 'श्वेतो धावति' म्हणजे 'पांढरा धांवतो' (पांढरा घोडा धांवतो), 'कुंता: प्रविशन्ति' म्हणजे 'भाले शिरतात' (भालेवाले शिपाई शिरतात), अशी उदाहरणें दिलीं आहेत. या लक्षणेस 'अजहत्स्वार्था लक्षणा' असेंही म्हणतात. मूळ लक्षणेचे भेद दोन:—शुद्धा आणि गौणी. शुद्धेचे भेद दोन:—उपादानलक्षणा व लक्षणलक्षणा; या प्रत्येकीचे दोन भेद:—सारोप व साध्यवसना; यावरून शुद्ध लक्षणेचे चार भेद झाले. गौणी लक्षणेचे दोन भेद:—सारोप व साध्यवसना. याप्रमाणें लक्षणा षड्विध आहे. ४. शोभारहित. ५. डोळ्यांत अश्रु (आसवें) आणून. ६. रामवचन. ७. परंतु. ८. खड्ग.

म्हणे सख्यासि, ‘गंगेच्या पारा सुतरि लागु हे’. ।
भवार्णवीं उतरिता सुखें उतरिला गुहें. ॥ २०

निववी श्रीभरद्वाजा, ज्या नसे अन्य कामना, ।
तरोनि तोष प्रभु दे सूर्याच्या कन्यकामना. ॥ २१

चित्रकूटीं मग वसे, गवसे आयता तया ।
तेथील जो संतसमाज, भेट दे काय तात या? ॥ २२

स्त्रीच्या बोलें दशरथें वरदेशा परा सुता ।
धाडूनि, वरिली जाया परदेशा परासुता. ॥ २३

गुरुनें मातुलकुलस्थित सानुज सत्वर ।
आणवीला भरत, जो गुणौघनटचत्वर. ॥ २४

ऐके वृत्त, म्हणे ज्ञाता तो, ‘जी मज्जननी, तिचा ।
आचारही ज्यांत नाहीं गंध सज्जननीतिचा.’ ॥ २५

सन्मनीं त्याग तोषाचा भरता हेतु लाजसी ।
ताता शक्रा नसे कोणा भरता हे तुला जसी. ॥ २६

भरतें त्यजिली माता लोभांधमति उद्धता, ।
कौसल्येला कळविली पुन्हाही आत्मशुद्धता. ॥ २७

तत्करें गुरु ताताची करवी बरवि क्रिया, ।
त्या राज्या ज्ञानादरें तो धरवी वर विक्रिया. ॥ २८

---

१. गंगा=गोदावरीनदी. २. उत्तम नौका. ३. संसारसमुद्रांत. ४. उतरविणारा, पार नेणारा, उतरून नेणारा. ५. यमुनाचित्ताला. ६. प्रयागास आगगाडीनें जातांना वाटेंत मणिकपुर नांवाचें रेल्वेस्टेशन लागतें. तेथून मणिकपुर—झांशी रेल्वेनें गेलें असतां चित्रकूट लागतो. चित्रकूट हें विंध्याचें शिखर आहे. येथें मंदाकिनी नांवाची नदी आहे. प्रयागापासून पायरस्त्यानें चित्रकूट तीस कोस आहे. येथें अलीकडे अमृतराव साहेब व त्यांचे चिरंजीव विनायकराव साहेब राहात असल्यामुळें चित्रकूट महाराष्ट्रांत पुष्कळ माहीत झाला आहे, व त्यामुळेंच येथें महाराष्ट्रीयांची वस्ती झाली होती. ७. साधुवृंद. ८. जणूं काय. ९. रामास. १०. वर देणाऱ्यांमध्यें ईश (श्रेष्ठ). ११. श्रेष्ठा. १२. जाण्यासाठीं. १३. स्वर्गलोका. १४. प्राणहीनता, असुहानि. १५. आजोळीं असलेला शत्रुघ्नासह भरत. (मातुल=मामा युधाजित.) १६. गुणसमुदायरूप जो नट त्याचें अंगण असा. १७. भरत. १८. ज्या आचारांत. १९. हें ‘संदष्टक’ नामक यमकाचें उदाहरण आहे. पुढें ४०व्या श्लोकांतही हेंच यमक आहे. २०. त्या भरताच्या हस्तें. २१. दशरथाची. २२. और्ध्वदेहिक संस्कार, प्रेतक्रिया. २३. तो वर (श्रेष्ठ भरत) ज्ञानादरें (ज्ञानाचा आदर करून, ज्ञानास श्रेष्ठ समजून) राज्या (भावाच्या राज्याला) विक्रिया (अन्यथाभाव=अराज्यत्व) धरवी=तो भरत ज्ञानी असल्यामुळें भावाचें राज्य हें विक्रिया आहे=अराज्य आहे—असें मानी—असा भाव.

त्यजी पुरी, प्रभुकडे जाय तो [1]साप्त, तापली ।
जी गुहाची मति तिला कळवी शुद्धि आपली. ॥ २९
जाणवी श्रीभरद्वाजा स्वभक्तिभर, तापहा ।
तो म्हणे, 'चित्रकूटीं जा, श्रीरामा, भरता! पहा.' ॥ ३०
[3]गृष्टिरीति प्रभु, भ्राता तोहि तर्णकरीति घे, ।
तातवृत्तविषें बंधु तप्तकर्ण करी तिघे. ॥ ३१
साश्रु श्रीराम ताताला प्रेमें दे पिंडतोय, ती ।
कथा गातां जो स्वयोगीं न पाहे [5]खिंड तो यती. ॥ ३२
'दे[6]ऊं गुरुवचें वर्षे चवदा विरहास हा, ।
[8]हे सुधेची पित्या हर्षे चव दावि, रहा, सहा.' ॥ ३३
भरतें वरिल्या राज्या रक्षाया पादुका नतें, ।
नंदिग्रामीं घातलें जें नाशी तापा [9]दुकान तें. ॥ ३४
प्रभुच्या दर्शनें पावे स्वाश्रमीं सुख अत्रि, तें. ।
वर्णिलें सर्व [10]शर्वादिदेवें केवळ न [11]त्रितें. ॥ ३५
अनसूया अलंकारी श्रीलाही [12]अंगरागदा, ।
ती मोडाया श्रमा [13]स्वाशी दे, जैसी [14]संगरा गदा. ॥ ३६

---

## अरण्यकांड.

वि[15]राधाच्या सुखविले तपस्वी शापवारणें, ।
वदले, 'साधु निववा, [16]सद्वैरी तापवा रणें.' ॥ ३७

---

१. स्वजनांसह. २. तापाचा नाश करणारा, त्रिविधतापहर्ता. ३. एक वेळा व्यालेल्या गाईची रीति. 'गृष्टिः सकृत्प्रसूता गौः' इति हलायुधः. ४. वासराची रीति. ५. खेंड, अंतर, व्यवधान. ६. ही रामोक्ति भरतास उद्देशून आहे. ७. हा (राम) [तुला—भरताला] चवदा वर्षे तातवचनपालनार्थ वियोगदुःख देवो. ८. हे (ही रामाची—माझी वनवासस्थिति) पित्या (बापाला—दशरथाला) सुधेची चव (अमृताची गोडी) दावि (दाखविते) [यास्तव, हे भरता! तूं माझ्याशिवाय अयोध्येंत एकटा] रहा (अस) [आणि विरहदुःख] सहा (सोस). ९. दुकान घालणें=दुकान रचणें, स्थापणें=तपश्चर्या करणें. १०. शंकरप्रमुख देवांनीं. ११. ऋषिविशेष त्याणें. १२. उटी देणारी. १३. सु+आशी=चांगला आशीर्वाद. १४. युद्धा. १५. विराध क्रौंचावह नामक वनांत राहणारा राक्षस. याला रामलक्ष्मणांनीं बाण घालून मारिलें. हा मूळचा तुंबुरु नामक गंधर्व असून वैश्रवणाच्या शापानें (अध्यात्मरामायणाप्रमाणें दुर्वासाच्या शापानें—सर्ग १ श्लोक ३८ पहा.) राक्षस झाला. रामबाणानें गतप्राण होतांच हा शापमुक्त झाला. १६. साधूंचे शत्रु.

तापसांतें नमी चित्तें त्या सदा राम हर्षितें[1], ।
जो[2] प्राशी सिंधुतें, वंदी त्या सदारा[3] महर्षितें. ॥ ३८
जटायु गृध्रेंद्र सखा ताताचा बहु मानिला ।
प्रभुनें, हा प्रभुप्रेमा प्रेमें कोणीं न वानिला ? ॥ ३९
गोदेतें[4] प्रभु सेवी, जी सर्वदा सांवरी नया, ।
प्रेमें मुक्ति म्हणे जीच्या सर्वदासां वरीन या. ॥ ४०
त्याचें[6] चित्त न वैकुंठा, साकेता[7] आठवी, रते ।
रमा रम्योटजीं, वेद करिती पाठ वीर ते. ॥ ४१

---

१. आनंदितें. २. अगस्त्यमुनि. हें पर्यायोक्तनामक अलंकाराचें उदाहरण आहे. जेथें कोणत्याही पदार्थाचें वर्णन, सरळ न करितां, रूपांतरानें अथवा पर्यायानें वळसा घेऊन केलें असतें तेथें **'पर्यायोक्त अलंकार'** होतो. 'रामाला नमस्कार असो' असें न म्हणतां 'सापत्नबंधुस्नुषाशापदग्धरक्षोगणाधिपांतकाला नमस्कार असो' असें वळसा घेऊन म्हटलें असतां पर्यायोक्त होतें. 'भवार्णवीं उतरिता' (श्लोक २० मागें पहा.) हें पर्यायोक्ताचेंच उदाहरण. या अलंकाराचें सुप्रसिद्ध उदाहरण म्हटलें तर 'अलिकुलवहनाच्या वाहना नेत होतें । शशिधरवहनानें लोटिलें मार्गपंथें ॥ नदिपतिरिपु त्याचा तात भंगोनि गेला । रविसुत महिसंगें फार दुःखीत झाला ॥' हा श्लोक होय. तसेंच 'स्वद्वंधूंचीं झालीं युगपत् शून्योत्सवें महा गेहें' [विराटपर्व–अ० १ गी० १७८], 'केलेंचि धन्य दर्शनदानें येऊनि कानना मातें; । अजि देवेश, निवावे बहु हे सेवूनि कान नामातें ॥' [वनपर्व–अध्याय १३ गीति ५५ पहा.] ३. सस्त्री. ४. ही गोदावरी प्रसिद्ध नाशिकाजवळची नव्हे. राजमहेंद्रीच्या पश्चिमेस ७५।१०० कोसांचे सुमारास जी गोदावरी आहे ती येथें घेतली पाहिजे. हल्लींचें सिंहलद्वीप हें जर लंका बेट असेल तर येथें प्रसिद्ध नाशिकाजवळच्या गोदावरीचें ग्रहण करणें सयुक्तिक होणार नाहीं. याचप्रमाणें गोदावरीच्या मुखाजवळ जें जनस्थान आहे तेंच रामाचें वसतिस्थान समजलें पाहिजे. हल्लींच्या प्रसिद्ध नाशिकाला जनस्थान म्हणतात ही भ्रांति आहे. हल्लींच्या नाशिकाजवळ पंचवटी म्हणून जें स्थान आहे तें रामाचें पंचवटी स्थान नसून गोदावरीच्या मुखाशीं जें पंचवटी आहे तें रामाचें निवासस्थान असावें असें अर्वाचीन शोधकांचें मत आहे. ५. जी सर्वकाळ नया (नीतीला) सांवरी=संरक्षी [आणि] जीच्या या सर्व दासां (भक्तां) वरीन [असें] मुक्ति प्रेमें म्हणे. ६. त्याचें (रामाचें) चित्त वैकुंठा [किंवा] साकेता (अयोध्येला) न आठवी, रमा (सीता) रम्योटजीं (सुंदर पर्णशाळेमध्यें) रते,[आणि] ते वीर (रामलक्ष्मण) वेद पाठ करिती. ७. अयोध्या. ही सप्त पुऱ्यांतील एक होय. सात पुरींचीं नांवें:–'अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका । पुरी द्वारवती चैव सप्तैता मोक्षदायकाः ॥.' 'अयोध्या ही काशीपासून तीस कोस रेलवेचे मार्गावर आहे. हा मार्ग औंध व बुंदेलखंड रेलवे कंपनीनें केला असून तेथून नजीकच लखनौ आहे. अयोध्येजवळ तीन कोसांवर फैजाबाद म्हणून एक मुसलमानी शहर आहे. अयोध्या हा सर्व गांव राजमंदिरांनीं भरला असून तेथें 'हनुमंतगढी' म्हणून एक मारुतीचें देऊळ आहे, तेथें बैरागी राहतात. या ठिका-

त्या श्रीपंचवटीमध्यें वसतां, रावणस्वसा ।
स्वसामर्थ्यें हरूं पाहे जो दुर्जर शिवस्वसा. ॥ ४२

दंडितां तीस, तद्भ्राता न धरी परवा खर, ।
प्रभुतेजें नुरे वज्र तेजस्वी, पर वाखर? ॥ ४३

सांगे शूर्पणखा, कामक्रोधलोभाग्नि वाढवी, ।
दुर्बुद्धि आवडे मूढा, गाढवा जेंवि गाढवी. ॥ ४४

मायामृग मन श्रीचें तो कार्तस्वरसा बळें ।
मोही, करूनि प्रभुचा शोकार्त स्वर, सावळें. ॥ ४५

प्रसादरत्न योग्या धिक् कवडी दे वरा सती, ।
संतापें ताप भोगाया दवडी देवरास ती. ॥ ४६

रावणें, एकली सीता पर्णशाळेंत राहिली, ।
पाहिली, व्योमगरथीं सर्वनाशार्थ वाहिली. ॥ ४७

---

णाजवळच रामचंद्राचें जन्मस्थान म्हणून आहे. परंतु त्याजवर आतां मुसलमानांनीं मशीद केली आहे; याजमुळें बैरागी व मुसलमान यांची नेहमी तक्रार चालत असते. तसेंच, तेथें दुसरें त्रेताराम म्हणून एक ठिकाण आहे. शिवाय स्वर्गद्वार या नांवाचा एक घांट असून तेथें शरयू म्हणून मोठी नदी आहे. येथें चोवीस अवतारांचें एक देऊळ आहे. हा मुलूख फार उत्तम आहे तरी येथें भिकारी फार आहेत. येथें सरवरिये ब्राह्मणांची मोठी वस्ती आहे. या गांवापासून दहा कोसांवर स्वामी नारायण यांचें 'छपय्या' म्हणून गांव असून तेथें एक मोठें मंदिर बांधलें आहे. अयोध्येस वानर पुष्कळ आहेत. (ऐतिहासिक गोष्टी, भाग २–पृ० ४-५).

१. पंचवटी नामक पर्णशाळा (दलशाला). पर्णशाळा या नांवाचा गांव गोदावरीच्या मुखाजवळ उत्तरतीरीं अद्याप उत्तर तैलंगणांत आहे, त्या गांवाला पंचवटी हें नांव असावें असें अर्वाचीन शोधकांचें मत आहे. २. शूर्पणखा. ३. जिरवायास कठिण असा. ४. शिवाला समर्पण केलेल्या पदार्थासारिखा. ५. तिचा बंधु खर. ६. शस्त्रविशेष. प्रभूच्या (रामाच्या) तेजानें (तेजापुढें) तेजस्वी असें वज्र देखील टिकाव धरीत नाहीं–उरत नाहीं, मग शत्रूच्या वाखराचें काय चालणार आहे?–असा भावार्थ दिसतो. ७. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ८. सुवर्णसा. तो कार्तस्वरसा (हिरण्मय) मायामृग (मारीच) प्रभूचा (रामाचा, रामासारखा) शोकार्त स्वर करूनि (शोकाचा शब्द करून) (सीतेचें) सांवळें (भोळें) मन बळें मोही–असा अन्वय. [कार्तस्वर=सोनें, या शब्दाचा विग्रह आढळतो:–'कृतस्वरे आकारविशेषे भवम्' अथवा 'कृताः पठिताः स्वरा येन । तस्मै देयम्' याचा भावार्थ कृतस्वर खाणींत उत्पन्न झालेलें अथवा ज्यानें स्वर (वेद) पाठ केले त्याला देण्यास योग्य जें तें=सोनें]. ९. साधुसंतापानें. १०. आकाशगामीरथांत=विमानांत.

जटायु[1] सोडवी सून, ऐकतां हाक, दापित्या ।
भंगी, धर्मरणीं वांचों न देता हा[1] कदापि त्या[2]. ॥ ४८

क्षतार्त[3] विरथ[4] क्रुद्ध गृध्रपक्षति[5] तोडुनी, ।
सोडुनि न्याय, साध्वीतें ने[6] कुधी हानि जोडुनी. ॥ ४९

त्रिलोकी[7] कीर्तिनें जीच्या गंगेनें तेंवि शोधिली, ।
ती अशोकवनीं[8] लंकावनीं नेउनि रोधिली[9]. ॥ ५०

---

१. जटायु. या गृध्राचे पूर्वज पुढील वंशावळीत दिले आहेत:—




२. रावणास. ३. जखमेने व्याकुळ. ४. रथहीन. ५. गृध्राची (जटायूची) पक्षति (पंखांचीं मूळे). ६. ने=नेता झाला. हे येथें भूतकालदर्शक रूप आहे. 'घे, ने, ये, हो, इत्यादि एकारांत व ओ-कारांत धातूंचीं कर्तरि विध्यर्थी द्वितीयपुरुषी एकवचनीं रूपें कविनेंत कधीं कधीं स्वार्थी तृतीयपुरुषीं एकवचनीं वर्तमानकाळीं व कधीं कधी भूतकाळी योजितात' असा नियम आहे. [पद्यरत्नावली, पृष्ठ ९० पहा.] याचीं उदाहरणें:—(१) **घे** इक्षु वारण जसा करपुष्करानें, (२) असें देखतां **ये** कृपा माधवातें, (३) हें हायन चवदावें **हो**, (४) न **दे** पाठि कोणीच राया बळी रे, (५) मागून **ये** दूरुनि चक्रपाणी, (६) तदुपरि हरिभेटी **ये** विदर्भेंद्र तेथें. ७. मर्त्यलोक, स्वर्गलोक आणि पाताळलोक. ८. अशोकवन या नांवाच्या उद्यानांत. [अशोकवनिकान्याय=रावणाने सीतेस अशोकवनांत नेऊन ठेविलें या प्रसिद्ध पुराणकथेवरून हा न्याय उत्पन्न झाला आहे. रावणानें सीतेला ठेवण्यासाठीं हेंच वन कां पसंत केलें याचें सयुक्तिक कारण सांगणें मोठें कठीण आहे. त्यानें सीतेला इतर कोठें ठेविलें असतें तरी चाललें असते, म्हणजे कोणतेंही स्थल सारखेंच कामीं पडलें असतें. यावरून कोणतेंही काम कोणाच्या हातून अनेक मार्गांनीं तडीस जाण्यासारखें असतां, त्यानें तें काम कोणा एका मार्गानें तडीस नेलें, तेव्हां तोच मार्ग त्यास अधिक आवडता होता असें नाहीं—अशा अर्थानें या न्यायाचा प्रयोग करतात.] ९. अडकवून ठेविली, प्रतिबंधांत ठेविली.

[1]दयिताविरहीं शोकें प्रभुचा [2]काय कोंदिला, ।
विलाप सर्व न जना करुणें आयकों दिला. ॥ ९१
वनीं विलाप प्रभुचा ज्याचिया श्रवणीं पडे, ।
रडे खग मृग व्याघ्र द्रुम वल्ली असें घडे. ॥ ९२
गृध्रेंद्र शोधितां सीता क्षतमूर्छित देखिला, ।
सानुजें श्रीवरें साक्षात् तातघातचि लेखिला. ॥ ९३
सांगे, 'दशाननें सीता नेली, केली दशा असी ।
[3]असीमोग्रें, हाणिला बा! [4]हाणि व्हाया यशा [5]असी'. ॥ ९४
मरणीं [6]सगुण ब्रह्म प्रेमें दे त्यासि मांडिला, ।
धन्यधन्यें [7]तन्मुखश्री [8]प्राशितां [9]काय सांडिला. ॥ ९५
दाहादि [10]तत्क्रिया केली, खगांला मांस वाढिलें, ।
प्रभुनें या यशें [11]भक्तस्वांतींचें [12]शल्य काढिलें. ॥ ९६
प्राप्त झाले [13]कबंधाला, जैसे चंद्रार्क राहुला, ।
समुद्ररिति मारूनी ते त्या योजनबाहुला. ॥ ९७
उपाय [14]कार्यसिद्धीचा सांगे [15]तो [16]कृतवंदन, ।
'सखा करावा सुग्रीव प्लवंग रविनंदन'. ॥ ९८
[17]मतंगमुनिची [18]शिर्ष्या ज्या न नाश बरीस ती ।

---

१. सीतावियोगानें. दयिता=लग्नाच्या प्रिय बायकोस 'देवि दयिते' अशी संबुद्धि करून हांक मारतात. ['रूढायां देवि दयिते पुमानाह प्रियां प्रति । आर्यपुत्र च जीवेश नाथ साप्याह वल्लभम् ॥' इति सागरोक्तेः'. रंगनाथकृत विक्रमोर्वशीयनाटकटीका–पृष्ठ ५५-५६ पहा.] २. देह. ३. अमर्याद उग्र अशा रावणानें. ४. यश होण्यासाठीं तरवार मार. ५. खड्ग. ६. मनुजदेहधारी राम. ७. राममुखकांति. ८. सादर पाहत असतां. ९. देह. १०. त्या जटायूची दहनादि क्रिया. ११. भक्ताच्या (जटायूच्या) मनांतील. १२. आपला शेवट कसा होईल आणि कोण करील इत्यादि शल्य. १३. कबंध हा मूळचा विश्वावसु नामक गंधर्व. स्थूलशिरा मुनीच्या शापानें यास राक्षसयोनि प्राप्त झाली. इंद्राच्या वरानें याला योजनप्रमाण लांब असे हात होते. सीतेचा शोध करीत रामलक्ष्मण दंडकारण्यांत फिरत असतां कबंधानें त्यांस धरिलें, तेव्हां रामानें याचे बाहु बाणानें तोडून यास गतप्राण केलें. याच्या प्रेतांतून एक दिव्य पुरुष बाहेर आला, त्यानें रामस्तवन करून सीताशुद्धीचा मार्ग रामाला सांगून गंधर्वलोकीं गमन केलें. याप्रमाणें कबंधाचा उद्धार झाला. १४. सीता शोधून काढण्याचा. १५. कबंध, शापमुक्त गंधर्व. १६. केलें वंदन (नमन) ज्यानें (रामाला) तो कबंध. १७. हा शबरीचा गुरु होता. ह्याचा आश्रम क्रौंचारण्याचे पूर्वेस होता. ह्यानेंच शबरीस रामाला फळें देण्यास सांगितलें, असें वर्णन अध्यात्मरामायणांत आहे. १८. ती मतंगमुनिची शिष्या (शबरी) ज्या बरीसें (ज्या चांगल्या गतीला) नाश न (नाश कधींही नाहीं) ती गति घे=त्या मोक्षपदवीला वरिती झाली.

गति घे, पूजुनि सरोजानना[1] शबरी[2] सती. ॥ ५९

रघ्वादि[3] पाहुनि ध्यानीं पंपास्थविरहाकुळा ।
वदले पावुनि स्वर्गी कंपा स्थविर[4] 'हा! कुळा!' ॥ ६०

भ्राता[5] उत्साह दे बोधें मानसा वडिलापरी, ।
रामें शोकें विखरिला मान सांवडिला[6] परी. ॥ ६१

---

## किष्किंधाकांड.

हनुमान् प्रभुला भेटे ज्या लग्नीं फार चारु[9] तें[10], ।
पुत्रसुस्वामिप्रियत्वें[11] धरिला हर्ष मारुतें. ॥ ६२

सखा सुकंठ प्रभुला रुचला, [12]परिसास हा ।
लोहगोलक[13] दृष्टांत सुचला, परिसा सहा[14]. ॥ ६३

---

१. कमलानना. (रामा.) २. या बाईचें नांव श्रमणा. ही शबर (भिल्ल) जातीची होती म्हणून शबरी हें जातिवाचक नाम (सामान्यनाम) हल्लीं विशेषनाम झालें आहे. आलिकडे नामदेव (शिंपी), चोखामेळा (महार) इत्यादि विशेषनामें जातिवाचक म्हणजे सामान्यनामें झालीं आहेत. त्याचे उलट शबरीचें उदाहरण आहे, त्याचा उपयोग विशेषनामाप्रमाणें केला आहे. ३. रघ्वादि स्थविर (दिलीपवंशांतील रघुप्रमुख वृद्ध राजे) पंपास्थविरहाकुळा (पंपासरोवरीं राहणाऱ्या सीतेच्या वियोगानें व्यथित अशा रामास) ध्यानीं पाहुनि, स्वर्गी कंपा पावुनि 'कुळा! हा!' (हाय हाय रे आमच्या वंशा!) [असें] वदले. 'कुळा! हा!' हा उद्गार संस्कृतभाषापद्धतीस अनुसरून आहे. ४. वृद्ध. ५. भ्राता (लक्ष्मण) बोधें वडिलापरी मानसा (रामाच्या मनाला) उत्साह दे. रामें शोकें (सीतावियोगविलापानें) मान (चित्तोन्नतभाव-मनाचा उन्नत स्वभाव) विखरिला (भ्रांत केला-मन भ्रांत केलें) परी (परंतु) सांवडिला (सांवरिला). सीताविरहविलापें रामानें स्वमनाचा मोठेपणा (उन्नत भाव) कांहीं काळ टाकून दिला, पण पुन: तो धरला. शोकानें भ्रमित झालेलें मन रामानें जाग्यावर (ताळ्यावर) आणिलें—असा भाव. ६. हें 'संदष्टक' यमकाचें उदाहरण आहे. याचें लक्षण मागें ११ व्या श्लोकावरील टीपेंत दिलें आहे. ७. जमा केला. ८. परंतु. ९. सुंदर, शुभ. १०. तें लग्न=तो समय. ११. या तृतीय पादांत पांचवें अक्षर लघु नाहीं आणि सहावें गुरु नाहीं म्हणून यांत छंदोभंग झाला आहे व अर्थाच्या संबंधानें पाहतां हा अपपाठ दिसतो. 'सुस्वामिप्रियपुत्रत्वें' असा मूळचा पाठ असावा असें दिसतें, आणि तसा पाठ असल्यास छंदोभंगाचा दोष कवीच्या पदरीं न येतां अर्थही सुरेख होतो. आपण उत्तम स्वामीचे आवडते पुत्र आहों, अशा भावानें मारुतीला मोठा आनंद झाला असा अर्थ या उत्तरार्धाचा आहे. १२. प्रभुरूप परिसाला. १३ सुग्रीवरूप लोखंडाचा गोळा. १४. ऐका आणि सहन करा.

[1]सखा न बहु मानावा अग्निच्या वात कां कणें? ।
बाणें गुण [2]द्विड्दारांचीं पिचाया हातकांकणें. ॥ ६४

श्रीत्यक्त नग सुग्रीवें सख्या प्रभुसि दाविले, ।
लाविले हृदयीं रामें दुःखी स्वसम [3]भाविले. ॥ ६५

हरि [4]स्त्री, [5]श्री; [6]जपे [7]बंधुप्राणाच्या हरणास [8]जो ।
प्रभूत्तम न कां तैशा मत्ताच्या मरणा [9]सजो? ॥ ६६

प्रभु एकीकडे राहे, सुग्रीवातें पुढें करी, ।
वाळी न गर्जना साहे, ये तो मत्त जसा [10]करी. ॥ ६७

एकेंचि [11]रोपें कोपें तो उरीं [12]दुर्मद ताडिला, ।
पाडिला [13]शिखरी वज्रें तसा क्रौर्येंचि नाडिला. ॥ ६८

[14]म्हणे सौमित्रि, 'घे [15]आर्यें श्री [16]ताराहि दिली, पहा ।
स्वरीति त्यजितां स्वर्गीहि म्हणेल दिलीप '[17]हां!' ॥ ६९

देवांचे भेटले कोटि कोटि [18]कीशर्क्ष [19]अंश या ।
वारिती सुगलाच्या ते राक्षसक्षयसंशया. ॥ ७०

आले श्री न पहातां जे वीर अन्यत्र धाडिले, ।
मासें सरोन, चिंतेंत [20]यमाशागत पाडिले. ॥ ७१

सांगे जटायुचा भ्राता संपाती शोध सन्मती, ।
उत्साहशक्ति स्तवनें [21]वायुजीं होय जन्मती. ॥ ७२

---

१. अग्निच्या कणें (स्फुलिंगानें) वात सखा बहु कां न मानावा? अर्थात् मानावाच; कारण अग्निकणाचा वायु हा स्वाभाविक मित्र होय. द्विड्दारांचीं हातकांकणें पिचाया (हातांतील कांकणें पिचविण्यासाठीं) शत्रुस्त्रियांला वैधव्य आणण्यासाठीं बाणें (शरानें) गुण (धनुष्याची दोरी) [आपला सखा कां न मानावा?]. २. शत्रुस्त्रियांचीं. ३. मानिले. ४. सुग्रीवपत्नी. (रुमा.) ५. राज्यश्री. ६. टपून असे. ७. सुग्रीवजीविताच्या. ८. वाली. ९. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. बोलणारा प्रश्न विचारतो, पण त्याला त्या प्रश्नाचें उत्तर माहीत असून त्जाविषयीं त्याचा निश्चय अगोदरच झाला असतो अशा स्थळीं हा अलंकार होतो. याला इंग्रजींत Erotesis असें म्हणतात. १०. हत्ती. ११. बाणानें. १२. दांडगा. १३. पर्वत. १४. लक्ष्मण सुग्रीवाला म्हणतो. १५. रामें. १६. तारा ही सुषेणाची कन्या. १७. हाय. १८. कीश+ऋक्ष=वानर+रीस, आस्वल. १९. हनूमान् इत्यादि वानर हे देवांचे अंशावतार होत. [बालकांड–सर्ग १७ श्लोक १०-१७ पहा.] २०. दक्षिणदिशेप्रत गेलेले. २१. वाँयुजीं (मारुतीमध्यें) स्तवनें (स्तुतिनें) उत्साह आणि शक्ति जन्मती (उत्पन्न झाली). भृग्वंगिरसवंशज ऋषिजनांनीं मारुतीला शाप दिला. (उत्तरकांड–सर्ग ३६ श्लोक ३२-३५.) हा मुनिजनांला फार

## सुंदरकांड.

करी चकित[1] मैनाका, ठकवी सुरसा[2]मुखा, ।
वधी छाया[3]ग्राहिणी ते देवदृष्टिस दे सुखा. ॥ ७३
लंघूनि दे गोष्पदत्व सिंधुतें धन्य तो कपी, ।
त[4]च्चरित्र स्वर्गिवृंद तें गमे स्तन्य तोक पी. ॥ ७४
पाहे व[5]नीं राक्षसींच्या वेढिली जानकी शतें, ।
सुखदुःखहि पावे तो उ[6]पमा ज्या न कीश तें. ॥ ७५
कामांध रावण प्रार्थी निशी[7]थीं श्री स[8]मुत्तर ।
जें दे तें ऐकुनि म्हणे, 'आपणा हो! स[9]मुत् तर.' ॥ ७६
दशास्य गेल्यावरि दे मुद्रा, मु[10]द्राशि होय ती, ।
चित्तीं कपि म्हणे, 'हर्षी सनकादिक हो यती.' ॥ ७७

---

उपद्रव देई म्हणून त्यांनीं याला शापिलें. 'ज्या बळाच्या आश्रयानें तूं आमच्या यज्ञक्रियांचा विध्वंस करतोस त्या बळाला तूं आमच्या शापेंकरून बहुत दिवसपर्यंत जाणणार नाहींस, तुला तुझ्या बळाचें ज्ञान पुष्कळ दिवस व्हावयाचें नाहीं, पण तुला कोणी त्या बळाची आठवण करून दिली तर तें प्रकट होऊन वृद्धिंगत होईल' असा मारुतीला शाप होता. जांबवंतानें मारुतीला त्याच्या बळाचें स्मरण करून दिलें तेव्हां तें प्रकाशित झालें.

१. घाबरा, भयग्रस्त. २. सुरसा. मारुतीचें बल आणि चातुर्य पाहण्यासाठीं देवांनीं धाडलेली राक्षसीरूपधारी स्त्री. सीतेचा शोध लावण्यासाठीं मारुती लंकेस जात असतां ही त्यास आड येऊन म्हणाली कीं, 'माझ्या मुखांत प्रवेश कर.' त्यानें उत्तर दिलें कीं, 'सीताशुद्धि करून आल्यावर मी तसें करीन.' हें तिला रुचलें नाहीं. तेव्हां तिनें आपलें मुख दहा योजनें पसरिलें हें पाहून तोही तिच्या दुप्पट मोठा झाला. याप्रमाणें चढाओढीनें तीं दोघेंही दहा दहा योजनें वाढत चाललीं. अखेरीस मारुति अंगुष्ठप्रमाण लहान होऊन, तिच्या मुखांत प्रवेश करून बाहेर आला. हें पाहून ती संतुष्ट झाली, व 'तुझा जय होईल, तूं रामकार्य साधशील,' असा आशीर्वाद देऊन स्वर्गी निघून गेली. ३. सिंहिका. ही हिरण्यकशिपूची भगिनी आणि विप्रचित्ती नामक राक्षसाची स्त्री. मारुति सीताशुद्धीसाठीं लंकेस जात असतां समुद्राच्या पाण्यावर पडलेली त्याची छाया धरून हिनें त्याची गति कुंठित केली. तेव्हां तो हिच्या मुखांत पडला, परंतु त्यानें स्वबलानें तिला मारून पुढें गमन केलें. ४. तें स्वर्गिवृंद तोक (देवमंडलरूप बाल) तच्चरित्र स्तन्य (त्या मारुतीचें चरितरूप दुग्ध) पी (प्राशी) [असें] गमे—असा अन्वय. ५. अशोकवनांतील उद्यानांत. ६. उपमा ज्या न= निरुपम, अनुपम. ७. मध्यरात्रीच्या ठायीं. ८. चांगलें उत्तर. ९. आनंदयुक्त. १०. आनंदाच्या राशि.

वन[1] भंगी[2], बळ वधी, चुरी युद्धांत अक्ष, तें ।
कर्म अत्यद्भुत करी, शरीरें कपि अक्षतें[3]. ॥ ७८

सांपडे मेघनादाच्या ब्रह्मास्त्रा, घेइ बांधुनी, ।
या[4] सत्कीर्तिप्रति म्हणो सखी दिव्या[5] न कां धुनी[6]? ॥ ७९

रावणाला करी बोध तो[7] धर्मन्याय जाणता, ।
पुच्छ पेटवितां वीर स्वीकारी रुद्रबाणता[8]. ॥ ८०

जाळी लंका, नमी श्रीतें, लंघी मारुति अर्णवा[9], ।
म्हणे शक्र सुरांतें, 'या आर्या[10] वर्णुनि वर्णवा.' ॥ ८१

आधीं वातात्मजें सेना, मग, कार्या जपोनि, धी, ।
श्रीरामाची निववली, गाति कीर्ति तपोनिधी. ॥ ८२

श्रीचूडामणि संदेश[11] समाचार निवेदिला[12], ।
तेव्हां शिव म्हणे, 'मोठा मला हर्ष शिवे[13]! दिला.' ॥ ८३

---

## युद्धकांड.

आलिंगिला सुप्रसन्नें श्रीरामें वायुनंदन, ।
करिती यत्पदरजा[14] ब्रह्मादि सुर वंदन. ॥ ८४

'दिले या उपकारा स्वप्राण, होइन मी ऋणी ।
करिसील पुढें त्याचा' ऐसें बोले महाघृणी[15] ॥ ८५

पुसोनि मार्गदुर्गारिविचारबळ[16] आपण ।

---

१. अशोकवन. [उपादानलक्षणेनें अशोकवनस्थ वृक्षादिकांचें ग्रहण केलें पाहिजे.] २. येथें कर्ता एक असून त्याचा अनेक क्रियांशीं संबंध आहे म्हणून हा 'कारकदीपक' अलंकार झाला. पुढें श्लोक ८१ पूर्वार्धं यांत 'कारकदीपक' आहे. ३. सुदृढ, क्षतहीनें. ४. या सत्कीर्तिप्रति (या चांगल्या कीर्तीला) दिव्या धुनी (आकाशगंगा) [आपली] सखी (विमलत्वगुणानें मैत्रीण) कां न म्हणो? अर्थात् म्हणो. ५. देवांची. ६. नदी (गंगा). ७. मारुति. ८. शिवाच्या बाणाचा स्वभाव. त्रिपुरदहनप्रसंगीं शिवाच्या बाणांनीं आकांत केला हा कथासंदर्भ आहे. ९. समुद्रा. १०. या मारुतीला वर्णून (स्तवून) तुम्ही आपणाला [अन्याकडून] वर्णवा. स्तवनीयाची स्तुति करणारा स्वतः इतरांच्या स्तुतीस पात्र होतो असा सामान्य नियम आहे, त्यास अनुसरून हें वर्णन आहे. ११. निरोप. १२. दिला, कळविला. १३. हे पार्वति. १४. रामचरणधूलीला. १५. परमकारुणिक. [घृणा=करुणा. 'कारुण्यं करुणा घृणा' इत्यमरः.] १६. मार्ग (रस्ते) दुर्ग (किल्ले) अरिविचार (शत्रूचा मंत्र–मनोरथ–बेत) (आणि) बळ (सैन्य) पुसोनि आपण 'द्वेषी (शत्रु-रावण) मारुनि प्रिया (सीता) सोडवीन' हा असा पण (प्रतिज्ञा) करी.

करी 'प्रिया सोडवीन, द्वेषी मारुनि' हा पण. ॥ ८६
सुमुहूर्तीं निघे सेनासिंधु घेउनि सानुज[1], ।
सागराच्या तटा पावे प्रभुवर्य सभानुज[2]. ॥ ८७
कथितां हित धिक्कारी, त्या[3] मत्ता बंधुस त्यजी, ।
बिभीषण म्हणे, 'पापी हे तुम्हीं अंधु[4] सत्य जी[5].' ॥ ८८
महासुखी महोदारा रामा शरण ये, रते[6]. ।
असे न दाते वंदूनि घेती चरण येर[7] ते. ॥ ८९
जों चंद्र सूर्य स्वकथा तों लंकाराज्य[8] ओपिलें, ।
राम [9]माता जीं जगें हीं पोषी देऊनि [10]ओ पिलें. ॥ ९०
सागरीं रचिला सेतु न सेनाचि तरावया, ।
संसारीं शुद्धिचा हेतु[11] [12]जीवमोह हरावया ॥ ९१
म्हणवी श्रीस दावूनि प्रभुचें शिरचाप 'हा[13]!' ।
'पाप हा' सरमा सांगे, 'सखि! सत्य न या पहा'. ॥ ९२
सुवेळशृंगीं चढुनि प्रेक्षितां दुर्ग देखिला, ।
उडोन सुगळें केला भग्न, द्वेपी न लेखिला. ॥ ९३
प्रभु बोधी [14]अंगदास्यें कीं [15]न हो [16]तामसा वध, ।
क्षीणायु रावण न्व्हे करितां साम सावध. ॥ ९४
दूता[17]तेंहि वधूं पाहे, काय[18] सत्संग रासभा[19]? ।
साधूंची परि निःसीमा वर्णी तत्[20]संगरा सभा. ॥ ९५
[21]महामायें मेघनादें [22]सानुजप्रभुविग्रह ।
बांधिला नागपाशाहीं केला दारुण विग्रहे[23]. ॥ ९६

---

१. सलक्ष्मण. २. सूर्यपुत्रा(सुग्रीवा)सहित. ३. त्या माजलेल्या रावणाला. ४. विहिरी. ५. अजी. ६. सुख पावे. ७. अन्य. ८. बिभीषणाला लंकाराज्य दिलें. ९. हें रूपक आहे. १०. ओ देणें=हांकेस उत्तर देणें, संकटीं धैर्य देऊन संरक्षण करणें. ११. ही अपन्हुति आहे. 'हें तोंड नव्हे, तर चंद्रच आहे' असें म्हटलें कीं अपन्हुति अलंकार होतो आणि 'हें तोंड जणुं काय चंद्र आहे, असें म्हटलें म्हणजे उत्प्रेक्षालंकार झाला. अपन्हुति अलंकारांत उत्प्रेक्षालंकारांची झांक सदां मारते. जेथें उपमेयावर उपमानाचा आरोप करण्यासाठीं उपमेयाच्या स्वरूपाचा अपलाप केला असतो तेथें हा अलंकार होतो. १२. प्राण्यांचा संसारभ्रम. १३. हाय. १४. अंगदाच्या आस्यें (मुखें). १५. न व्हावा. १६. तमोगुणान्विता रावणा. १७. अंगदातें. १८. काय उपयोगाचा आहे? १९. गाढवा. २०. त्याच्या युद्धा. २१. मोठ्या कपटी इंद्रजितानें. २२. बंधुसहवर्तमान जो राम त्याचा देह. ['विग्रहः कायविस्तारविभागे ना रणेऽस्त्रियाम्' इति मेदिनी.] २३. युद्ध.

त्यांतें पाहूनि रडली धरेची[1] तत्परा सुता, ।
सुरर्षिधीसही वाटे जी सत्या तत्परासुता[2]. ॥ ९
त्रिजटा[3] धैर्य दे, राहे स्वस्था मग पतिव्रता[4], ।
पळवी व्याळ[5] मोहांची[6] वारी खगप[7] तीव्रता. ॥ ९
कुंभकर्णासि उठवी प्रयासें अवलक्षण, ।
काळसाचि प्रभुपुढें दावी तो नवल क्षण. ॥ ९
करी धरूनि सुग्रीवा, देवांचें मन घाबरें, ।
तत्कर्णनासाहरणें[8] तेज ये अनघा[9] बरें. ॥ १
खवळे सर्व सेनेच्या सगळे कवळी लया, ।
तेव्हां राक्षसही भ्याले अत्युग्रा जवळील या. ॥ १
तद्बाहुपादशीर्षांचें करी श्रीराम कर्तन[10], ।
नभीं मुनीचे शोकाचें रावणी[11] होय नर्तन. ॥ १
ससैन्य सानुज रणीं शरांहीं बहु ताडिला, ।
अंतर्हितें[12] मेघनादें प्रभु पीडुनि पाडिला. ॥ १०
आंजनेयें उठविले ते आणुनि सदोषधी[13], ।
मायासीतावधें[14] मोही तो त्यावरि सदोषधी[15]. ॥ १०
लक्ष्मणें वधिला[16], युद्ध झालें दिवस तीन[17] तें, ।
प्रार्थिली तज्जया[18] तेव्हां शक्रें शिवसती[19] नतें. ॥ १०

---

१. पृथ्वीची. २. त्या रामलक्ष्मणाचें मृतत्व. ३. रामलक्ष्मण विसंज्ञ आहेत, मृत नाहींत, सांगून त्रिजटेनें चिंता दूर करून सीतेचें सांत्वन केलें. [सर्ग ४८.] ४. पति हेंच व्रत जिचें पतिव्रता. पतिव्रतेचें लक्षण:—'आर्तार्ते मुदिते हृष्टा प्रोषिते मलिना कृशा । मृते म्रियेत या सा स्त्री ज्ञेया पतिव्रता ॥.' ५. सर्प. ६. मूर्च्छेची. ७. गरुड. ८. त्या कुंभकर्णाच्या का आणि नाकाचें कर्तन केल्यामुळें. ९. निष्पापा सुग्रीवा. [सुगळानें कुंभकर्णाला कर्णनासावि केलें अशी कथा आहे. सर्ग ६७ श्लोक ८७-८९ पहा.] १०. खंडन. (सर्ग ६७ श्लोक १६७ प ११. इंद्रजित. १२. गुप्तें. १३. उत्तम औषधी. १४. सीतेची कृत्रिम प्रतिमा. मायेची इंद्रजितानें रणांत आणून सर्वांसमक्ष मारिली, तेव्हां ती वार्ता हनूमंतानें रामास कळविली. शोकाकुल होऊन मूर्च्छित पडला, तेव्हां लक्ष्मणानें बोध करून त्याचें सांत्वन केलें आणि त्यास द्धीवर आणिलें. [सर्ग ८३ श्लोक १३-१४ पहा.] १५. दोषयुक्त आहे धी (मति) ज्याची अस रावणि. १६. येथें 'इंद्रजित' या पदाचा अध्याहार जाणावा. १७. तीन अहोरात्र युद्ध करून क्ष्मणानें इंद्रजिताला मारिलें. दशमीच्या चतुर्थ प्रहरीं युद्धास आरंभ झाला व त्रयोदशीच्या प्रहरीं मेघनादाचा वध झाला. [सर्ग ९१ श्लोक १६ पहा.] १८. त्या लक्ष्मणाच्या जयार्थ. १९. प

पुत्रशोकार्त दिक्कंठ घे सीतामारणा असी, ।
अंतकाळीं स्मरे ती त्या प्रभुतें वारणाअसी. ॥ १०६

प्रार्थी उग्रा सतीहिंसाकामा सचिव, 'धारणीं ।
खड्गाच्या सद्यश असो, रामासचि वधा रणीं'. ॥ १०७

परते पर तेथूनि क्रोधशोकसमाकुळ, ।
पावोनि भस्म झालें ज्या दावानलसमा कुळ. ॥ १०८

वलाब्धि धाडी दिक्कंठ, प्रभुकुंभज आटवी, ।

---

१. खड्ग. २. गजेंद्रासारखी. गजेंद्र—ही कथा श्रीमद्भागवत—स्कंध ८ अध्याय २-४ यांत आहे. क्षीरसागरांत त्रिकूट नामक एक पर्वत होता. त्याच्या खालच्या तटावर वरुणाचें ऋतुमत् नामक उद्यान होतें, आणि त्यांत एक अत्यंत रमणीय सरोवर होते. तेथे उन्हानें संतप्त आणि तृषार्त असा एक गजेंद्र आपल्या कळपासह पाणी पिण्यासाठीं आला. तो सरोवरांत प्रवेश करून तेथील पाणी यथेच्छ पिऊन बाहेर येऊं लागला, तों त्याला एका सुसरानें पकडिलें. तेव्हां त्याने नक्राच्या हातून सुटण्याचा पुष्कळ यत्न केला, परंतु सुटेना. त्याची सुटका करण्यासाठी इतर गज, गजस्त्रिया आणि कलभ (गजशावक) यांनीही पुष्कळ प्रयत्न केला. पण त्यांचेही कांहीं चालेना. या उद्योगांत हजार वर्षे गेलीं; सर्व उपाय हरले. अखेरीस निरुपाय होऊन गजेंद्रानें हे प्राणसंकट टाळण्यासाठी परमेश्वराचा धांवा केला (अध्याय २ श्लोक २-२९), 'मी ग्राहापासून मुक्त होण्याची इच्छा करीत नाहीं, तर अज्ञानमोक्षाची इच्छा करतों' इत्यादि स्तोत्र ऐकून प्रसन्न होऊन श्रीभगवान् हरि प्रकट झाला. त्याला पाहतांच 'हे नारायणा! अखिलगुरो! भगवन्! नमस्ते' असे म्हणून गजेंद्रानें सोंडेनें एक कमळ उपटून भक्तिभावानें त्याच्या प्रीत्यर्थ वर आकाशांत फेकून दिलें. तेव्हां त्या पीडिताला पाहून विष्णूला दया आली. त्यानें एकदम गरुडावरून उतरून सग्राह गजेंद्राला सरोवराच्या बाहेर काढून, चक्रानें नक्राचे तोंड कापून त्यास सोडविलें. (अध्याय ३ श्लोक ३३ पहा.) ३. सीतावधेच्छु उग्रा (भयंकरा) रावणाला. ४. सुपार्श्व. सीतेला मारण्याचा निश्चय करून तरवार घेऊन रावण सीतेकडे गेला त्याचें निवारण सुपार्श्वाने केलें. [सर्ग ९२ श्लोक ५९-६३ पहा.] या दिवशी कृष्णपक्ष चतुर्दशी होती. ५. खड्गाच्या धारणी सद्यश असो=तरवार हातीं धरून तुम्हाला उत्तम यश मिळो. ६. ज्या दावानलसमा पावोनि कुळ (रावणकुळ) भस्म झाले. ७. यांत रूपकालंकार आहे. जेथें उपमान आणि उपमेय हीं एकच आहेत, त्यांचा अभेद आहे म्हणजे उपमेय हें उपमानच आहे, असें वर्णन केलेलें असतें तेथें रूपकालंकार होतो. याचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विपुल आहेत:—(१) दुष्यंतसद्मपद्मी ते स्त्री श्रीकण्वभानुशिष्यकरीं। नेली पुत्रसुगंधासह धर्मेनयांबुपूर्ण नगरसरीं ॥ (२) भ्रूधनु वोढुनि कज्जलविषदिग्ध कटाक्ष शर वरारोहे । सोडुनि, लुटीं तपोधन, सौभाग्यश्री तुझी भरारो हे ॥ (३) शिशु पाळण्यांत घालुनि हालवितां, निजवितां मुखें जो जो । धात्री म्हणति अईला अमृतरसचि तो निघे मुखें जो जो ॥ (४) धर्मकटक खांडववन भीष्मविजय विजय तोचि हरि गमला । शरदव रक्तज्वाला रूपक याहून होय बहु न मला ॥ (५) [illegible] श्वशुर, श्वश्रू स्मृति, ती स्वाचारपद्धतीच सती. ॥ (६) शत्रुप्रतापदावज्वालांनीं तो कुरंग होर-

ब्रह्मादिसर्वदेवर्षिस्तुता[1] सीता कळे वेरा[2], ।
निवाल्या स्पर्शतां ज्वाला जीच्या[3] शीता कळेवरा. ॥　　　१२७
भेटे दशरथ स्नेहें, विजयें फार हर्षला; ।
हुंगितां[4] शिरें पुत्राचें, श्रीचें, प्रेमाश्रु वर्षला. ॥　　　१२८
मृतें उठविलीं सैन्यें शक्रें पीयूषवृष्टिनें[5], ।
दृष्टितें प्रभुच्या लीलाकृतसंहृतसृष्टि ने. ॥　　　१२९
'पूजा[6] घ्यावी' असें प्रार्थी बिभीषण तया, 'कर ।
सुकंठाचीच ती माझी' ऐसें सांगे दयाकर. ॥　　　१३०
'भेटीव भरता क्षिप्र, प्रिय हें बहु, वाट ती ।
दुस्तरा[7], अवधि स्वल्प, स्वांताला[8] खंति वाटती.' ॥　　　१३१
लंकानाथ[9] म्हणे, 'देतों पुष्पक[10], प्रिय साधितों, ।
जों आहे अवधि, स्वामी! नसावें चित्त सोधि[11] तों'. ॥　　　१३२
सबळा[12] सुगळा पूजी, दे विमान[13] बसावया. ।
म्हणे तो, 'जाण हें मी श्री देवि! मानव साव या.' ॥　　　१३३
झालें जें भरतप्रेम[14] तें पुष्पकविमानसें, ।
मानिलें पारिजाताचें कीं पुष्प कविमानसें[15]. ॥　　　१३४
ससैन्य लंकाकिष्किंधानाथ[16] बैसविले, शतें ।
मुखांच्या शकते वर्णू न प्रेम कवि लेश तें. ॥　　　१३५
बसे विमानीं, सीतेला अंकीं घे राम सादर, ।
निवे तेथूनि देऊनि रावणा तामसा दरें[17]. ॥　　　१३६

---

१. विधिप्रमुख सकल देवमुनींनीं स्तविलेली. २. श्रेष्ठा. ३. जीच्या (ज्या सीतेच्या) शीता (थंड) कलेवरा (शरीरा) स्पर्शतां ज्वाला निवाल्या–असा अन्वय. ४. शिर हुंगणें हें प्रेमसूचक आहे. ५. अमृताचा वर्षाव करून. ६. स्नानांगरागधारणादि पूजन घेण्याविषयीं रामाची प्रार्थना बिभीषणानें केली. [सर्ग १२१ पहा.] ७. कठीण, दुर्गम, यास्तव लवकर न संपणारी. ८. अंतःकरणाला. ९. बिभीषण. १०. पुष्पक=हें कामगामी विमान वैश्रवणाला तपोबलानें प्राप्त झालें होतें, तें रावणानें बलात्कारानें त्याजपासून हरण केलें, पुढें रावणवधानंतर रामासमीप होतें. त्यानंतर रामानें वैश्रवणास परत दिलें. ११. स+आधि=सह+मनोव्यथा=सचिंत. १२. सैन्यासहित. १३. हें संदष्टक यमक होय. या यमकाचीं उदाहरणें प्राकृत काव्यांत बरींच आहेत. १४. भरताविषयीं जें रामाचें प्रेम तें पुष्पक विमानासारखें शीघ्रवाहक झालें. १५. कीं (किंवा) कविमानसें (पंडितमनानें) [तें भरतप्रेम] पारिजाताचें पुष्प [असें] मानिलें. १६. बिभीषण आणि सुग्रीव. १७. भय.

[1]रणक्षोणीस सेतूस श्री पाहे सादर क्षण, ।
स्तवी श्रितांचे करिते प्रभुचे पाद रक्षण. ॥ १३७

[2]संगराच्या वियोगाच्या [3]प्राशी प्रभुमुखें कथा, ।
व्यथा सुखप्रदा मानी [4]देवी पूर्णमनोरथा. ॥ १३८

वाहे विमानीं तारेतें, जें पंपा मन घाबरें ।
करी, जें प्रेम शबरी तें, ऐके अनघा बरें. ॥ १३९

कबंधोद्धार ऐकोनि वंदी गोदावरीस ती, ।
जटायूत्तरकार्यानें बहु मोदा वरी सती. ॥ १४०

[5]अगस्त्यशरभंगात्रि[6]सुतीक्ष्णाद्याश्रमा नमी, ।
वदे, 'झाल्यें भवत्पुण्यें पात्र शोका श्रमा न मी.' ॥ १४१

चित्रकूटाद्रि यमुनागंगांच्या पुण्यसंगमा, ।
भरद्वाजा नमी तो जो उद्धरी स्थि[7]रजंगमा. ॥ १४२

भरद्वाजाश्रमीं राहे, भरता प्रभु आठवी, ।
[8]आंजनेयासि आलों हें कळवायासि पाठवी. ॥ १४३

गुहातें भरतातें तो महाकुशळ भेटला. ।
बेट लागे समुद्रीं, कीं विझवी ताप पेटला. ॥ १४४

प्रयागीं [9]अब्द चवदा श्रीरामें सांग सारिले, ।
तारिलें भक्तबंधूतें तद्वियोगाधि वारिले. ॥ १४५

भरताचा निश्चय तो वर्णावा काय हो महा? ।
चुकतां अवधि, स्पष्ट करिता [10]कायहोम हा. ॥ १४६

आचार्य विप्र जननी सखे सचिव पौरवा, ।
वंदूनि भेटोनि करी त्यांच्या उचित गौरवा. ॥ १४७

---

१. युद्धभूमीला. सीतेसहित विमानांत बसून परत अयोध्येस येतांना रामानें सीतेला युद्धभूमि व पूर्वपरिचित स्थळें दाखविलीं असें वर्णन आहे. [सर्ग १२३ पहा.] २. युद्धाच्या. ३. सादर ऐके. प्राशन=सादर श्रवण. ४. सीता. ['देवी कृताभिषेकायामितरासु तु भट्टिनी' इत्यमरः.] ५. सर्ग १२३ श्लोक ४६-४७ पहा. अगस्त्य ऋषीचा आश्रम हा हल्लीं ज्याला **बस्तर** संस्थान म्हणून म्हणतात त्यांतील दक्षिणभागांत होता, व इतर ऋषींचे आश्रम **बस्तर** संस्थान, **बि**लासपुर जिल्हा व **रे**वा संस्थान यांत होते असें दिसतें. ६. चित्रकूटाजवळ एक टेंकडी आहे तेथें अत्र्याश्रम होता. या टेंकडीला अद्यापि 'अनुसूया पहाड' म्हणतात, व तेथें एक लहानसें खेडें आहे त्यालाही अनुसूयाच म्हणतात. यात्रेकरी लोक या पहाडाचें दर्शन घेतल्याशिवाय रहात नाहींत. ७. चराचरजगताला. ८. मारुतीस. ९. वर्षें. १०. शरीरहोम.

मोठा उत्सव भेटीचा, प्रवेशाचा तयाहुनी, ।
भारी राज्याभिषेकाचा, ऐसें वाखाणिती मुनी. ॥ १४८

पाहे रामाभिषेकातें, हर्षें गाय दिलीप या, ।
भू प्रजेष्ट करी, जाणों वर्षे गाय दिली पया. ॥ १४९

सर्वांहूनि मरुत्पुत्र कविसार संभाजन ।
पावे, करी सुप्रसादा रवि सारस भाजन. ॥ १५०

रामराज्यांत म्हणती, 'पारिजाता! अगा! रहा,' ।
कीं ताप पावोनि म्हणे न कोणीही 'अंगार हा.' ॥ १५१

---

१. हें **सार** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. जेथें एखाद्या पदार्थाचे गुण पायरीपायरीनें किंवा क्रमाक्रमानें अधिकाधिक वर्णिले असतात अथवा त्याचा उत्तरोत्तर उत्कर्ष वर्णिला असतो, तेथें सार नामक अलंकार होतो. जसें:—मध गोड आहे, मधाहून सुधा गोड, आणि तीहून काव्य गोड; तृण लघु, तृणाहून कापूस लघु, कापसाहून याचक लघु; पर्वत तर मोठाच आहे, त्याहून सागर थोर, सागराहून गगन थोर, त्याहून ब्रह्म थोर आणि ब्रह्माहून आशा थोर; राज्यांत स्वदेश श्रेष्ठ, स्वदेशांत स्वनगर श्रेष्ठ, नगरांत राजवाडा श्रेष्ठ, राजवाड्यांत शय्यामंदिर श्रेष्ठ, त्यांत पर्यंक श्रेष्ठ, त्यांत अंगनारत्न श्रेष्ठ. याचें लक्षण:—'उत्तरोत्तरमुत्कर्षो भवेत्सार: परावधि:' [काव्यप्रदीप—दशम उल्लास, कारिका ३४.] याला इंग्रजींत Climax असें म्हणतात. याचीं अन्य उदाहरणें:—ऐसें असतां, भ्राता, तोही स्वज्येष्ठ, त्यांतही राजा । तत्रापि धर्मकोविद बहु मानी ज्यासि शांतनव आजा ॥ पांडुसमातें त्यातें धर्मोज्ञा मारितोसि पामरसा । रोदन करील येणें विसरविला आठवूनि राम रसा ॥ [कर्णपर्व], पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनीं द्विजत्वहि दिलें भलें बहु अलभ्य जें कीं जनीं । यश:श्रवणकीर्तनीं रुचि दिली तरी हा वरा म्हणे अधिक ह्याच कीं अखिल याचकीं हा-वरा ॥ [केकावली], राया, कुलार्थ पुरुष, ग्रामार्थें कुलहि समस्त सोडावें; । ग्रामहि देशार्थ, मही आत्मार्थ बुधें भलेंचि जोडावें ॥ [सभापर्व], आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला, झाला तशांत जरि वृश्चिक दंश त्याला । झाली तयास तदनंतर भूतबाधा, चेष्टा वदूं मग किती कपिच्या अगाधा? ॥ [चौथें पुस्तक]. २. स्तवी. ३. प्रजाहित, लोककल्याण. ४. कविश्रेष्ठ. ५. उत्तम सत्कार, पूजन. ६. कमळ. ७. रवि सारस (कमळाला) सुप्रसादा भाजन (पात्र) करी—असा अन्वय. ८. या काव्यांत 'उत्तरकांडा'चा समावेश केलेला नाहीं, तेव्हां हें कदाचित् त्रुटित असावें असें वाटतें. पंतांचीं इतर लहान लहान रामायणें पाहिलीं असतां तीं देखील सप्तकांडकथात्मक आहेत यावरून हें प्रकरण अपूर्ण असावें असा संशय दृढ होतो. याच्या अखेरीस उपसंहार आहे त्यांत 'हे रामायणसत्कथा' असें विधान केलें आहे तेव्हां ही कथा पंतांनीं समग्र वर्णिली नसावी असें म्हणतां येत नाहीं. ९. 'जळो हें घर, नको हें घर, हाय हाय, धिग् असो या घराला' असा उद्गार रामराज्यांत कोणीही काढीत नाहीं.

### उपसंहार.

(अनुष्टुब्वृत्त.)

ज्या श्रीरामें निज[1]यशःपीयूषें विश्व तर्पिलें, ।
रा[2]मात्मजें म[3]यूरें हें त्या तच्चरित अर्पिलें. ॥
स[4]त्कीर्तिस्रग्धरा कन्या हे रामायणसत्कथा ।
मयूरें अर्पिली रामा वरा जाया मनोव्यथा. ॥

## ४०. मंत्रिरामायण.

### बालकांड.

(अनुष्टुब्वृत्त.)

श्री[5]श ब्रह्मादिदेवांहीं प्रार्थिला, दि[6]ग्रथात्मज ।
होय, चार धरी मूर्ती, जो रक्षी संकटीं गज. ॥ १
राम ज्येष्ठ महातेजा कौसल्योदरसंभव, ।
कैकेयीपुत्र भरत स्मर्त्यांचा नाशिता भ[7]व. ॥ २
म[8]हिला तिसरी तीचे दोघे सद्गुण नंद[9]न, ।
नामें लक्ष्मण शत्रुघ्न [10]शीलनिर्जितचंदन. ॥ ३
ज[11]गतीपति दे दोघे राम लक्ष्मण गाधिजा, ।
देती सुबाहु मारीच क्र[12]तु ध्वंसुनि आ[13]धि ज्यां[14]. ॥ ४

---

१. आपल्या यशोरूप अमृतानें. २. रामचंद्रपंतांच्या पुत्रानें. ३. मोरोपंतानें. ४. उत्तमकीर्तिरूप स्रग् (पुष्पमाला) धारिणी हे (ही) रामायणसत्कथारूप कन्या रामा वरा (रामरूप वराला) मनोव्यथा जाया (मानसिक पीडा जावी म्हणून) मयूरें (मोरोपंतानें) अर्पिली. यांत रूपकालंकार झाला आहे. ५. 'श्रीरामजयरामजयजयराम' हा त्रयोदशाक्षरात्मक मंत्र या रामायणाच्या प्रत्येक कांडांत साधिला आहे म्हणून याला 'मंत्रिरामायण' म्हणजे मंत्रयुक्त रामायण असें नांव दिलेलें आहे. हा मंत्र **बा**लकांडांत प्रत्येक पहिल्या चरणाच्या पहिल्या अक्षरांत, **अयो**ध्याकांडांत प्रत्येक गीतीच्या पहिल्या चरणाच्या दुसऱ्या अक्षरांत, याप्रमाणें क्रमानें शेवटच्या **उ**त्तरकांडांत सातव्या अक्षरांत साधिला आहे. अशीच मंत्रयोजना पंतांनीं **'बालमंत्ररामायण'** आणि **'मंत्ररामायण'** यांतही केली आहे. प्रत्येक कांडांत एक मंत्र असे एकंदर यांत सात मंत्र आहेत. ६. दशरथपुत्र. (राम.) ७. संसार. ८. भार्या. (सुमित्रा.) ९. पुत्र. १०. शीलानें (सुस्वभावानें) निर्जित (जिंकलें) चंदन (चंदनाचे सौरभशीतलत्वादिक गुण) ज्यांनीं असे. ११. राजा दशरथ. १२. यज्ञ. १३. चिंता. १४. ज्या गाधिजाला.

**य**ज्ञा[1]वनें **हृष्ट** केला गुरु [2]रक्षोबळक्षयें, ।
　**गौ**[3]तमस्त्रीसमुद्धारें पापांचीं नाशिलीं भयें. ॥ ५

[4]**रा**मकोदंड भंगूनी वरिली **जा**नकी सती, ।
　न केवळ तिचीच [5]क्ष्मादेवीची हर्षली मती. ॥ ६

[6]**म**हर्षि देववी कन्या तिघां **रा**मानुजांस त्या; ।
　तिघी दिल्या **मै**थिलानें ऊर्मिळादि महासत्या. ॥ ७

**ज**नका **दि**प्रथा **वि**श्वामित्रें संबंध जोडुनी, ।
　सिद्धाश्रमासि गमन केलें, तें [7]पुर सोडुनी. ॥ ८

**य**मसा [8]गुरुचापाच्या भंगें **भा**र्गव कोपला, ।
　**रा**मापुढें, रविपुढें दीप[9]सा, परि लोपला. ॥ ९

**ज**य पावोनि, **सा**केता बहु हर्षवि, **दि**प्रथ ।
　योग्य पुत्रस्नुषालाभें हर्षे, होय गतव्यथ. ॥ १०

**य**श गाती पौर तैसें स्वर्गीं राहून देवही, ।
　[10]साहुकारां उत्सव तो बांधूं पाहूं न दे वही. ॥ ११

**रा**जाज्ञेनें [11]मातुल ने सानुजा **भ**रता पुरा, ।
　जो [12]तापशमनें स्वच्छें यशें लाजवि कापुरा. ॥ १२

**म**नोरथाच्या साफल्यें सुख सर्वत्र दाटलें. ।
　धन्य **द**शरथा राजा सत्य [13]**सा**केत वाटलें. ॥ १३

---

## अयोध्याकांड.

(अनुष्टुब्वृत्त.)

स्व [14]**श्री** देतां **रा**मभद्रा, **कै**कयीच्या नये मना, ।
　राज्य पुत्रास घे, **रा**मा धाडी [15]चौदासमा वना. ॥ १४

---

१. अवनें=रक्षणें. २. राक्षससैन्यनाशें. ३. अहल्येचा उद्धार करुन रामानें पापी जनांस [तद्द्वारा पापहर्ता आणि तारणारा कोणी आहे असें दाखवून] भयमुक्त केलें. ४. परशुरामाजवळील शिवाचें चाप. ५. क्ष्मा=पृथ्वी. ६. विश्वामित्र. ७. मिथिलानगरी. ८. भार्गव गुरु शिव त्याच्या चापाच्या. ९. यांत उपमालंकार आहे. १०. सावकारां, वणिजां. ११. युधाजित्. १२. ताप शमविणाऱ्या (यशें). १३. अयोध्या. १४. स्वराज्यश्री. १५. चौदा वर्षे. समा=वर्षे.

सु **रा** नीं व्हावया कार्य **द**शास्यवध, काढिला,[1] ।
मरे शोकें, वियोगाचा साहे हा[2] न धक्का ढिला. ॥ १५

स[3] **म** न्यु मंत्री **भ**रता आणिती, साधु[4] तो तिला[5] ।
गांजी, म्हणे, 'विषरस स्वजनास्यांत[6] ओतिला.' ॥ १६

दे **जँ** लादि[7] पिल्या, होय आर्याच्या[8] विरहें श्रमी; ।
फिरवाया[9] **चि**त्रकूटीं[10] **रा**मपादांबुजें नमी. ॥ १७

प्रि **य** भ्राल्या सांत्वुनि दे पादुका, फिरवी[11] बळें, ।
मुनिही म्हणती, 'आज्ञापालनीं धर्म बा! वळे.[12]' ॥ १८

'न **रा** हेलचि मन्वब्द[13] सरतां, कायहोम[14] हा[15] ।
करीलचि, म्हणे, 'ताप ज्वलनीं[16] काय हो! महा?' ॥ १९

'म **म** यीं भेट देईन, कष्टी होऊं नको, रहा ।
स्वस्थ' **रा**म म्हणे; कीं [17]तो चंद्र, भक्त चकोर[18] हा[19]. ॥ २०

---

१. मंथरेच्या द्वारें कैकयीबुद्धिभेद करुन देवांनीं स्वकार्य संपादण्यासाठीं रामास अयोध्येंतून बाहेर काढिलें. २. हा दशरथ. ३. शोकयुक्त. ४. भरत. ५. मातेला. ६. स्वजनांच्या आस्यांत. (मुखांत.) ७. तिलजलांजलिदान. ८. रामाच्या. ९. रामाला परत आणण्यासाठीं. १०. मागें पृष्ठ ५ टीप ६ पहा. ११. परतवी, मागें धाडी. १२. येथें ब आणि व यांचें सावर्ण्य मानावें. पुढेंही वरी-वरी असे सवर्ण शब्द ३१ व्या श्लोकांत आले आहेत. कोणत्या अक्षरांस 'सवर्ण' समजावें हें पुढच्या श्लोकांत दर्शविलें आहे:—'रलयोर्डलयोस्तद्वज्जययोर्बवयोरपि । शसयोर्मनयोश्चांते सविसर्गाविसर्गयो: । सबिंदुकाबिंदुकयो: स्यादभेदेन कल्पनम् ।। [किरातार्जुनीय—सर्ग १५ श्लोक १० घंटापथ टीका], 'रलयोर्डलयोश्चैव शषयोर्बवयोस्तथा । वदंत्येषां च सावर्ण्यमलंकारविदो जना: ॥.' १३. मनु+अब्द=एकंदर चौदा मनु म्हणून मनु शब्दाचा अर्थ चतुर्दशसंख्याक+संवत्सर=चौदा वर्षं. १४. देहदहन. १५. भरत. १६. अग्नींत. १७. तो राम चंद्र होय आणि हा भरत त्या चंद्राचा भजक चकोर पक्षी होय. १८. चकोर=या शब्दाचा विग्रह असा आहे:—'चकति चंद्रामृतपायित्वाद्द्विषं प्रतिहंति, चक तृप्तौ प्रतिघाते च । चकति तृप्यते ज्योत्स्नया इति **चकोर:** ॥ इति स्वामी' [स्तुतिकुसुमांजलि—९ स्तोत्रम् श्लोक ४९ पृष्ठ १२३]. चकोर पक्षी हा चंद्रकिरणांवर उपजीवन करतो, असा प्राचीन कविसंकेत आहे. या कविसंकेतांविषयीं विश्वनाथकविराजकृत 'साहित्यदर्पणां'तील तीन पद्यें (सप्तमपरिच्छेद) उपयुक्त आहेत म्हणून येथें दिलीं आहेत. यांत बऱ्याच कविसमयांचा समावेश केला आहे:—'मालिन्यं व्योम्नि पापे यशसि धवलता वर्ण्यते हासकीर्त्यो रक्तौ च क्रोधरागौ सरिदुदधिगतं पंकजेंदीवरादि । तोयाधारेऽखिलेऽपि प्रसरति च मरालादिक: पक्षिसंघो ज्योत्स्ना पेया चकोरैर्जलधरसमये मानसं यांति हंसा: ॥,' 'पादाघातादशोकं विकसति बकुलं योषितामास्यमद्यैर्यूनामंगेषु हारा: स्फुटति च हृदयं विप्रयोगस्य तापै: । मौर्वी रोलम्बमाला धनुरथ विशिखा कौसुमा: पुष्पकेतोर्भिन्नं स्यादस्य बाणैर्युवजनहृदयं स्त्रीकटाक्षेण तद्वत् ॥,' 'अहन्यं-

सद **य** प्रभु दे गृध्रा पुत्रसा परमा गती, ।
मागती जी यती, शोधी **श्री**पदीं [1]परमाग ती. ॥ ३७

उद्ध **रा** या **क**बंधातें सांपडे भगवान् बळें, ।
**श**बरीतें [2]अमृत दे, बहु मानी तिचीं फळें. ॥ ३८

[3]दुग्धा **म** लयशा स्वामी [4]मुग्धाच्या रीतितें धरी ।
[5]पंपातीरीं; भक्तशोक संपाया 'हा!' म्हणे **ह**री. ॥ ३९

## किष्किधाकांड.

(अनुष्टुब्वृत्त.)

**मारुति** [6]**श्री** वरा भेटे, **सु**ग्रीवा मग भेटवी, ।
तो सखा होय, हाही त्या दहना वायु पेटवी. ॥ ४०

**रघुवी रा** अलंकार **सी**तेचे दाखवी [7]हरी, ।
[8]नूपुरें तींच **सौ**मित्री म्हणे, '**रा**म उरीं धरी.' ॥ ४१

त्या [9]**अर्य म** सुत प्रार्थी, 'सख्या! होऊं नको श्रमी.' ।
'हरिलि [10]स्त्री [11]अग्रजानें' हा म्हणे [12]हरिही नमी. ॥ ४२

**'तुझी तु ज** प्रिया यत्नें भेटवीनचि, [13]अत्यया ।
करूनि त्या **रा**वणाच्या, [14]मद्युक्ता जाण सत्य या.' ॥ ४३

---

१. परम+आग=मोठें+पाप=महापाप, महापराध. २. मोक्ष. ['अमृतं यज्ञशेषे स्यात् पीयूषे सलिले घृते । अयाचिते च मोक्षे च ना धन्वंतरिदेवयोः ॥' इति मेदिनी.] ३. दुधासारखें स्वच्छ आहे यश ज्याचें असा राम. ४. मूढजनाच्या. ५. पंपातीरीं रामानें मूढजनाप्रमाणें सीताविरहजन्य विलाप केला-अशी कथा आहे. ६. लक्ष्मीवराला (सीतापतीला.) ७. वानर. ८. पैंजण. नूपुर "म्हणजे चाळ, परंतु प्राचीनकाळचे चाळ सोन्याचे असत व ते सीतेसारख्या पुण्यशील स्त्रियाही वापरीत असत. हल्लींचे नूपुर पितळेचे असतात, व बहुतकरून कळावंतिणी वापरतात." याशिवाय पायांचे इतर दागिने आहेत त्यांचीं नांवें:—"पादचूड-रत्नजडित सुवर्णाचा वाळा. पादकंटक-चौकोनी तीन शिरांचा सोनेरी वाळा. यांत ध्वनि निघावा म्हणून दाणे असतात. पादपद्म-तीन किंवा पांच सोनेरी सांखळ्यांचा जडावाचा दागिना. बंगाल्यांत चर्णचाप किंवा चर्णपद्म या नांवाचा एक चांदीचा दागिना हल्लींही प्रचारांत आहे. किंकिणी-सोन्याचें पैंजण. मुद्रिका-हा दागिना सोन्याचा करून त्याजवर तांबडा रंग देत असत. हाही घुंगराप्रमाणें वाजत असे." (देशी हुन्नर-पृ० ५०.) ९. सूर्यपुत्र (सुग्रीव.) (अर्यमन्=सूर्य.) १०. स्त्री, रुमानामक सुग्रीवभार्या. ११. वडील भावानें. (वालीनें.) १२. वानर-देखील. १३. नाश. १४. माझ्या भाषणाला. सुग्रीवाचें हें वचन आहे.

श्रितश्रे[1] **य** स्कर म्हणे, 'तूं असावासि साधि[2] न, ।
सख्या ! मी तों तुझें आधीं सर्वथा कार्य साधिन.' ॥ ४४

भार्याह[3] **रा** [4]हंतुकामा प्रमत्ता **वा**ळिला वधी, ।
त्याची [5]श्री [6]स्त्री दे **सु**कंठा म्हणे, 'धर्मीच लाव [7]धी.' ॥ ४५

धाडीस **म** र्थ प्लवग [8]**श्री**शोधा **सु**गळ स्वयें. ।
लंघितां मास, [9]मारील, या चित्तीं [10]कांपले भयें. ॥ ४६

ते [11]महा **ज** व शोधूनि आले [12]आशात्रयाप्रती, ।
[13]अवध्यतिक्रमें झाली अन्यांची व्याकुळा मती. ॥ ४७

तयां [14]प्रा **य** गतां सांगे [15]जटायुज्येष्ठ शोध हो, ।
'सिंधु शंभर [16]गांवें, ती **सी**ता **लं**केंत योध ! हो !' ॥ ४८

तो [17]अंड **ज** स्वपक्षांच्या [18]दाहाची ऐकवी कथा, ।
तत्काळ पक्षोत्पत्तीनें दे प्रत्यय, हरी व्यथा. ॥ ४९

[19]**वा**तका **य** ज [20]ऋक्षेंद्रें पुराणें [21]ब्रह्मसंभवें ।
केला [22]स्वशक्तितत्वज्ञ वरादिकथनें स्तवें. ॥ ५०

महाप **रा** क्रमज्ञान **जां**बवान् दे जसा गुरु, ।
[23]म्हणे, 'बोध महामोहा [24]परा गर्वा तसा चुरु'. ॥ ५१

---

१. आश्रितांचें कल्याण करणारा. (राम.) २. सचिंत. (स+आधि=स हित+मनोव्यथा.) ३. रुमा (सुग्रीवभार्या) हिचें हरण करणारा (वाळी) त्याला. ४. हंतुकाम=हनन करूं इच्छिणारा. 'हन्' धातूपुढें 'तुम्'प्रत्यय लागून त्यांतील 'म्'चा लोप होऊन 'काम'शब्द लागून हें रूप सिद्ध झालें आहे. कर्तुकाम, गातुकाम, गंतुकाम, जेतुकाम, प्राप्तुकाम, इत्यादि दुसरीं उदाहरणें आहेत. 'काम'शब्दाप्रमाणें 'मनस्'शब्दाचाही प्रयोग होतो. गंतुमना, दातुमना, कर्तुमना, इत्यादि. काम आणि मनस् यांच्या योगें 'इच्छिणारा' असा अर्थ होतो—कर्तुकाम, कर्तुमना (करूं इच्छिणारा), गंतुकाम, गंतुमना (जाऊं इच्छिणारा). ५. राज्यलक्ष्मी. ६. तारा. ७. बुद्धि. ८. जानकीच्या शोधासाठीं. ९. 'सुग्रीव' या पदाचा येथें अध्याहार जाणावा. १०. प्लवग कांपले—असा भाव. सीताशोध करून येण्यास एक मासाची मुदत होती. ११. मोठे वेगवान्. १२. दिशात्रयाप्रत. १३. अवधि+अतिक्रमें=मुदतीच्या उल्लंघनानें. १४. प्रायोपवेशन करून बसलेल्यांस. १५. संपाती. १६. योजनें. १७. पक्षि संपाती. १८. जटायु आणि संपाती हे दोघे स्वपक्षाची परीक्षा पाहण्यासाठीं भरारी मारीत सूर्यमंडळापर्यंत गेले, तेव्हां त्याचे पंख दग्ध झाले—अशी कथा आहे. १९. मारुति. २०. जांबवंतें. २१. ब्रह्मदेवाच्या जांभईपासून झालेला (जांबवान्) त्यानें. २२. आपल्या शक्तीचें तत्व जाणणारा (मर्म जाणणारा). २३. मारुति म्हणे. २४. शत्रुमदा.

निज सा **म** र्थ्य कळतां उत्साहें कपि दाटला, ।
शतयोजन [1]पाथोधि स्पष्ट गो[2]ष्पद वाटला. ॥ ५२

---

## सुंदरकांड.

(अनुष्टुब्वृत्त.)

चिंतूनि तो[3] **श्री** **रा**मातें [4]महेंद्रा ढांसळी, उडे; ।
फुटले तों राक्षसींचे, **सी**तेचे दाटले [5]चुडे. ॥ ५३

ताडी [6]महो **रा** [7]**मै**नाका, ठकवी [8]**सु**रसेसही, ।
**सिं**हिकेतें वधी, लंघी लीलेनें सागरा [1]मही. ॥ ५४

[9]लंकादेवी **म** द हरी, [10]योगें होय लहानसा, ।
पावे **श्री**दर्शन, जसा क्षुधाकुल [11]महानसा. ॥ ५५

अशोकीं [12]रा **ज** खल ये, जें देवीसीं वदे कटु, ।
[13]साहे, महावीर होता जरि तन्मथना [14]पटु. ॥ ५६

जें धर्मन्या **य** युक्त **श्री**वाक्य तेणें निवे कपी, ।
तापे घृतें ज्वरीसा जो खळ नष्ट विवेक [15]पी. ॥ ५७

दुष्ट सांगे **रा** क्षसींला, 'इला शिक्षा करा बरी, ।
मासद्वयांत न वळे [16]प्रातराशार्थ हो तरी.' ॥ ५८

[17]उद्बंधनें **म** रू पाहे, जातां पापी, महासती. ।
स्तवी **मा**रुति दे मुद्रा, वंदी, पावे [18]महास ती. ॥ ५९

चूडामणी **ज** नकजा दे [19]संदेश कथी, मग ।
**अ**शोकोपवनांतील मोडी सर्व [20]महानग. ॥ ६०

---

१. समुद्र. २. गाईच्या उठलेल्या पावलाएवढा, गाईचें पाऊल, गाईच्या उठलेल्या पावलाच्या प्रमाणाचा, लघु, अल्प. ३. मारुति. ४. महेंद्रपर्वताला. ५. 'चुडे' या शब्दाचा काकाक्षिगोलकन्यायानें प्रयोग केला आहे असें जाणावें. ६. मोठें वक्षस्थळ ज्याचें असा मारुती. ७. नागमातेला. ८. तेजस्वी. ९. लंकादेवीचा गर्व हरण करी. १०. योगबळानें. ११. स्वयंपाकगृहास. १२. रावण. १३. या स्थळीं 'पंचमं लघु सर्वत्र' या नियमाचें उल्लंघन झालें आहे. 'साहे हीवा महावीर' असा फेर केला असतां नियमातिक्रम होत नाहीं. १४. कुशल. १५. प्राशी. १६. न्याहारीकारितां. १७. गळफांसानें. १८. उच्छ्वास. १९. निरोप. २०. मोठे वृक्ष.

सैन्याचा क्ष **य** अक्षाख्यकुमाराचाहि हा करी; ।
**ब्र**ह्मास्त्राला सांपडे, या **इं**द्रजित् क्षोभला[1] धरी. ॥ ६१

लावी धैनं **ज** य पुरा, पुच्छ पेटवितां खळें. ।
जळे मनीं, म्हणे, '**द्वे**ष्ट्या! विलंघी सागरा पळें.' ॥ ६२

**अं**गदादि **य** शा गाती त्या मानी हित **रा**मही, ।
भेटे घे[3] अधमर्णत्व देताही इतरा मही. ॥ ६३

सांगे **स**मी **रा** त्मज तो मार्गदुर्ग दुराग्रह ।
**श्री**चा निरोप स्वकृत नरक्षिति पुरा ग्रह. ॥ ६४

**बि**भीषण **म** हासाधू तयाची **स**रमा[4] बंधू, ।
**त्रि**जटा राक्षसी वाधू भव काळ न या वधू. ॥ ६५

## युद्धकांड.

(अनुष्टुब्वृत्त.)

सुग्रीवयुक्त **श्री** **रा**म बहुकीशबलासह, ।
उतरे सागरतटीं होय त्यासि भयावह. ॥ ६६

सांगतां हित **रा** गेजे धिक् सभेमाजि ऐकवी, ।
**बि**[6]भीषण निघे, भेटे, वंदी **रा**मासि तैं कवी. ॥ ६७

**लं**काराज्य न **म** स्कारें[6] दे, सेतु करवी **ह**री ।
प्र[7]भुचापशिरें दावी **श्री**स 'हा[8]!' म्हणवी अ[9]री. ॥ ६८

केला र[10]क्षोरा **ज** भंग देखतांचि कपीश्वरें, ।
न मानिलें **रा**वणें [11]जें **अं**गदें कथिलें बरें. ॥ ६९

---

१. क्षुब्ध झालेला. 'कोपविला' 'केला' 'पडला' 'संकोचला' इत्यादि रूपांचा गद्यात्मक ग्रंथांत भूतकाळवाचक क्रियापदाच्या स्थानीं प्रयोग होतो, तथापि तीं मूळचीं विशेषणें आहेत आणि त्यांचा विशेषणांसारखा प्रयोग पद्यात्मक ग्रंथांत होतो. प्रस्तुत स्थलीं 'क्षोभला' म्हणजे 'क्षोभ पावलेला' असा विशेषणार्थक प्रयोग जाणावा. याचीं अन्य उदाहरणें:-(१) जरि उकिरड्यांत **पडला, मळला,** न हिरा तथापि सामान्य [सन्मणिमाला गीति २७], (२) जशी पदरजें शिला, परि असे नव्हे **शापिली** । धवें हरिमनोहराकृति सती अघें **व्यापिली** [केकावलि ३६], (३) न कळविला **केला** उद्योग प्रथम तुवां कां गा या [पंचशतीरामायण साकी १९३]. २. अग्नि. ३. ऋणीपणा. [अधमर्ण=ऋणी, रिणको. उत्तमर्ण=धनी, धनको.] ४. स्त्री. ५. हें 'कारकदीपका'चें उदाहरण आहे. ६. येथें 'बिभीषणाला' या पदाचा अध्याहार जाणावा. ७. रामाचें खोटें चाप आणि मस्तक. ८. हाय हाय. ९. रावण. (सर्ग ३१.) १०. राक्षसांच्या राजाचा पराभव. ११. हितवचन. [पंचशतीरामायण—साक्या ३२३-३३५ पहा.]

बहु रक्षःक्ष **य** घडे, न चाले इंद्रजिच्छल, ।
कुंभकर्ण मरे, साम तरी तो न करी खल. ॥ ७०

सेनाथ वान **रा** नीक मेघनाद रणीं खिळी, ।
स्त्रौषध्युपायें हनुमान् उठवी मोह ज्या गिळी. ॥ ७१

मोहार्थ माया **म** यभूकन्याशिर कुंधी हरी, ।
बिभीषण भ्रांति वारी, लक्ष्मण व्यसु त्या करी. ॥ ७२

मंत्री वारी भू **ज** नीतें वधितां रावणा खला, ।
वधार्थ प्रेरिलें तेणें जें त्या प्रभु वधी बला. ॥ ७३

सौमित्रिहृद **य** क्रोधें भेदी रावण शक्तिनें; ।
पुन्हा सावध केला तो त्याचि निःसीमभक्तिनें. ॥ ७४

समाहोरात्र **जं** न्यांत बसोनि [११]हरिच्या रथीं ।
प्रभु मारी दशग्रीवा जेव्हां रवि म्हणे 'मथीं.' ॥ ७५

देववी त्या तो **य** आधीं, प्रभु स्थापी नता पदीं. ।
शोभली अग्निच्या कुंडीं श्री जैसी[१२] [१३]पद्मिनी [१४]ऱ्हदीं. ॥ ७६

रक्षःप्लवग **रा** जांतें पुष्पकीं घे, पुरास ये; ।
[१६]स्वःपू म्हणे अयोध्येला, 'त्वत्प्रताप पुरा सये !' ॥ ७७

वैकुंठ झाला **म** हिप यश [१७]वी गौर, विप्र ज्या ।
अर्था इच्छिति त्या सर्वा पुरवी, गौरवि प्रजा. ॥ ७८

## उत्तरकांड.

(अनुष्टुब्वृत्त.)

[१८]प्रभूतर्षिस्तुत **श्री** श स्वयशें नाशिता व्यथा, ।
दशास्य वाळी हनुमान् जे यांच्या आयके कथा. ॥ ७९

---

१. रामलक्ष्मणांसह. २. वानरांचें सैन्य (अनीक). ३. बांधून टाकी. ४. खोट्या सीतेचें मस्तक. ५. इंद्रजित. ६. गतप्राण. ७. इंद्रजितास. ८. सुपार्श्व. ९. सीतेतें. १०. युद्धांत. ११. इंद्राच्या. १२. येथें उपमा अलंकार जाणावा. १३. कमलिनी. १४. डोहांत. यांत 'उपमा' अलंकार आहे. १५. बिभीषणाला आणि सुग्रीवाला. १६. स्वर्गनगरी. (अमरावती.) १७. प्रसवे. १८. प्रभूत+ऋषि+स्तुत=पुष्कळ ऋषींनीं स्तविलेला. १९. येथें पांचवें अक्षर 'ळी' गुरु आहे आणि सहावें 'ह' लघु आहे म्हणून 'पंचमं लघु सर्वत्र' आणि 'गुरु षष्ठं च सर्वेषाम्' या नियमांचा अतिक्रम होतो. 'दशास्य हनुमान् वाळी' असा फेर केला असतां दोन्ही अडचणींचें निराकरण होतें.

श्रीरामें पूजिले **रा** जे जनकप्रमुख स्वयें, ।
केला हनूमान् विश्वांत धन्य धन्य महादयें[1]. ॥ ८०

ज्ञाता स्नेही पर **म** ही गर्भिणी स्वप्रिया सती, ।
अपवादें त्यजी, दोष न लावी स्वप्रियास ती[2]. ॥ ८१

सीतेसि **वा**ल्मिकि **ज** पे स्वाश्रमांत पिता तसा, ।
पुत्र तीचे **कुश लव** प्राशिती सद्यशोरसा. ॥ ८२

दोघे दोघे तन **य** त्यां तिघांचे गुणसागर, ।
चौघांतें[3] तेंवि आठांतें[4] वर्णिती धन्य नागर[5]. ॥ ८३

शत्रुघ्न मारी क्रू **रा** त्या लवणा मधुरा करी ।
जे तीनकोटि गंधर्व[6] वधिले **भरतें** अरी. ॥ ८४

न्यायेंकरूनि र **म** वी श्वान गृध्र उलूकही[7], ।
मृत विप्रापत्य[8] रक्षी, सद्यशें नित्रवी मही. ॥ ८५

अश्वमेधीं आत्म **ज** ते **वा**ल्मिकिच्छात्र हर्षले, ।
आदिकाव्यामृत प्राज्य सम सर्वत्र वर्षले. ॥ ८६

---

१. महादयें. (दयालु श्रीरामें.) २. सीतेनें रामाला स्वपरित्यागाबद्दल दोष लाविला नाहीं, यावरून स्वपतीच्या न्यायीपणाविषयीं तिची खात्री होती असें ठरतें. नवऱ्यानें जें कांहीं केलें आहे तें विचारानेंच केलें असावें—असा तिचा समज होता. ३. दशरथाच्या चार पुत्रांतें. ४. आठ पुत्रांतें. ५. नगरांतील लोक. ६. गंधर्व=हे शैलूषगंधर्वराजाचे पुत्र. [सर्ग १०० श्लोक १२.] सिंधुनदाच्या दोन्ही बाजूंस यांचा गंधर्वदेश केकयदेशाच्या समीप होता. भरताचा मातुल युधाजित् यानें आपला गुरु गार्ग्य याजबरोबर 'गंधर्वदेश जिंकून त्यांत दोन उत्तम नगरें स्थापावीं' असा निरोप रामास पाठविला, तेव्हां त्यानें सपुत्रसैन्य भरतास धाडून गंधर्वांचा पराभव केला. गंधर्व देशांत तक्षशिला नामक नगरींत भरतानें आपल्या तक्ष नामक पुत्राची स्थापना केली व गांधार देशांत पुष्कलावत नामक नगरांत आपल्या पुष्कल नामक पुत्राची स्थापना केली. [सर्ग १०१ श्लोक ११.] गंधर्व या शब्दानें कंदाहारी, बलूची, दुराणी लोक तर समजावयाचे नाहींत ना? ७. मंत्ररामायण—उत्तरकांड—आर्या २६७-२८१ पहा. ८. घुबडही. ['उलूकः कुरुभेदेऽपि पेचके जंभभेदिनि' इति विश्वः.] ९. ब्राह्मणाचा पुत्र. ही कथा अशी आहे:—एकदां राम राज्य करीत असतां एका विप्राचा मुलगा मरण पावला. तेव्हां बापानें शोकविव्हळ होऊन त्या मुलाला राजद्वारीं ठेवून विलाप करण्यास आरंभ केला. रामानें त्याची समजूत घालून त्याचे डोळे पुसून त्यास स्वस्थ केलें. नंतर रामानें विप्रसुतमरणकारण नारदमुनीला विचारिलें. तो म्हणाला, 'जातिधर्माचें उल्लंघन झाल्यामुळें विप्रसुत मेला. कोणी शूद्र तप करीत असावा असें वाटतें, त्याचें निवारण केलें पाहिजे'. नारदाच्या म्हणण्याप्रमाणें रामानें शोध केला. तों दक्षिणदिशेस एका कमलभूषित उत्तम सरोवरासमीप वृक्षाच्या खांदीस लोंबणारा जटाधारी तपोनिरत शंबूक नामक शूद्र दृष्टीस पडला. त्याचवेळीं रामानें त्याचा खड्गानें शिरच्छेद केला. तेव्हां सर्व देव प्रसन्न झाले. आणि 'वर माग' असें रामास म्हणूं लागले. रामानें मृतविप्रबालक मागून घेतला—अशी कथा आहे.

यावया प्रत्यय **य** शा पुन्हा ती **जा**नकी, 'धरे[1]! ।
असेन शुद्धा तरि घे' म्हणे तदुदरीं भरे. ॥ ८७

आठां[2] राज्यांसि भ **ज** ते झाले आठ कुमार ते, ।
पुण्यकीर्ति सदा **रा**मीं, **शि**वीं जेंवि उमा रते. ॥ ८८

सत्यप्रतिज्ञत्व **य** श प्रभुनें निज रक्षिलें, ।
भक्षिलें वन्य, वेदोक्त गुरूक्त सम लक्षिलें. ॥ ८९

भक्त[3]कल्पद्रुमा **रा** में **रा**में रंजविलें जग, ।
ऐकादश[4]सहस्राब्द पुर उद्धरिलें मग. ॥ ९०

चरित्रीं विश्व **र म** लें, शमलें सर्व पातक, ।
श्रीराम मेघ गमला भक्त ते मोर चातक. ॥ ९१

**उपसंहार.**

(अनुष्टुभ्वृत्त.)

**'मंत्रिरामायण'** प्रेमें **मयूरें रामनंदनें**, ।
श्री**राम**चरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ॥

---

## ४१. सप्तमंत्ररामायण.[5]

### बालकांड.

(अनुष्टुभ्वृत्त.)

**श्री**पति प्रार्थिला मत्ता माराया **द**शकंधरा, ।
देवांनीं सद्धितें[6] ज्यांचीं[7] नेत्राब्जें[8] आठ पंधरा[9]. ॥ १

---

१. त्या पृथ्वीच्या पोटांत. २. रामाचे पुत्र-कुश व लव; लक्ष्मणाचे अंगद व चंद्रकेतु; भरताचे तक्ष व पुष्कल; शत्रुघ्नाचे सुबाहु व शत्रुघाती. कुशाची नगरी कुशावती, लवाची श्रावस्ती [सर्ग १०८ श्लोक ४-५], अंगदाची कारुप देशांत अंगदीया पुरी, चंद्रकेतूची मल्ल देशांत चंद्रकांता नगरी [सर्ग १०२ श्लोक ५-१२], तक्षाचि तक्षशिला व पुष्कलाची पुष्कलावत नगरी [सर्ग १०१ श्लोक ११], सुबाहूची मथुरा व शत्रुघातीची वैदिक नगरी [सर्ग १०८ श्लोक १०-११]. ३. भक्तांस कल्पवृक्षांच्या आरामाप्रमाणें (उद्यानाप्रमाणें) जो त्यानें. ४. अकरा हजार वर्षे. ५. या काव्यांत 'श्रीराम जय राम जय जय राम' हा मंत्र आहे. बालकांडप्रमुख सात कांडांत कांडानुक्रमें श्लोकाच्या प्रथम द्वितीय तृतीयादि अक्षरस्थानीं मंत्राक्षरांची योजना करून सात मंत्र साधिले आहेत म्हणून याला 'सप्तमंत्र रामायण' असें अन्वर्थक नांव दिलेलें आहे. ६. सत्+हितें= साधु+हितकारकें. ७. ज्या देवांचीं. ८. नेत्रकमळें. ९. ब्रह्मा. (ब्रह्मदेव चतुरानन म्हणून आठ नेत्र), शिव (शिव पंचानन आणि विरूपाक्ष (विषमाक्ष) म्हणून पंधरा नयन). 'ज्यांचीं सद्धितें नेत्राब्जें आठ पंधरा'. हें 'पर्यायोक्त' नामक अलंकाराचें उदाहरण आहे.

राजा दशरथाचा तो चतुर्मूर्ति महायशा ।
पुत्र झाला रामनामा, विश्वा आली शुभा दशा. ॥ २

महात्मा राम कौसल्यापुत्र हा ज्येष्ठ सांवळा, ।
सन्नेत्रांतें सद्गुणाब्धि तो म्हणेल न कां 'वळा ?' ॥ ३

जगन्नाथांश भरत कैकेयीचा मुल क्षेण, ।
पुत्र लक्ष्मण शत्रुघ्न सुमित्रेचे सुलक्षण. ॥ ४

यज्ञावनें हर्ष देती राम लक्ष्मण गाधिजा, ।
अहल्येच्या समुद्धारें गौतमा बहु आँधि ज्या. ॥ ५

राजकोदंड मोडूनि रामें वरिलि भूसुता, ।
जनकाच्या तिघी रामानुजांही सज्जनस्तुता. ॥ ६

महाप्रतापा पहिल्या रामातें नव राम हा ।
जिंकी, या विजयाऐसा दुजा दे न वैरा मेहा. ॥ ७

जयाधिक गमे शांता पराजयहि तो, 'दया ।
केली' म्हणे 'बा ! विश्वेशा ! निजधर्महितोदया.' ॥ ८

यश गाय म्हणेनाचि स्वांतीं भार्गवराम हा. ।
पावे स्वीकारुनि पुन्हा निजमार्गवरा मेंहा. ॥ ९

जगतीपति पुत्राच्या विजयें बहु हर्षला, ।
स्वाम्युत्कर्षें पुरीं पौर स्फार प्रेमाश्रु वर्षला. ॥ १०

यथाविधि गृहीं पुत्र प्रवेशवि सदार ते, ।
पुत्रभाग्योदयीं भूप तद्गुणींच सदा रते. ॥ ११

राजाज्ञेनें निजपुरा नेला भरत मोंतुळें, ।
म्हणे त्या लोक, 'रविसीं तेजें चंद्रसभा तुळे.' ॥ १२

मनोज्ञरूपा भरता शत्रुघ्ना देखते जन ।
वदले, 'गोमटें यांचें ऐसें तें लेखतेज न.' ॥ १३

---

१. श्यामल. २. उत्सवरूप. ३. यज्ञाच्या अवनानें (रक्षणानें). ४. मनोव्यथा. ५. भवचाप. ६. परशुरामातें. ७. श्रेष्ठा. ८. उत्सवा, किंवा आनंदा. ९. त्या शांत (प्रतिहत—भग्न झालेल्या) भार्गवरामाला. १०. उत्सवा. ११. राजा दशरथ. १२. अयोध्येंत. १३. पुष्कळ. ['स्फारस्तु स्फरकादीनां वुद्बुदे विपुलेऽपि च' इति हेमचंद्रः.] १४. युधाजितें. १५. मनोहरसौंदर्या. १६. देवांचें तेज. (लेख=देव.)

## अयोध्याकांड.

(अनुष्टुभ्वृत्त.)

भूं[1] **श्री** रामकरीं द्याया युवराज करावया, ।
योजी राजा, गुरु[2] म्हणे, 'हा विचार बरा वया.' ॥ १

सा **रा** विचार ती मोडी **कैकेयी मंथरा**मतें, ।
वर साधी, धरी पंथ वन्याचा, करि **राम** तें. ॥ २

'हो **मे**[3] न्वब्द वनीं **राम** स्पष्ट वल्कजटाधर, ।
रक्षो **भरत** पृथ्वीतें, हे माझे दे मला वर.' ॥ ३

रा **ज** वर्य जरि प्रार्थी, न वळे[4], खवळे, असें ।
कळे, निघे **राम सीता सौमित्रि** प्रीतिच्या रसें. ॥ ४

हो **य** प्रहृष्टा **कैकेयी मंथरा**सक्तधी, 'रहा ।
क्षण' भूप म्हणे; तेव्हां वदले सर्व धीर 'हा!' ॥ ५

ध **रा** पति रथीं वाहो[5] सांगे, सूत[6] तसें करी, ।
**गुहा**सि [7]भेटे फिरवी प्रभु हा विनवी परी. ॥ ६

स्व **म** स्तकीं बंधुच्याही जटा रचि, **गुहा**[8] तरी[10] ।
मागे, **गंगा** तरे, वंदी **भर**द्वाजपदें हरी[11]. ॥ ७

'द्वि **ज** वर्या पुसे, राहे **चित्र**कूटीं' असें पुरीं ।
सूत सांगे, मरे भूप, शोकशूळ शिरे उरीं. ॥ ८

प्र **य** त्नें **भरत** क्षिप्र आणिला, बहु तो रडे, ।
**कैकेयी**चे लागले त्या मृदुला[12] बोल [13]कोरडे. ॥ ९

नि **ज** मातेसि धिक्कारी, पित्याची करुनि क्रिया, ।
गेला शरण **रामा**ला आणाया, **श्री** न ज्या प्रिया ॥ १०

त्या **य** शोनिधि सांगे, 'वा! ताताचें सत्वरक्षण ।
आम्ही करावें, सांडावा त्वां म्यांही [14]धर्म न क्षण'. ॥ ११

---

१. पृथ्वी. २. वसिष्ठ. ३. चौदा वर्षे. ४. येथें 'ती' या कर्तृपदाचा अध्याहार जाणावा. ५. रामाला रथांतून ने असें सारथ्याला राजा दशरथ सांगे. ६. सारथी. (सुमंत्र.) ७. शृंगवेरपुरीं भेटे. ८. गुह. ९. गुहाजवळ तरी (नौका) राम मागे—असा सरलार्थ. १०. नौका. ११. राम. (विष्णु.) १२. सुकुमार (भरताला). ['सुकुमारं तु कोमलं मृदुलं मृदु' इत्यमरः.] १३. चाबूक. १४. या श्लोकांतील दोन गोष्टी—बापाचें सत्व राखणें आणि क्षणभर देखील धर्मत्याग न करणें—सर्वांस कित्ता घेण्यासारख्या अशा आहेत. रामायण काव्याच्या अध्ययनानें खरोखर उत्तम प्रकारचें नीतिशिक्षण

घे **रा** ज्याच्या रक्षणा तो पादुका प्रभुच्या फिरे, ।
    **नं**दिग्रामीं वसे वल्की, मनेंही न पुरीं शिरे. ॥ १२

त्या **म**[1] हीध्रा त्यजी **राम** जाय **अ**त्र्याश्रमास, ती ।
    **अ**नसूया अंगरागें[2] हरि **श्री**च्या श्रमा सती. ॥ १३

---

## अरण्यकांड.

(अनुष्टुभ्वृत्त.)

हरि **श्री**तें त्या **वि**राधा राक्षसा **राम** दे गती[3], ।
    **दं**डकीं मुनि रक्षी जी दया करवि वेग ती. ॥ १

साग **रा** चा प्राशिता[4] जो दे शस्त्रें यासि तो ज्ञुनीं ।
    पादानता शिष्यसमा सदाशीराशि[5] पाज्ञुनी. ॥ २

जो स **म** र्थ स्वताताचा सखा गृध्र **जटायु** तें[6] ।
    त्या दे गुरुत्व[7] कीं वंदी शिरें भव्यें जटायुतें[8]. ॥ ३

राहे **ज** गत्पति प्रेमें उटजीं **गौ**तमीतटीं, ।
    **रा**मीं **शू**र्पणखा लोभे, शुनी[9] जेंवि[10] सुधाघटीं. ॥ ४

---

सहज प्राप्त होतें. रामायणापासून प्राप्त होणाऱ्या अमोलिक नीतिबोधाविषयीं सुप्रसिद्ध रामायण-भक्तवर्य प्रिन्सिपाल ग्रिफिथ साहेबाचा अभिप्राय असा आहे:—"खरोखर पवित्र अशा या काव्यांत कविता आणि नीति यांचें अन्योन्यगुणसंवर्धक मनोरम संमेलन झालें आहे, तसें अन्य स्थलीं कोठें नाहीं असें मला वाटतें. काव्यग्रंथ पुष्कळ आहेत हें खरें आहे, किंबहुना प्रत्येक उत्तम काव्यांत कोणत्या तरी नीतितत्वाचा बोध ठसविलेला असतो, तथापि ज्याच्या योगानें आमचें अंतःकरण पूर्णसद्गुणप्रेमानें उचंबळतें असा ग्रंथ रामायण हाच होय. याच्या वाचनाबरोबर सत्य, पितृभक्ति, अपत्यस्नेह, पातिव्रत्य, एकपत्नीव्रत, बंधुप्रेम, विनय, क्षमा, धैर्य, सर्वभूतानुकंपा, इत्यादि मनुष्यास भूषित करणाऱ्या सद्गुणांची उत्तम प्रतिमा आमच्या मनांत येते. ज्यांत सत्याकरतां दशरथराजानें प्रियपुत्राचा वियोग सोसून शेवटीं जीवितत्यागही केला असें वर्णिलें आहे, तें प्रकरण वाचलें म्हणजे सत्यदेवतेविषयीं पूज्यबुद्धि जशी अंतःकरणांत प्रादुर्भूत होते तशी दुसऱ्या कशानें होईल? पित्याच्या सत्यव्रतपालनाकरतां गृहसुख, राज्य, यांचा त्याग करणें; या रामाच्या आचरणापासून जसा पितृभक्तीचा उपदेश ठसतो तसा दुसऱ्या कशानें ठसेल? रामायणांत जशीं राम आणि सीता हीं अत्युत्तम पात्रें आहेत तशीं कोणत्याही देशांतील ग्रंथसमूहांतील एकाद्या काव्यांत आहेत काय? असें म्हणण्यास हरकत नाहीं." [रा. गोविंदशास्त्री बापटकृत 'दाशरथि-रामचरितामृत'—प्रस्तावना पृष्ठ ३-४.]

१. पर्वत जो चित्रकूट त्याला. २. उटणें. सीतेला बाधा न व्हावी म्हणून हें अनसूयेनें दिलें होतें. ३. मुक्ति. ४. अगस्त्य. प्राशिता=प्राशन करणारा. हें पर्यायोक्ताचें उदाहरण होय. ५. उत्तम आशीर्वादांच्या राशी. ६. जें आपल्या बापाच्या ठायीं प्रसिद्ध तें ७. तातत्व. ८. जटायुक्तें. ('शिरें' या शब्दाचें विशेषण.) ९. कुत्री. १०. यांत उपमालंकार आहे.

अन्या **य** ज्ञें लक्ष्मणें ती प्रभूक्तें नीट दंडिली, ।
खरसेना रामभद्रें लीलेनें मग खंडिली. ॥ ५

कोपें **रा** वण तो दावी सुवर्णहरिणा महा, ।
तल्लोभ **श्री** धरी त्याचा म्हणवी परिणाम 'हा !' ॥ ६

तो हे **म** हरिण **श्री**नें धराया प्रार्थितां, वनीं ।
शिरे प्रभु, शरें ताडी, तैच्छब्दें भी सती मनीं. ॥ ७

सीता **ज** पोनि कपटें दशानन जटायुतें ।
पाडी, ने, सिंधु शोषाया पाहे मूढ घटायुतें. ॥ ८

अग्रि **य** प्रभुला भ्राता सांगे, धावोनि देखिलें, ।
जसें उटज तें शून्य तसें विश्वहि लेखिलें. ॥ ९

शोधी **ज** नकजा स्त्रैण तसा 'हाय !' वदे 'वहा ।
शोकपूरीं' म्हणे 'एणा खगा व्याघ्राहि' देव हा. ॥ १०

तों हो **य** शोक शोकांत गृध्र सक्षत पाहिला, ।
सीता दशमुखें ऐसें सांगतां स्तब्ध राहिला. ॥ ११

करी **रा** जीवनयन शरीरा त्याचिया करें ।
संस्कार जेंवि ताताच्या, गावें हें यश शंकरें. ॥ १२

धरी **म** हाक्रूर जो दे त्या कबंधासि कामग ।
विमान शबरीलाही, पंपेला पावला मग. ॥ १३

---

## किष्किधाकांड.

(अनुष्टुभ्वृत्त.)

विरही **श्री** श पंपेच्या तीरीं 'हाय !' म्हणे, मग ।
भेटे हनूमान् सुग्रीव सीतेचे दाखवी नग. ॥ १

जो वानर **रा** धीश वळी मत्त तो खळ मारिला, ।
वारिला ताप, सुग्रीव केला कीशेंद्र, तारिला. ॥ २

सुकंठें **म** ग शोधाया सीता पाठविले हरी, ।
संपाती शोध सांगूनि अंगदादि सुखी करी. ॥ ३

---

१. रामाच्या सांगीवरून. २. मारीचा. ३. हाय. ४. त्या मारीचाच्या शब्दें. ५. अयुत घटांनीं, अगणित घंटांनीं. ६. लक्ष्मण. ७ स्त्रीलंपट. ८. हरिणा. ९. कमलनेत्र (राम). १०. उत्तरक्रिया, दहनक्रिया. ११. स्वेच्छागामी. १२. दागिने. १३. वाळी. १४. कीशांचा (वानरांचा) इंद्र(प्रभु). १५. वानर.

तो अग्र **ज** जटायूचा सांगे, 'मी अनुजासह ।
गेलों पहाया **अ**रुणा, न सोसे [1]भानुचें [2]मह. ॥ ४

प्राणप्रि **य** [3]स्वानुज म्यां झांकिला [4]तनुच्या तळीं, ।
मत्पक्ष दग्ध झाले, मी पडलों या [5]महाचळीं. ॥ ५

रक्षी [6]ध **रा** सुर मला **म**हेंद्रीं तो **नि**[7]शाकर, ।
ताप माझा हरी जैसा चकोराचा [8]निशाकर. ॥ ६

तो म्हणे **म** ज, 'या स्थानीं रहा, ऐसाचि तोंवरी ।
**श्री**तें शोधावया येथें येतील प्रभुचे [9]हरी. ॥ ७

[10]प्रवृत्ति **ज** गदीशाच्या प्रियेची त्यांसि तूं मुखें ।
सांग तत्काळ [11]येतील पक्ष, क्रीड नभीं सुखें.' ॥ ८

ये [12]प्रत्य **य** हि जों ऐसी दग्धपक्षकथा कथी, ।
सपक्ष होउनि उडे [13]तत्संदेहाचळा मथी. ॥ ९

लंघाया **ज** लधी कोणी शतयोजन न [14]क्षम, ।
म्हणे **अं**गद, 'जातों मी, जाणे येतां न विक्रम.' ॥ १०

आत्मश्रे **य** **सु**कंठ**श्रीरा**मप्रिय सुखें घडे, ।
ऐसें कोणाहि न सुचे सर्वही संकटीं पडे. ॥ ११

त्या [15]ऋक्ष **रा** जें वाराया सर्वांचीही मनोव्यथा, ।
**वा**युजा कथिली त्याची जन्मकर्ममहाकथा. ॥ १२

स्तवें स्व **म** हिमज्ञानें उत्साहें दशयोजन ।
वाढे, म्हणे **ना**रदादि, 'या वीरा यश [16]'यो' जन. ॥ १३

---

## सुंदरकांड.

(अनुष्टुभ्वृत्त.)

**वायुपुत्र श्री** पहाया उडे **ग**रुडसा [17]रयें, ।
[18]यादें [19]यादोनिधिस्थेंही लक्षशा कांपलीं भयें. ॥ १

वक्षप्रहा **रा** **मै**नाक [20]क्षमला न सहावया, ।
देव देवर्षिही आले तत्कौतुक पहावया. ॥ २

---

१. सूर्याचें. २. तेज. ३. जटायु. ४. शरीराच्या. ५. मोठ्या पर्वतावर. (महेंद्रपर्वतावर.) ६. ब्राह्मण. ७. चंद्रमा मुनि ('धरासुर' या शब्दाचें विशेषण.) ८. चंद्र. ९. वानर. १०. वार्ता. ११. पंख फुटतील. १२. अनुभव. १३. त्याचा संशयपर्वत. १४. समर्थ. १५. जांबवंतानें. (मंत्र-रामायण—गीति १३४-१३९.) १६. येवो. १७. वेगानें. १८. जलचरें. १९. समुद्रस्थें. २०. समर्थ झाला.

सुरसा अ **म**रप्रोक्ता गिळाया पसरी मुख, ।
शत गावें त्यांत शिरे, निघे, दे वासवा मुख. ॥ ३

मरुदात्म **ज** मारी त्या सिंहिकेतें वरें धरी ।
छाया ओढी, गिळी पापा, सागरीं दारुणा चरी. ॥ ४

तो उग्रर **य** ये पारा, करी गोष्पद सागरा ।
ती अशोकवनीं पाहे, केली माता जिणें धरा. ॥ ५

तों ये कामी **रा** क्षसेंद्र, 'स्वप्रिया हो' म्हणे खळ, ।
**श्री** वदे प्रभुच्या तेजें 'न तूंही खरसा जळ.' ॥ ६

पापी जाय, **म** रुत्पुत्र मुद्रा दे **श्री**स वांचवी, ।
तच्चूडामणि घे खूण स्वांतीं संदेश सांचवी. ॥ ७

शाखीभंगी, **जं** न्यकामें मारी अक्षा महाबळा, ।
ब्रह्मास्त्रा मान दे मेघध्वाना हा सांपडे खळा. ॥ ८

व्हाया स्वामि**य** शा क्रूरा रावणातें म्हणे, 'अरे ! ।
वांच, वांचविल्या देवी दे वीराधीश्वरा अरे !' ॥ ९

क्षोभतां, अं **ज** लि करी बिभीषण म्हणे, 'अहो ! ।
अवध्य दूत, जो याचा स्वामी तो विजयी न हो' ॥ १०

तो धनंज **य** तत्पुच्छीं पेटवी, वीर वायुभू ।
जाळी पुरी; म्हणे, 'याला असो पुष्कळ आयु' भू. ॥ ११

पुच्छ पाथो **रा** शिमध्यें विझवी, रिझवी सुर, ।
निववी स्वसहायातें तप्तातें जेवि कापुर. ॥ १२

**श्री**चा चूडा **म** णि **श्री**शा दे, निरोप कथी तया, ।
जयाधार प्रभु प्रेमें भेटे वर्णी करी दया. ॥ १३

---

## युद्धकांड.

(अनुष्टुभवृत्त.)

सौमित्रियुक्त **श्री राम** सुग्रीवानुमतें वळे ।
घे, जाय सिंधुतीरा जो ध्यावा गावा सदा **न**ळें. ॥ १

---

१. नागमाता. २. त्या सुरमामुखांत. ३. इंद्राला. ४. उग्र वेग ज्याचा असा. ५. पृथ्वी. हा पाद 'पर्यायोक्ता'चें उदाहरण होय. ६. त्या सीतेचा चूडामणि. ७. मनीं. ८. निरोप. ९. वृक्ष. १०. युद्धेच्छेनें. ११. शत्रो. १२. हा लाटानुप्रास जाणावा. १३. अग्नि. १४. मारुति. १५. उदकराशीमध्यें. (पाथस्=उदक.) १६. विझवी–रिझवी–हें लाटानुप्रासाचें उदाहरण होय. १७. सैन्यें.

बिभीषण ब रा धर्मन्याय सांगे, तया खळ ।
अपमानी, तो शरण्या रामा वंदी गुणोज्ज्वळ. ॥ २

राक्षसांचा तो[1] म[2] हीश श्रीशें केला, नदीपती ।
सेतुनें लंघिला, रा[3]जा भंगी त्या जो छळी सती. ॥ ३

अंगदोक्तें न ज गतीसुता दे, युद्ध आदरी, ।
मारवी बळ तत्पाळ, भंगे आपणही अरी. ॥ ४

ना[4]गांतकें भ य श्रीचें चमूचें नागपाशज ।
हरी, मारी कुंभकर्णा मग, जो उद्धरी गॅ[5]ज. ॥ ५

घननादें श[6] रा सारें खिळितां, वायुनंदन ।
दिव्यौषधीनीं उठवी, समजे तरि मंद न. ॥ ६

मायासीतेसि म थितां घननादें, उडे बळ ।
छळज्ञ तो लक्ष्मणानें प्रयत्नें वधिला खळ. ॥ ७

शोकें[9] क्षोभोनि ज गतीसुतावातार्थ हीं[10] निघे, ।
सु[11]पार्श्व मंत्री सुयशा श्रीची वारूनि हानि घे. ॥ ८

बळकोटिक्ष य रणीं करवी लक्ष्मणा अरी, ।
पाडी स्वशक्तिनें, स्वस्थ पुन्हा मारुति यां[12] करी. ॥ ९

हरि[13] दे रथ जें[14] न्यार्थ, प्रभु बैसे तयावरी, ।
सं[15]ताहांतीं रावणांत ब्रह्मास्त्रें कौतुकें करी. ॥ १०

श्रीरामविज य स्वर्ग सत्य कैलास हर्षवी, ।
प्र[16]भूत वाद्य सद्गीत पुष्प प्रेमाश्रु वर्षवी. ॥ ११

क्रियां[17] राक्षस रा जाची बरवी करवी, मग ।
बिभीषणा पदीं स्थापी, श्री दिव्यें[19] हर्षवी जग. ॥ १२

पुष्पकें ये प्रे म निधी भ्राता भेटे बसे पदीं ।
प्रभूदयीं जगें हृष्टें, जेंसीं[20] यांदें[21] सुधानदीं. ॥ १३

---

१. बिभीषण. २. राजा. ३. वानरराज. (सुग्रीव.) ४. गरुडें. ५. गजेंद्रमोक्षकथेवर येथें कविकटाक्ष आहे. ६. बाणवृष्टीनें. [शर+आसार=बाण+वेगवृष्टि, धारासंपात. 'धारासंपात आसारः' इत्यमरः, 'आसारः स्यात्प्रसरणे वेगवर्षे सुहृद्बले' इति विश्वः.] ७. बांधितां. ८. मूर्ख. ९. पुत्रशोकें. १०. रावण. ११. सुपार्श्व मंत्री श्रीची हानि वारूनि सुयशा घे–असा अन्वय. १२. या लक्ष्मणाला. १३. इंद्र. १४. युद्धार्थ. १५. सात दिवसांच्या अंतीं. १६. विपुल. १७. उत्तरक्रिया. १८. हा लाटानुप्रास समजावा. १९. सत्यानें. २०. यांत उपमालंकार आहे. २१. जलजंतु.

## उत्तरकांड.

(अनुष्टुभ्वृत्त.)

कुंभोद्भवमुखें **श्री** श शत्रुघ्न्या मानुनि प्रिय ।
ऐके पूर्वचरित्रास परित्रासहरक्रिय. ॥ १

जगत्प्राणकुमा **रा** चें जन्मकर्म दिला वर ।
ब्रह्मादिकीं तें चरित प्रेमें ऐके ईळावर. ॥ २

जे नाशिते पर **म** हा कपिराक्षसनायक, ।
त्यांतें पूजी परम हा स्वाश्रितोत्सवदायक. ॥ ३

साधितातिखभ **ज** ना सदार प्रभु वातजा ।
पूजी सदिष्ट वर दे, काळें स्पर्शे न घात ज्या. ॥ ४

प्रजांतें रंजवी **य** तें, निंदितां श्रीसहि त्यजी ।
स्वर्णश्रीसीं करी यज्ञ अश्वमेधादि न त्यजी. ॥ ५

पक्षी श्वानहि ता **रा** या धर्में न्यायें न आळसे, ।
काळ सेवकसा लोकां भी कीं ते प्रभुबाळसे. ॥ ६

जो विप्राचा सुत **म** रे त्यातें तत्काळ वांचवी, ।
मारवी शत्रु भरतीं, शत्रुघ्नीं यश सांचवी. ॥ ७

जानकीचे तनु **ज** ते कृती कुश लव, स्वयें ।
वाल्मीकिनें पढविलें त्यांसि 'रामायण' स्वयें. ॥ ८

तद्गीत ऐके स्व **य** श प्रसन्न प्रभु होय ज्या ।
चकोर केलें सत्काव्यें चंद्र तन्मुखतोयजा. ॥ ९

प्रभु श्रीतें, 'दिव्य **ज** नप्रत्ययार्थ' म्हणे 'करीं.' ।
ती 'शुद्ध तरि घे' ऐसें वदे, जाय धरोदरीं. ॥ १०

चौघांचे धर्मन **य** वित् पुत्र आठ गुणाकर ।
श्रीरामें ते सर्व राजे केले घेते उणा कर. ॥ ११

सत्यसंध सदा **रा** ध्य प्रभुप्राण वहिश्चर ।
जो लक्ष्मण तया त्यागी घडतां वागनादर. ॥ १२

प्रजा सर्वाहि वि **म** ळा विमानांमाजि वाहिल्या, ।
नेल्या स्वलोका ताराया, कथा श्रोत्यांसि राहिल्या. ॥ १३

---

१. अगस्त्यवदनें. २. भयहारक क्रिया ज्याची असा. (राम.) ३. वायुपुत्राचें. ४. पृथ्वीपति. ५. शत्रूच्या तेजा. ६. सुवर्णसीतेसह. ७. शुभ दैव ज्याचें असा. (वाल्मिकी या शब्दाचें विशेषण.) [सु + अर्य=शुभ मंगल+दैवें.] ८. भूमीच्या पोटांत. ९. प्रतिज्ञाभंग.

### उपसंहार.

(अनुष्टुभ्वृत्त.)

सप्तमंत्रात्मक प्रेमें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामायण रामीं हें अर्पिलें कृतवंदनें. ॥

---

## ४२. मंत्ररामायण. (संस्कृत.)

### मंगलाचरणम्.

(अनुष्टुभ्वृत्तम्.)

श्रीरामं मुदिरश्यामं वंदेऽहं देवनायकम् ।
सदा वदान्यप्रवरं प्रणतेप्सितदायकम्. ॥ १

राकापतिमुखीं देवीं वंदे सीतां महासतीम् ।

---

१. या मंत्ररामायणांत **'श्रीराम जय राम जय जय राम'** हा त्रयोदशाक्षरात्मक मंत्र साधिला असून याची रचना प्राकृत'मंत्ररामायणा'प्रमाणें पंतांनीं केली आहे. प्राकृत'मंत्ररामायणां'त १८८० आर्या असून एकशें शेचाळीस मंत्र आहेत. (मंत्ररामायण–उपोद्घात–आर्या २०.) संस्कृत **मंत्ररामायण** प्राकृत **मंत्ररामायणा**पेक्षां मोठें आहे. यांत ३९५२ श्लोक असून तीनशें चार मंत्र आहेत. प्रत्येक कांडांतील मंत्रसंख्येचा निर्देश पंतांनीं या काव्याच्या उपसंहारांत केला आहे. या **रा**मायणांत त्रयोदशाक्षर **रा**ममंत्राची योजना केली असूनही तें कोठेंही क्लिष्ट झालें नाहीं इतकेंच नव्हे तर पंतांच्या इतर काव्यांप्रमाणें सुबोध, सरळ, प्रसादसंपन्न आणि सुरस उतरलें आहे. २. श्री+राम=लक्ष्मी+रमण; 'श्रियः कमलवासिन्या रमणोऽयं यतो हरिः । तस्मात् श्रीराम इत्यस्य नाम सिद्धं पुरातनम् ॥' इति पद्मपुराणे. ३. मुदिर+श्याम=मेघ+नील; मेघांस पाहून मयूरचातकादिकांना मोद (हर्ष) होतो अशी कविसमयप्रसिद्धि आहे, म्हणून मेघाला मुदिर ही संज्ञा प्राप्त झाली. ४. वदान्य+प्रवर=दातांत+श्रेष्ठ=दानशूर; 'मां याचस्वेति वदति स वदान्यः.' ५. प्रणत+ईप्सित+दायक=स्वपदलीन+मनोरथ+पूरक. ६. राका+पति+मुख+ई प्रत्यय=पूर्णिमेच्या चंद्रासारखी जिची मुखशोभा आहे अशी, पूर्णेंदुवदना तीप्रत. ७. 'सीतामुखोद्भवात् सीता इत्यस्यै नाम चाकरोत्' इति पाद्मे. जनक राजा यज्ञासाठीं क्षेत्रशुद्धि नांगरानें करीत असतां त्याला सीतेंत (लांगलपद्धतींत) आंत कन्या असलेली एक पेटी सांपडली, म्हणून त्या कन्येला 'सीता' हें नांव दिलें. [वा० रा० बाल० स० ६६ श्लो० १३-१४.] या संबंधीं कथा वाल्मीकिरामायणाच्या उत्तरकांडांत स० १७त आणि मोरोपंताच्या प्राकृत मंत्ररामायणांतील उत्तरकांडांत आर्या ७६-८८ यांत दिली आहे. या संस्कृत मंत्ररामायणांतही त्या कथेचा उल्लेख आहे. [उत्तरकां० श्लो० २२२-२३६.] विठ्ठलकवीनेंही आपल्या 'सीतास्वयंवर'नामक काव्याच्या प्रथम सर्गांत ही कथा दिली आहे. ८. महती+सती=महासती=महासाध्वी. या समासांत 'महती' शब्दाचा पुंवद्भाव झाला; 'पतिं या नाभिचरति मनोवाग्देहसंयता । सा साध्वी.'

यस्याः[1] सद्व्रतसामर्थ्याच्छमिता अमिता द्विषैः[2]. ॥ २

महामतीन्सदा वंदे लक्ष्मणादीन्रघूद्वहान्[3] ।
येषां पुंमर्थाः[4] स्वप्नेऽपि परमा न रमाधवात्. ॥ ३

जगद्गुरुगुरुं[5] वंदे वसिष्ठं[6] तपसांनिधिम् ।
द्विजराज[7] इति प्राहुर्यं सर्वे ब्राह्मणाः सुराः[8]. ॥ ४

यस्तपस्वीश्वरः[9] साक्षान्महादेव इव प्रभुः ।
वंदे तं गाधिजं[10] तेजोनिधिना विधिना[11] समम्.॥ ५

राशिं सुतपसां शुद्धज्ञानदानविशारदम्[12] ।
नारदं[13] सन्मुनिं वंदे भवाब्धेः[14] परपारदम्. ॥ ६

मनोज्ञं रामचरितं येन गीतं सविस्तरम् ।

---

१. 'यस्याः सद्व्रतसामर्थ्यात्' या स्थलीं 'यस्याः' या शब्दाचा 'सद्व्रत' या शब्दाशीं निकट संबंध असतांही समास केला नाहीं व द्वितीयपदाचा तृतीयपदाशीं समास केला ही चूक आहे. याचें समाधान टीकाकार खालीं लिहिल्याप्रमाणें करीत असतातः—'अत्र सापेक्षत्वेऽपि गमकत्वात्समासः' अपेक्षा असतांही जर अर्थाला बाध येत नसेल तर अशा प्रकारचा समास करावा. २. द्विषः हें 'द्विष्'शब्दाचें प्रथमेचें अनेकवचन. ३. रघु+उद्वह=राघवानां ऊर्ध्वं वहति पितॄन् इति उद्वहः पुत्रः. ४. पुमस्+अर्थ=पुमर्थ, पुरुषार्थ धर्म, अर्थ, काम, आणि मोक्ष; लक्ष्मणादिकांस चार पुरुषार्थ स्वप्नांत देखील परमेश्वराहून (रमाधवाहून) मोठे (परम) वाटले नाहींत. खरेंच आहे, 'नहि माणिक्यपरिहाणेन गैरिकपरिग्रहः संभवति.' ५. जगत्+गुरु+गुरु=जगताला जो पूज्य त्याचा गुरु. [गृणाति उपदिशति गिरति गिलति वा अज्ञानमिति वा गुरुः.] ६. अतिशयेन वशी वसिष्ठः. [इष्ठन् इनेर्लुक् पृषोदरादित्वात् शस्य सः.] ७. द्विज+राजन्=ब्राह्मणश्रेष्ठ । या ठिकाणीं 'राजन्' शब्दाचा 'राज' असा अंतादेश झाला. ['मातुरग्रेऽधिजननं द्वितीयं मौंजिबंधने' इत्युक्तत्वात् द्विजः.] ८. सुरा अस्य अस्ति इति सुरः. [अर्श आदिभ्योऽच्. समुद्रमथनाचे वेळीं सुरेचा (मद्याचा) स्वीकार केल्यामुळें 'सुर' अशी देवांला संज्ञा प्राप्त झाली आणि दैत्यांनीं तिचा स्वीकार न केल्यामुळें त्यांना 'असुर' म्हणूं लागले. वा० रा० बा० स० ४६ श्लो० ३६-३८.] ९. तपस्विन्+ईश्वर=तपस्विप्रवर. १०. गाधि नांवाच्या राजापासून झालेला जो गाधिज, विश्वामित्र. ११. ब्रह्मदेवाशीं तुल्य. [वा० रा० बा० स० ६० श्लो० २०-२३.] १२. शुद्ध+ज्ञान+दान+विशारद=निर्विकल्प+ज्ञानाचा+उपदेश करण्याविषयीं अतिकुशल जो त्याला. [शारं ज्ञानं ददाति यः स शारदः पंडितः, विशेषेण पंडितः विशारदः.] १३. ज्ञानोपदेशानें नरांच्या अज्ञानाचा नाश करणारा जो त्याला. ['नारदो नाशयन्नेति नृणामज्ञानजं तमः' इति नारदीये.] १४. टीप १ पहा. येथें ही 'सापेक्षत्वेऽपि गमकत्वात् समासः' असेंच समाधान इष्ट आहे. 'भवाब्धिपरपारदम्' असें समस्तपद पाहिजे. संसारसमुद्राच्या परतीराला नेणारा जो त्याला.

वाल्मीकिं तमहं वंदे मंदेष्टशतसाधकम्. ॥ ७

जगत्प्राणसुतं वंदे हनूमंतं महौजसम् ।
यः श्रीरामकथासिंधौ चेतसा वेतसायते. ॥ ८

यशस्विप्रवरं वंदे सुग्रीवं वानरेश्वरम् ।
संप्राप्तौ हेतुरार्याया भार्याया राघवस्य यः. ॥ ९

जलधौ येन रचितः सेतुर्हेतुर्जयश्रियः ।
तं नलं वानरं वंदे यं देवा धन्यमूचिरे. ॥ १०

यत्नं ये चक्रुरनिशं जांबवत्प्रमुखा भृशम् ।
तानृक्षानंगदादींश्च वंदे रामानुगान्कपीन्. ॥ ११

राजश्रेष्ठं दशरथं कौशल्याद्याश्च तत्प्रियाः ।
जनकं च महाराजं वंदे श्रीरामवंदिनम्. ॥ १२

---

१. 'वल्मीकप्रभवो यस्मात् तस्मात् वाल्मीकिरित्यसौ' इति ब्रह्मवैवर्तोक्तेः, यद्वा वल्मीक इति ऋषिविशेषस्य संज्ञा इत्याहुः. २. मंद+इष्ट+शत+साधक=अज्ञजनांच्या शेंकडों मनोरथांना पूर्ण करणारा. ३. जगत्+प्राण+सुत=जगत्प्राण जो वात त्याचा तनय. ['यया (सृष्ट्या) प्राणिनः प्राणवंतः' इति शाकुंतले.] ४. हनुमत् अथवा हनूमत् अशीं दोन रूपें आढळतात. आंजनेयाला 'हनुमत्' हें नांव पडण्याचा प्रसंग उत्तरकांडांत वर्णिला आहे. [प्राकृत मंत्ररामायण, उ० कांड, आर्या १९६-२०१, रामायणें भाग १ पृ० १८५.] ५. महत्+ओजस्=महाबल; मोठें बल ज्याचें आहे तो. ६. श्रीरामकथारूप सिंधूंत जो अंतःकरणानें नदीच्या प्रवाहांत असलेल्या वेतसाप्रमाणें नम्र होऊन जातो. 'वेतसायते' हें नामधातूचें उदाहरण होय. ७. यशस्विन्+प्रवर=कीर्तिमान्+श्रेष्ठ. ८. सुग्रीव हा सूर्याच्या अंशापासून झाला. [वा० रा० बाल० स० १७ श्लो० १०; प्राकृत मंत्ररामायण—उ० कांड आर्या २०६-२१०] ९. वा० रा० अरण्य० स० ७२ श्लो० ७ व १४. १०. पूज्यायाः. ११. वानरविशेष. 'विश्वकर्मा त्वजनयत् नलं नाम महाकपिम्' [वा० रा० बाल० स० १७ श्लो० १२.] १२. जांबवान् हा ब्रह्मदेवाच्या जांभईपासून उत्पन्न झाला. [वा० रा० बाल० स० १७ श्लो० ७.] १३. अंगद हा वालिपत्नी तारा हिचे ठायीं उत्पन्न झालेला बृहस्पतीचा अंश होता. वाल्मीकिरामायणांत 'तार' असें पद आढळतें, तें अंगदवाचकच आहे. 'बृहस्पतिस्त्वजनयत् तारं नाम महाकपिम्.' [वा० रा० बाल० स० १७ श्लो० ११.] कोठें कोठें तार नांवाचा अन्य वानर होता असें लिहिलेलें आढळतें तें कदाचित् चुकीचें असावें असें वाटतें. १४. राम+अनुग=रामाचे+अनुचर. १५. ज्याच्या रथाची गति दहादिशांत अकुंठित होती तो दशरथ. १६. कोसलानां राजा कौसलः, तस्यापत्यं स्त्री कौसल्या, सा आद्या प्रथमा यासां ताः. कौसल्या किंवा कौशल्या असा द्विरूप शब्द आहे. १७. जनकराजा जानकीचा पिता हा प्रसिद्ध ब्रह्मवेत्ता होता; याच्याच सभेंत याज्ञवल्क्यमुनि होते. १८. श्रीरामाच्या यशातें गाणारा भाट किंवा स्तुतिपाठक.

महीसुरान्वामदेवप्रमुखानृत्विजः प्रभोः ।
श्रीकेशवं श्रीगणेशं वंदे विद्यागुरुं हरिम्. ॥ १३

---

## बालकांडम्.

(अनुष्टुभ् वृत्तम्.)

श्रीरामचरितं पुण्यं संक्षेपान्नारदो मुनिः ।
पृच्छते प्रथमं प्राह प्रेम्णा वाल्मीकये सते. ॥ १
राशिरत्यच्छतपसां वाल्मीकिर्ब्रह्मणो वरात् ।
चक्रे 'रामायणं' नाम महाकाव्यं महाकविः. ॥ २

---

१. मही+सुर=भूदेव=ब्राह्मण. देवांना 'सुर' हें नांव पडण्याचें कारण टीप १६ त दिलें आहे. [वा०रा० बाल० स०४६ श्लो०३६-३८.] २.वामदेव हा शंकराचा अवतार. ३.'ऋत्विज्' शब्दाचा अर्थ कोशांत 'धनलाभाकरितां यज्ञ करणारा याजक' असा दिला आहे.'आग्नीध्राद्या धनैर्वार्या ऋत्विजो याजकाश्च ते' इत्यमरः.४. केशव गणेश नांवांचे कवीचे उपाध्याय विद्यागुरु होते यास्तव शिष्टसांप्रदायाला अनुसरून त्यांना नमस्कार ग्रंथारंभीं केला आहे. प्राकृत 'मंत्ररामायण' उपोद्घात (१)'श्रीमद्गणेशगुरुपद' इत्यादि पहिली आर्या पहा. (२) सन्नामगर्भरा० आर्या २८. (३) महाभारतांत 'श्रीमदुपाध्यायत्तोम कविवर केशव गणेश पादरजा' इत्यादि आर्या. केशीला मारणारा तो केशव किंवा क (ब्रह्मा) अ (विष्णु) व ईश (महेश) ह्या त्रिमूर्ति ज्याच्या तंत्रानें वागतात तो केशव, अशी श्रीमच्छंकराचार्यांनीं विष्णुसहस्रनामटीकेंत व्युत्पत्ति दिलेली आढळते. गणांचा ईश गणेश. आनंदाश्रमग्रंथावलिः—गणेशाथर्वशीर्ष सभाष्य पहा. 'हराम्यघं हि स्मर्तॄणां हविर्भागं क्रतुष्वहम् । वर्णश्च मे हरिर्श्रेष्ठि तस्माद्धरिरहं स्मृतः' इति व्यासवचनात्. या तेराव्या श्लोकांत जो 'हरि' आला आहे त्याजविषयीं माहिती मिळाली नाहीं. कवीच्या मनांत भाविविघ्नप्राचुर्याची शंका आल्यामुळें यक्षबलिन्यायानें तेरा श्लोकांनीं विघ्नहरणार्थ मंगलाचरण केलें, कारण 'विघ्नध्वंसस्तु मङ्गलस्य द्वारम्' असें म्हटलें आहे. ५. वाल्मीकि मुनीनें 'कोऽन्वस्मिन् सांप्रतं लोके गुणवान् कश्च वीर्यवान्' इत्यादि प्रश्न त्रिलोकज्ञ नारद यांना केला तेव्हां त्यांनीं 'मूलरामायण' या नांवानें प्रसिद्ध असलेला कथाभाग वाल्मीकीला सांगितला असें वर्णन आहे. [वा० रा० बाल० स० १ श्लो० १-८.] ६. सते=साधु पुरुषाला. सते ही 'सत्' शब्दाची चतुर्थी. ७. न च्छ्यति दृष्टिम् तत् अच्छम् निर्मलम्; फारच निर्मल म्हणून अत्यच्छ=सुनिर्मल. ८. वा० रा० बाल० स० २ श्लो० ३२।३५. ९. रामाच्या संबंधानें रचलेलें काव्य रामायण. १०. महाकाव्याचीं लक्षणें विश्वनाथकवि पंचानन यांनीं आपल्या 'साहित्यदर्पण'नामक ग्रंथाच्या सहाव्या परिच्छेदांत दिलीं आहेत. त्यांपैकीं मुख्य खालीं आहेत:— 'तत्रैको नायकः सुरः । सद्वंशः क्षत्रियो वापि धीरोदात्तगुणान्वितः । एकोऽङ्गी रस इष्यते । अङ्गानि सर्वेऽपि रसाः । इतिहासोद्भवं वृत्तमन्यद्वा सज्जनाश्रयम् । चत्वारस्तस्य वर्गाः स्युस्तेष्वेकं च फलं भवेत् । आदौ नमस्क्रियाशीर्वा वस्तुनिर्देश एव वा । क्वचिन्निंदा खलादीनां सतां च गुणकीर्तनम् । एकवृत्तमयैः पद्यैरवसानेऽन्यवृत्तकैः । नातिस्वल्पा नातिदीर्घाः सर्गा अष्टाधिका इह । सर्गांते भा-

महाकाव्यं पठन्सभ्यांश्श्रावयेत्कः सभास्विदम् । (युग्मकम्.)
इति चिंतयतस्तस्य पादग्रहणमादृतौ ॥ ३
जनकस्य सुतापुत्रौ कृतवंतौ गुणार्णवौ ।
शिष्यौ कुशलवौ यौ तत्ताभ्यामग्राहयत्प्रभुः ॥ ४
यदा वचोविधेयं तत्कृत्वा ताभ्यां मुनिव्रजे ।
गीतं, प्रीतं तयोस्तेषां तदा चित्तं तपस्विनाम्. ॥ ५
राकापतिः स्वामृतेन चकोरानिव तानृषीन् ।
अर्थेन पौलस्त्यवधप्रबंधः समतर्पयत्. ॥ ६
मधुरेणादिकाव्यस्य स्वच्छेन मुनयोऽखिलाः ।

---

विसर्गस्य कथायाः सूचनं भवेत् । कवेर्वृत्तस्य वा नाम्ना नायकस्येतरस्य वा । नामास्य सर्गोपादेय-कथया सर्गनाम तु ॥ [कारिका ५५९]. रघुवंश, कुमारसंभव, किरातार्जुनीय, शिशुपालवध आणि नैषधचरित यांस महाकाव्यें म्हणण्याचा सांप्रदाय आहे, परंतु विक्रमांकदेवचरित भट्टिकाव्य, हरविजय, श्रीकंठचरित, धर्मशर्माभ्युदय, इत्यादिक ग्रंथ 'महाकाव्य' संज्ञेस पात्र आहेत. 'महाकाव्या'चें लक्षण दंडिकृत 'काव्यादर्श' नामक ग्रंथाच्या प्रथम परिच्छेदांतही दिलें आहे. [काव्यादर्श—प्रथम परिच्छेद—श्लोक १४-१९ पृ० १६-२०].

१. जनकस्य सुतापुत्रौ [सुतायाः सीतायाः पुत्रौ कुशलवौ] इत्यत्र सापेक्षत्वेऽपि गमकत्वात् समासः. २. गुण+अर्णव=गुणांचे समुद्र. [अर्णांसि (जलानि) विद्यंतेऽस्मिन्निति अर्णवः, सलोपः.] ३. खुडलेल्या कुशांच्या अग्रभागाला कुशमुष्टि म्हणतात आणि अधोभागाला लव म्हणतात. वाल्मीकिमुनीनें अग्रजाला (वडील मुलाला) कुशमुष्टीच्या ऊर्ध्वभागानें (अग्रानें) प्रोक्षण केलें म्हणून त्याला 'कुश' म्हणूं लागले आणि अवरजाला अधोभागानें प्रोक्षण केलें यास्तव त्याला 'लव' ही संज्ञा प्राप्त झाली. [वा० रा० उत्तर० स० ६६ श्लो०६-९ प्राकृत मंत्ररामायण—उ० कां० आर्या २९४-२९७.] लंकेहून आणलेल्या सीतादेवीच्या संबंधानें सामान्य लोकांचे काय विचार आहेत हें कळण्याकरितां रामाचे गुप्त हेर शहरांत फिरत असत. त्यांपैकीं एकानें सीतादेवीच्या संबंधाची दुर्वार्ता श्रीरामाला सांगितली. त्यामुळें व जानकीला वनवासाचे डोहळे झाल्यामुळें ती कठोरगर्भा असतांही, लक्ष्मणानें वाल्मीकीच्या आश्रमाजवळ तिला टाकून दिली. हें येवढें साहस रामानें कशाकरितां केलें तर प्रजारंजनासाठीं. 'जानकीमपि आराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा.' इत्यादि उत्तररामचरितांतील रामोक्ति सुप्रसिद्ध आहे. ४. तोंडपाठ. ५. चंद्रः. ६. मंत्रिरामायण—पृ० २५ टीप १८ पहा. ७. पुलस्त्यस्य गोत्रापत्यं पुमान् पौलस्त्यः=रावणः इत्यर्थः, तस्य वधः यस्मिन् स पौलस्त्यवधनामकः प्रबंधः; कृष्णचरितवर्णनरूप माघकाव्याला शिशुपालवधम् हें नांव दिलें, त्याचप्रमाणें रामचरितवर्णनात्मक काव्याला पौलस्त्यवध म्हटलें आहे. १९ वें पद्य हें पूर्णोपमेचें उदाहरण आहे. ८. या पद्यांत मधुर, स्वच्छ, आणि रस हे तीन शब्द 'श्लिष्ट' आहेत. रामायणाला आदिकाव्य ही संज्ञा आहे. मेघपक्षीं वरील पदांचे अर्थ अनुक्रमें गोड, निर्मल व पाणी असे होतात, व आदिकाव्यपक्षीं माधुर्यगुणयुक्त, प्रसाद-

रसेनांबुमुचोऽत्यर्थं चातका इव तर्पिताः. ॥ ७

जगन्मनोहरं धीरौ तौ वीणास्वरमिश्रितम् ।
चेतुर्मुखवरोद्भूतं महाकाव्यमगायताम्. ॥ ८

यच्छ्रुत्वा मुनयस्ताभ्यां ते प्रेमाश्रुपरिप्लुताः ।
वल्काजिनवृषीदंडकमंडलुकुशान्ददुः. ॥ ९

जनात्कथयतः श्रुत्वा गंधर्वाविव गायनौ ।
नीतौ सदसि रामेण साकेते तौ कुमारकौ. ॥ १०

यथोपदेशं वाल्मीकेः कृति सुकृतिनां वरौ ।
आदितः कृतिनौ रामं श्रावयामासतुर्मुदा. ॥ ११

रावणारिवसिष्ठाद्यैर्ब्राह्मणैर्भ्रातृभिः प्रियैः ।
सचिवैः सह शुश्राव स्वं माहात्म्यं सभां गतः. ॥ १२

महर्षिणा स्वयं गीतमिति माहात्म्यमात्मनः ।
अपूर्वमिव लोकेशः कृतवानित्थमादरात्. ॥ १३

श्रीमान्दशरथः सूर्यवंश आसीन्नृपोत्तमः ।
समस्तसत्पालनतो यः साक्षाद्विष्णुना समः. ॥ १४

---

गुणयुक्त, व काव्याचा आत्मा जो प्रधान रस तो असे होतात. 'चित्तद्रवीभावमयो ल्हादो माधुर्यमुच्यते,' 'चित्तं व्याप्नोति यः क्षिप्रं शुष्केंधनमिवानलः। स प्रसादः समस्तेषु रसेषु रचनासु च॥' 'लोकोत्तरचमत्कारप्राणः ब्रह्मास्वादसहोदरः वेद्यांतरस्पर्शशून्यः स्थायिभावः रसः' इति विश्वनाथः. या २० व्या श्लोकांत श्लेषानुप्राणिता उपमा आहे.

१. अत्यंत. २. 'रामस्य चरितं कृत्स्नं कुरु त्वमृषिसत्तम,' 'तत्राप्यविदितं सर्वं विदितं ते भविष्यति.' [वा० रा० बाल० स० २ श्लो० ३२।३५.] ३. अजिन=चर्म. ['अजिनं कृत्तिः स्त्री' इत्यमरः.] ४. ऋषींच्या दर्भासनाला वृषी ह्मणतात. 'व्रतिनामासनं वृषी' इत्यमरः. ५. गाणारे. ६. ज्याप्रमाणें त्यांना उपदेशिलें (शिकविलें) होतें त्याप्रमाणें. पहिल्या तेरा श्लोकांत मंगलाचरण आहे आणि या दुसऱ्या तेरा श्लोकांत ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून वाल्मीकिमुनींनीं रामायणनामक आदिकाव्य रचून तें कुशलवांना शिकविलें; भिक्षेच्या निमित्तानें फिरत असतां ते कुशलव तें गात असत, तेव्हां एकेकाळीं लोकांच्या सांगण्यावरून श्रीरामांनीं त्यांच्या मुखांनीं तें साम काव्य आपल्या सभेंत श्रवण केलें—इतका कथाभाग आहे. तें रामायण पुढें दिलें आहे. ७. मुदा=आनंदेन=आनंदानें. ८. समस्तसत्पालनतः=समस्त+सत् + पालन+तसिल् प्रत्ययः पंचम्यर्थे. ९. वेवेष्टि इति विष्णुः. 'अन्तर्बहिश्च यत्सर्वं व्याप्य नारायणः स्थितः' इति श्रुतेः.

राजधान्यामयोध्यायामुवास नयवित्[1]कविः[2] ।
रविः स्वशत्रुतमसः[3] पुण्यात्मानुपमच्छविः[4]. ॥ १५

महिषी[5] तस्य कौसल्या कैकेयी[6] दयिता भृशम् ।
सुमित्रा विनयोपेता पत्नी यत्प्रेम नो[7] कृशम्[8]. ॥ १६

जन्म स्वमफलं मेने सोऽनपत्योऽतिचिंतया ।
नाभ्यनंदच्छ्रियं गुर्वीं, योऽपुत्रस्तस्य किं तया? ॥ १७

यष्टुं तुरंगमेधेन[10] संतत्यर्थं[11] गुरुं मुनिम् ।
पृष्ट्वा नृपो मनश्चक्रे शक्रेष्टक्रतुमुदारधीः[12][13]. ॥ १८

राजा सनत्कुमारोक्तं[14] विभांडकमुनेः सुतम् ।
आनिन्ये स्वेष्टसिद्ध्यर्थं सुमंतात्सचिवाच्छ्रुतम्[15] ॥ युग्मकम् १९

महर्षि लोमपादस्य सख्युर्जामातरं प्रियम् ।
शांतया[16] कांतया साकमृष्यशृंगं तपोनिधिम्. ॥ २०

---

१. नीतिशास्त्रकोविद. २. अतीतानागतसर्वज्ञः सर्वार्थदर्शी पंडितः इत्यर्थः. ३. आपल्या शत्रुरूप अंधकाराचा. [अशा प्रकारच्या समासाला रूपकसमास हें नांव आहे, कारण येथें साधारण धर्माचा संबंध विशेषंकरून उपमानाशीं आहे.] ४. अनुपमा+छवि=ज्या छवीला (कांतीला) उपमा देतां येत नाहीं अशी कांति ज्याची आहे तो. 'अनुपमा' या शब्दाचा पुंवद्भाव झाला यामुळें अनुपमच्छवि असा समास झाला. ५. राजाबरोबर जिला राज्याभिषेक झाला अशा राजमहिलेला 'महिषी' म्हणतात, इतर राजस्त्रिया 'भट्टिनी' होत. ६. केकयानां राज्ञामपत्यं स्त्री कैकेयी. ['कैकेयमित्रयुप्रलयानाम्' या सूत्राच्या आधारें इयादेश व गुण होऊन 'आदिवृद्धौ ङीपि' यस्य इति लोपे कैकेयी इति साधु.] ७. नो इति ओकारान्तमव्ययमभावेऽर्थे. ८. अल्प. ९. अन+अपत्य=ज्याला संतान नाहीं तो, निपुत्रिक. मुलाला अपत्य म्हणतात कारण त्याच्या असण्यामुळें कुलाचा क्षय होत नाहीं, वंश चालू राहतो. [उत्तरार्धाशीं समानार्थक श्लोक रघुवंश–स० ३ श्लो० ६५ पहा.] 'नापुत्रस्य लोकोऽस्ति' या श्रुतिवाक्यामुळें परलोकसुखाविषयीं राजा दशरथ अतिनिराश झाला–असा भावार्थ. १०. तुरगमेध=घोड्याचा वध ज्या यज्ञांत करतात त्याला 'अश्वमेध' संज्ञा आहे. ११. अपत्यहेतोः. १२. शक्र+इष्ट+क्रतु=इंद्राचें इष्ट करणारा. १३ महानुभावः. १४. वा० रा० बाल० स० ९ श्लो० १-४; वा० रा० बाल० स० ११ श्लो० १७-२२ पहा. १५. प्राकृत मंत्ररामायण–बालकांड–आर्या २७-३० पहा. १६. शांता ही दशरथाचा मित्र जो अंगराज रोमपाद त्याची मुलगी होय. कोठें तर ही रोमपादाची मानलेली मुलगी, राजा दशरथानें मित्रत्वामुळें त्याला दिली होती असें आढळतें. [वा० रा० बाल० स० ११ श्लो० ३.] 'उत्तररामचरित'नाटकांतही 'अपत्यकृतिकां राज्ञे लोमपादाय यां ददौ' असें आढळतें. 'अनेन मेऽनपत्याय दत्तेयं वरवर्णिनी । याचते पुत्रतुल्यैषा शांता प्रियतरात्मजा ॥ सोऽयं ते श्वशुरो ब्रह्मन् यथैवाहं तथा नृपः ॥' असें इतरत्र आढळतें. रामायण–तिलकटीका पहा.

**ज**पतांवर आयाते तस्मिन्सर्वस्वदक्षिणः ।
अश्वमेधोऽभवद्राज्ञः सर्वेषां विस्मयावहः. ॥ २१

**य**ज्ञादनंतरं चक्रे पुत्रीयामिष्टिमस्य सः ।
स्वभागग्रहणायास्यां सुराः सर्वे समागताः. ॥ २२

**ज**गतां पीडकं हंतुं **रा**वणं वैरदर्पितम् ।
**ब्र**ह्माणं प्रार्थयामासु'रुपायं चिंतये'ति तम्. ॥ २३

**य**दैवं प्रार्थितो **धा**ता संचिंत्योपायमब्रवीत्, ।
'वव्रेऽभयं न मर्त्येभ्योऽवज्ञया **द**शकंधरः ॥ २४

**रा**क्षसेंद्रो नरात्तस्मान्नाशं प्राप्स्यति सर्वथा.' ।
**वि**धावित्थं वदत्यत्रायया‌ौ **वि**ष्णुर्महायशाः. ॥ २५

'**म**नुष्यस्त्वं भवे'त्यूचुः प्रणतास्त्रिदशाः प्रभुम् ।
'राज्ञो **द**शरथस्यास्य स्त्रीषु हंतुं निशाचरम्.' ॥ २६

**श्री**शः सुरांस्तथेत्युक्त्वा गतोंऽतर्धानमग्नितः ।
पुमान्प्रादुरभूदिष्ट्यां पुत्रीयायां महाद्भुतः. ॥ २७

**रा**ज्ञे ददौ स्वर्णपात्रीं दिव्यपायससंभृताम् ।
'देहि दारेभ्य' इत्युक्त्वा तत्रैवांतर्हितोऽभवत्. ॥ २८

**म**हिष्यै तद्ददावर्धं पायसं संततिप्रदम्, ।
अर्धादर्धं **सु**मित्रायै दत्तवान्रघुनंदनः. ॥ २९

---

१. शापामुळें दुष्टयोनि पावलेले रावण कुंभकर्ण हे तिसऱ्या जन्मांतील जयविजयनामक वैकुंठद्वारपालांचे अंश होत. हे 'विरोधभक्ति' करून मुक्त झाले. पहिल्या जन्मांत हिरण्याक्ष–हिरण्यकशिपु, दुसऱ्यांत शिशुपाल–वक्रदंत आणि तिसऱ्यांत रावण–कुंभकर्ण या नांवांनीं प्रसिद्ध होते. सर्व सृष्टीला पीडा देणाऱ्या दशाननाला रावण म्हणत असत. [वा० रा० उत्तर० स० १६ श्लो० ४३-४५.] २. वा० रा० बाल० स० १६ श्लो० १३-१४. ३. तिस्रो दशा जन्म सत्ता विनाशाख्या न तु वृद्धिविपरिणामक्षया मर्त्यानामिव दशा येषां ते । अथवा त्र्यधिकास्त्रिरावृत्ताश्च दश परिमाणमेषां ते त्रिदशा देवाः. ४. श्री+ईश=लक्ष्मीचा स्वामी. ५. पायस पात्र हातांत घेऊन अग्निकुंडांतून प्राजापत्य नर निघाला व त्यानें तें पात्र राजाला दिलें. (प्राकृत मंत्ररामायण–बालकांड–आर्या ४१-४२.) ६. यज्ञाचे ठायीं. ७. महान् व अद्भुत. प्राजापत्यनराच्या स्वरूपाचें वर्णन पाहणें असल्यास वा० रा० बाल० स० १६ श्लो० ११-१४ पहा. ८. उत्तम पायसानें (क्षीरीनें) भरलेली (पात्री). ९. दारयंति भ्रातृस्नेहमिति दाराः. आप्तजनांवरील स्नेह कमी करवितात, यामुळें स्त्रियेला 'दाराः' म्हणतात. 'दार'शब्द पुल्लिंगी बहुवचनान्त आहे. १०. कौसल्येला चरूचा अर्धभाग दिला, सुमित्रेला एकचतुर्थांश आणि कैकेयीला अष्टमांश. अवशिष्ट अष्टमांश पुनः सुमित्रेला दिला. अशा रीतीनें पायसाचे विभाग केले. कैकेय्यपेक्षया ज्येष्ठत्वं कौसल्यापेक्षया कनिष्ठत्वं च सुमित्राया विचार्य पादोनांशार्धदानम् । तस्यै कनिष्ठत्वाच्च कैकेय्यै अष्टमांशदानम् । वल्लभायां संभोगकर्मणि पक्षपातो न तु धर्मविभागकर्मणि इति तिलककृतो निर्णयः. ११. रघुवंशांत झालेला राजा दशरथ.

**ज**गतीश[1]श्च[2]रोरर्धं **कै**केय्यै प्रददावथ, ।
अवशिष्टं साष्टमांशं **सुमित्रायै** पुनर्ददौ. ॥ ३०

**य**ज्वनस्तस्य तास्तिस्रः [3]पत्न्यो गर्भान्प्रपेदिरे, ।
अत्रांतरेऽब्रवीद्ब्रह्मा सुरान्सर्वान्समागतान्. ॥ ३१

‘**रा**वणं राक्षसं हंतुमवतीर्णस्य [4]**मा**पतेः ।
[5]सहायान्वानरान्[6]ऋक्षान्सृजध्वमुरुविक्रमान्. ॥ ३२

**म**म वक्रादभूत्पूर्वं जृंभमाणस्य बुद्धिमान् ।
[7]ऋक्षराट् **जां**बवान् **वि**ष्णोः स सहायो भविष्यति.’ ॥ ३३

[8]**ज**लजप्रभवाज्ञताश्चक्रुर्देवास्तथैव ते; ।
शक्रसूनुरभूद्[9]**वा**ली **सु**ग्रीवः **सू**र्यनंदनः. ॥ ३४

**य**शस्विनं बुद्धिमंतं **ता**रं नाम महाकपिम् ।
**धि**[10]षणोऽजनयत्पुत्रं देवानां कार्यसिद्धये. ॥ ३५

**ज**ज्ञे **ध**नपतेः पुत्रः स नाम्ना **गं**धमादनः, ।
**अ**ग्नेर्**नी**लो, **न**लः [11]कीशप्रवरो **वि**श्वकर्मणः. ॥ ३६

[12]**य**थाश्विनौ तथा **मैं**दा**द्वि**विदावपि तत्सुतौ; ।
**प**र्जन्यपुत्रः **श**रभः, **सु**षेणो **व**रुणात्मजः. ॥ ३७

**रा**क्षसांतकरः श्रीमान्हनूमान्मारुतात्मजः ।
[13]वज्रसंहननः साक्षाद्[14]रुद्रतुल्यपराक्रमः. ॥ ३८

---

१. चरोरर्धम् याचा सुमित्रादत्त अवशिष्टचरोरर्धम् असा अर्थ इष्ट आहे. २. पायसाचें. ३. पत्नी हें पतिशब्दाचें स्त्रीप्रत्यय लावून झालेलें रूप, त्याचा अर्थ स्वपतिकृतयज्ञफलभोक्त्री स्त्री पत्नी. दम्पत्योः सहाधिकारात् । पत्युर्नो यज्ञसंयोगे. ४. लक्ष्मीपतेः. ५. सह एति इति सहाय. ६. आस्वल. ७. ऋक्ष+राज्=ऋक्षांचा—भल्लूकांचा (आस्वलांचा) राजा. ८. ब्रह्मणा आदिष्टाः. ९. मराठी मंत्ररामायण—उत्तर० आर्या २०७-२१० पहा. १०. धिषणः=बृहस्पतिः. ११. कस्य वायोः अपत्यं पुमान् किः हनुमान् । स ईशो यस्य स वानर इत्यर्थः । तेषु प्रवरः श्रेष्ठः वानरश्रेष्ठ इत्यर्थः । विश्वेषु कर्म व्यापारो यस्य स विश्वकर्मा देवशिल्पी तस्मात्. १२. सूर्याचें तीव्र तेज सूर्यपत्नीला सहन न होऊन ती अश्विनीरूपानें भ्रमण करीत असतां बळानें सूर्यानें तिच्या नाकपुड्यांत रेतनिषेक केला, तेव्हां दोन जुळीं **‘नासत्य’** नांवानें प्रसिद्ध असलेलीं मुलें झालीं, त्यांचेंच दुसरें नांव ‘अश्विनौ’ किंवा ‘अश्विनीकुमारौ.’ हे देवांचे वैद्य होत. १३. वज्राप्रमाणें सुदृढ आहे संहनन म्हणजे शरीर ज्याचें असा तो. १४. रुद्रः रोदिति इति । सोऽरोदीत् यदरोदीत् तत् रुद्रस्य रुद्रत्वमिति श्रुतिः. [आनंदाश्रमग्रंथावलि—रुद्राध्यायः भाष्यटीकासमेतः पहा.]

**म**हांतो जज्ञिरेऽसंख्याः सुरांशाः सत्यविक्रमाः ।
ऋक्षवानरगोपुच्छास्तुच्छा[1] येषां पुरः परे. ॥ ३९

**श्री**मति द्वादशे[2] मासे चैत्रे[3] शुक्ले पुनर्वसौ ।
**कौ**सल्याजनयद्रामं नवम्यां कर्कटे[4] शुभे. ॥ ४०

**रा**जप्रियायां कैकेय्यां जज्ञे सत्यपराक्रमः ।
पुष्ये मीने शुभे लग्ने **भ**रतः सद्गुणाकरः. ॥ ४१

**म**हिते समये सार्पे[5] कुलीरे[6] शुभलक्षणौ ।
पुत्रौ **लक्ष्मणशत्रुघ्नौ** सुमित्रा[7] सुषुवे यमौ[8]. ॥ ४२

**ज**ज्ञिरे नृपतेः पुत्राश्चत्वारः सद्गुणाकराः[9] ।
सुरूपाः सुमहात्मानो रुच्या[10] प्रोष्ठपदोपमाः[11]. ॥ ४३

**य**देषां संभवो[12] देव्यो[13] गंधर्वा ननृतुर्जगुः ।
नेदुर्दुंदुभयो[14] दिव्याः पेतुः सुमनसश्च[15] खात्. ॥ ४४

---

१. गोपुच्छ=गोलाङ्गूल, काळतोंडे वानर. २७-५२ श्लोकांत दशरथाच्या पुत्रेष्टि नामक यागाचें वर्णन असून त्रैलोक्यपीडक रावणाच्या संहाराकरितां ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून अनपत्य जो दशरथ राजा याच्या गृहीं पुत्ररूपानें श्रीविष्णु अवतीर्ण झाला, विष्णूच्या साहाय्याकरितां इतर देवही निरनिराळ्या रूपांनीं अवतीर्ण झाले—असा कथाभाग आहे. २. पुत्रेष्टि यागापासून बाराव्या महिन्यांत, नाहीं तर 'तज्जाया जाया भवति यदस्यां जायते पुमान् । तस्यां पुनर्नवो भूत्वा दशमे मासि जायते' या वाक्याशीं विरोध येईल. ३. मंत्ररामायण—बालकांड—आर्या ४९ पहा. ४. कर्कटलग्नावर. ५. सर्प ज्याची देवता आहे तें सार्प म्हणजे आश्लेषा नक्षत्र. ६. कर्कटे. ७. मं० रा० बा० आर्या ५०-५२ पहा. ८. यमौ=जुळीं मुलें. ९. सद्गुणांचे आकर (खाणी). १०. कांतीनें. ११. प्रोष्ठपदा म्हणजे पूर्वाभाद्रपदा आणि उत्तराभाद्रपदा, या नक्षत्रांचे दोन दोन तारे आहेत, प्रोष्ठपदा नक्षत्राची उपमा ज्यांना शोभते असे, कारण प्रोष्ठपदेच्या तारांच्या जोडीप्रमाणें यांची देखील दोघादोघांची जोडी आहे. रामलक्ष्मण व भरतशत्रुघ्न यांची एकमेकांवर विशेष प्रीति असे असें ध्वनित केलें आहे. उक्तं हि पाद्मे—'युगं बभूवतुस्तत्र सुस्निग्धौ रामलक्ष्मणौ । तथा भरतशत्रुघ्नौ पायसांशवशात् स्वतः ॥'. १२. जन्म (झाला).. १३. अप्सरा नाचूं लागल्या व गंधर्व गायन करूं लागले. १४. दुंदुभि (भेरी) हें वाद्यांपैकीं 'वितत' वर्गांतील आहे. इंग्रजींत अशा वाद्यांना Percussion Instruments (आघात करून वाजविण्याचीं वाद्यें) म्हणतात. हें वाद्य दुं दुं अशा शब्दांनीं आकाश भरून टाकतें म्हणून याला तसें नांव पडलें. वाद्यांचे तत, वितत, घन व सुषिर असे चार वर्ग आहेत. इंग्रजी शास्त्राप्रमाणें Stringed, Percussion and Wind Instruments असे तीन वर्ग आहेत. १५, त्याला पाहून मनाला फार आनंद होतो म्हणून सुमनस् हें फुलाला नांव आहे. ह्या शब्दाचा प्रयोग नित्य स्त्रीलिंग बहुवचनीं आढळतो:—'आपः सुमनसो वर्षा अप्सराः सिकताः समा। एते स्त्रियां बहुत्वे स्युरेकत्वेऽप्यु-

**रा**जा महोत्सवे तस्मिन्विप्रादिभ्यो धनं मुदा ।
नानाविधं भूरि ददौ तदौदार्यं सुनिस्तुलम्. ॥ ४१

**म**हो महानयोध्यायामासीद्दशरथो यदा ।
चकार नामकरणं तेषामह्नि त्रयोदशे. ॥ ४६

**ज**ना जगुः श्रुतं राज्ञः सूनोर्ज्येष्ठस्य यत्कृतम् ।
नाम राम इति प्रेम्णा वसिष्ठेन पुरोधसा. ॥ युग्मकम्. ४७

**य**च्च पुत्रस्य कैकेय्या भरतेति तथा द्वयोः ।
लक्ष्मणेति सुमित्रायाः शत्रुघ्नेति च पुत्रयोः. ॥ ४८

**ज**गृहुः कृतसंस्कारा विद्याः सर्वाः कलाश्च ते, ।
श्रीरामस्त्वधिकस्तेषां ग्रहाणामिव भास्करः ॥ ४९

**य**थान्योन्यमतिस्निग्धौ कुमारौ रामलक्ष्मणौ ।

---

त्तरत्रयम् ॥' 'स्त्रियः सुमनसः पुष्पं प्रसूनं कुसुमं सुमम्' इत्यमरः. 'भूम्नि स्त्रियां सुमनसः' इति रत्नकोशः. 'सुमनाः पुष्पमालत्योः स्त्रियाम्' इति मेदिनीकरः. कारिकेंत बहुवचनीं मेदिनीकोशांत एकवचनीं देखील प्रयोग दृष्टीस पडतो. तेव्हां बहुधा हा शब्द बहुवचनीं आढळतो असेंच म्हणणें भाग पडतें. यतः 'प्रयोगमूला हि पाणिनिस्मृतिः ।' 'प्रयोगशरणा वैयाकरणाः ।' असें शिष्ट सांगतात. १६. खम् आकाशम्, तस्मात्.

१. त्या वेळीं राजा दशरथाच्या औदार्याला अगदीं सीमाच राहिली नाहीं. (सु=अतिशयेन, तुलायाः निर्गतम् सुनिस्तुलम्.) २. उत्सव. ('मह'शब्द अजन्त पुंलिङ्ग आहे). ३. 'नामकरणम्' म्हणजे 'नांव ठेवणें' हा बारा मुख्य संस्कारांपैकीं एक आहे. बारा मुख्य संस्कार येणेंप्रमाणें:—पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकर्म, सूर्यदर्शन, दोलारोहण, अन्नप्राशन, चूडाकर्म, मौञ्जीबंधन, केशान्त, विवाह, आणि अंत्येष्टि. या संस्कारांसंबंधानें मोनिअर् विलिअम्स् साहेब यांनीं आपल्या एका पुस्तकांत खालीं दिलेलें एक वाक्य आहे तें लक्ष्यांत ठेवण्याला योग्य आहे:—"A Hindu is *born religious* and he *dies religious*." ४. 'क्षत्रियस्य द्वादशाहं सूतकम्' इति श्रुतेः त्रयोदशे इत्युक्तिः. ५. श्रुतं=शास्त्रज्ञानम्. ६. ज्याच्या प्रीत्यर्थ 'पुंसवन' नांवाचा संस्कार होतो त्याला 'सूनु' ही संज्ञा प्राप्त होते. ७. 'कृतम्' याचा अर्थ 'कारितम्' असा करावा, कारण राजाला नामकर्मसंस्कार स्वतः करण्याचा अधिकार नाहीं, यास्तव पुरोहिताकरवीं करविला. येथें 'क्त'प्रत्यय अन्तर्भूतण्यर्थ आहे. ८. चौदाविद्या व चौसष्टकला. 'अंगानि वेदाश्चत्वारो मीमांसा न्यायविस्तरः । धर्मशास्त्रं पुराणं च विद्या ह्येताश्चतुर्दश ॥' या श्लोकांत चौदा विद्यांचीं नांवें आहेत. चौसष्ट कलांचीं नावें मुक्तेश्वरकृत आदिपर्व—पृ० १४८ टीप १ यांत दिलीं आहेत तीं पहा. ९. भासं करोति इति भास्कर=सूर्यः.

तथा भरतशत्रुघ्नौ क्षणार्धविरहासहौ. ॥ ५०

राघवोऽथ महाभागस्तेषां दारक्रियां प्रति ।
चिंतयामास धर्मात्मा सोपाध्यायः सबांधवः. ॥ ५१

महात्मनश्चिंतयतो मंत्रिमध्ये स तत्क्षणम् ।
गाधिजोऽभ्यगमद्राज्ञे द्वास्थैरावेदितो द्रुतम्. ॥ ५२

श्रीमंतं तं मुनिं राजा प्रत्युद्गम्य यथाविधि, ।
पूजयामास पूजार्हं ब्रह्माणमिव वासवः ॥ ५३

राजर्षिस्तमुवा'चार्य! यदर्थं त्वमिहागतः ।
तत्कार्यं ब्रूहि कर्ताहं, दैवतं हि भवान्मम.' ॥ ५४

महर्षिस्तद्वचः श्रुत्वा हृष्टरोमाभ्यभाषत, ।
'निश्चयं कुरु कार्यस्य भव सत्यप्रतिश्रवः. ॥ ५५

---

१. क्षण+अर्ध+विरह+असह=क्षणाच्या देखील अंशाचा वियोग ज्यांना सहन होत नसे असे. २. दारौपयिकी क्रिया=दारक्रिया म्हणजे विवाह, कारण त्या क्रियेनें पत्नी मिळते. ३. अमात्यजनामध्यें. दशरथ राजाचे वसिष्ठ व वामदेव हे महर्षि मुख्य प्रधान होते. हे दोघेही वेदशास्त्रसंपन्न होते. त्याशिवाय आणखी अष्टप्रधान होते. त्यांचीं नांवें:—(१) धृष्टि, (२) जयंत, (३) विजय, (४) सिद्धार्थ, (५) अर्थसाधक, (६) अशोक, (७) धर्मपाल आणि (८) सुमंत्र. हे सर्व शूर, राजकार्यपटु, सदाचरणी, विद्याविनयसंपन्न, कुलीन, पाप न करणारे, धैर्यवान्, गुणवान्, निगर्वी, उदार, व्यवहारदक्ष, धन्याचे हितेच्छु असे होते. [वा० रा० बाल० सर्ग ७ श्लो० २-१२ पहा.] मंत्री कसा असावा याचें वर्णन 'भारतनाट्यशास्त्रां'त केलेलें आहे तें असें:–'कुलीना बुद्धिसंपन्ना: श्रुतिनीतिविशारदाः । स्वदेश्याश्चानुरक्ताश्च शुचयो धार्मिकास्तथा ॥ ६९ ॥ अमात्या मंत्रिणश्चैव गुणैरेतैर्भवंति हि ॥ ७० पूर्वार्ध ॥ [अध्याय २४]. ४. द्वारपाल. द्वाःस्थ किंवा द्वास्थ, द्वारि तिष्ठति इति । वा विसर्गलोपः. ५. आपल्या आसनावरून उठून अतिथीकडे चार पावलें चालत जाऊन, सामोरें जाऊन. ६. बृहस्पतीला जसा इंद्र सामोरा जातो त्याप्रमाणें. 'बृहस्पतिर्देवानां ब्रह्मा' इति श्रुतेः. देवगुरुप्रमाणें गाधिज विश्वामित्र व इंद्राप्रमाणें राजा दशरथ ऐश्वर्यशाली होता–असा ध्वनितार्थ. [भट्टिकाव्यम्–स० १ श्लो० ५.] ७. वसूनि संति अस्य स वासवः. ८. हृष्ट+रोमन्=आनंदानें ज्याच्या आंगावर केंस उभे राहिले असा. सुखरोमांचित. ९. तुला काय करावयाचें आहे ह्याचा माझ्याकडून निर्णय करून घे आणि बोलल्याप्रमाणें करून सत्यप्रतिज्ञ हो. तिलककृतस्तु 'कार्यस्य निश्चयं कुरुष्व' इत्यस्य 'प्रतिपाद्यस्य कार्यस्य निश्चयं कर्तव्यत्वनिश्चयं सर्वथा करीष्यामीत्यङ्गीकारं कुरुष्व' इत्यर्थमभिदधते. नेयं समीचीना व्याख्या, पूर्वोक्तेन 'तत्कार्यं ब्रूहि कर्ताहं दैवतं हि भवान्मम' इति राजवचनेन सह विरोधात् । मदुक्तं राजा करिष्यति न वा इति संशयनिराकरणार्थं प्रथमं हि राजा 'कर्ताहं दैवतं हि भवान् मम' इत्युक्तवान् । किंवा राजानें मी आपलें कार्य करीनच, आज्ञा मात्र करा असें जरी म्हटलें तरी विश्वामित्र मुनि, पुनः विचार करून कार्य करण्याचा निश्चय कर असें राजाला म्हणूं लागले व अशा रीतीनें राजाला आपल्या वचनाचा पुनः विचार करण्यास अवकाश दिला. १०. सत्य+प्रतिश्रव (अंगीकार)=अमुक काम करीन असा स्वीकार ज्यानें करून त्याप्रमाणें काम केलें, असा. सत्यप्रतिज्ञ.

**ज**नेंद्र ! शृणु [1]**मा**रीचः **सु**बाहुश्च निशाचरौ ।
  यज्ञविघ्नकरौ शप्तुं तावहं नोत्सहे व्रती. ॥ ५६

[2]**य**मस्य विषयं नेतुं तौ खलौ [3]ब्राह्मणद्विषौ ।
  [4]काकपक्षधरं रामं पुत्रं मे दातुमर्हसि. ॥ ५७

**रा**त्रिचरवधे [5]देव ! दिव्येन स्वेन तेजसा ।
  मयाभिगुप्तः शक्तस्ते **रा**मः [6]**का**मप्रभाहरः. ॥ ५८

**मं**नुजेश ! प्रदास्यामि श्रेयश्चास्मै महत्तरम्, ।
  येन त्रिष्वपि लोकेषु परां ख्यातिं प्रयास्यति.' ॥ ५९

**ज**गाद **गा**धिजं राजा [7]पुत्रविश्लेषकातरः ।
  '[8]ऊनषोडशवर्षो मे **रा**मो [9]राजीवलोचनः. ॥ ६०

[10]**य**मींद्र ! राक्षसैरस्य न पश्याम्या[11]जियोग्यताम्, ।
  त्वं मे [12]बहिश्चरं प्राणं न **रा**मं नेतुमर्हसि. ॥ ६१

[13]**ज**न्यं कर्ताहमेवार्य ! राक्षसैस्तैः सह स्वयम् ।
  [14]अक्षौहिण्यानया सार्धं मां दासं नेतुमर्हसि. ॥ ६२

---

१. वा०रा० बाल०स०२२ श्लो०२७; वा०रा०बाल०स०२०श्लो०२५-२६ पहा. २. यमालयाप्रत. ३. 'द्विष्'शब्द हलन्त आहे. ४. काकपक्ष+धर=ज्याला झुलपें आहेत असा. ५. 'देव' हें संबुद्धिपद मुनीच्या तोंडीं शोभत नाहीं. वाल्मीकिरामायणांत 'राजशार्दूल' असें संबोधन आढळतें. 'साहित्य-दर्पणा'च्या सहाव्या परिच्छेदांत या संबंधीं माहिती दिली आहे:—'राजा स्वामीति देवेति भृत्यैर्भट्टेति चाधमैः । राजर्षिभिर्वयस्येति तथा विदूषकेण च । राजन्नित्यृषिभिर्वाच्यः सोऽपत्यप्रत्ययेन च.' भारतीय नाट्यशास्त्रांत ही असेंच सांगितलें आहे:–'देवेति नृपतिर्वाच्यो भृत्यैः प्रकृतिभिस्तथा । भेदेति सार्वभौमस्तु नित्यं प्रजनने नहि ॥ १ ॥ राजन्नित्यृषिभिर्वाच्यो ह्यपत्यप्रत्ययेन वा । वयस्य राजन्निति वा भवेद्वाच्यो महीपतिः ॥ ८० ॥ [अध्याय १७–काव्यमाला पृ० १८५.] ६. मदनसौंदर्यातिशायी. ७. पुत्र+विश्लेष+कातर=पुत्राच्या भावि वियोगामुळें अगदीं अधीर झालेला. पुत्र=पुन्नाम्नो नरकात् यस्मात् त्रायते पितरं सुतः । तस्मात् पुत्र इति प्रोक्तः, कातर=कु=ईषत्, तरति स्वकार्यं कर्तुं शक्नोति इति कातरः. ८. सोळा वर्षें ज्याच्या वयाला झालीं नाहींत असा. 'ऊनषो-डशवर्षः' हें हेतुगर्भविशेषण आहे. हें विशेषण जोडण्याचा राजाचे मनांतील हा हेतु कीं राम वयानें लहान असल्यामुळें धिप्पाड राक्षसांशीं युद्ध करण्यास असमर्थ होईल. 'षोडशवर्ष एव क्ष-त्रियकुमारः कवचधरो युद्धार्हं इति शास्त्रात्.' ९. राजीव+लोचन=कमललोचन. दलराजी ज्याला असते तें राजीव. १०. हें इंद्रियांचें दमन करणारांमध्यें श्रेष्ठ ! ११. आजि+योग्य+ता = युद्धक्षमता. १२. देहाच्या बाहेर संचार करणारा प्राणवायु. 'प्राण'शब्द हा बहुधा पुंलिङ्ग बहुवचनीं आढळतो. शरीरान्तःसंचारी वायुः प्राणः । 'वस्तुतस्तु स एकोऽपि उपाधिभेदात् प्राणापानादिसंज्ञां लभते' इति दीपिकायां अन्नंभट्टाः। 'पुंसि भूम्न्यसवः प्राणाः' इत्यमरः. 'तथाप्येष प्राणः स्फुरति न तु पापो विरमति' इत्युत्तरचरिते. १३. जन्यम्=युद्धम्. १४. कृष्णविजय–उत्तरार्ध–अध्याय ६६ श्लो० १० येथील टीप पहा.

यदि वा राघवं ब्रह्मन्! नेतुमिच्छसि सुव्रत!।
  चतुरंगसमायुक्तं मया सह च तं नय. ॥ ६३

राक्षसौ कस्य तौ पुत्रौ किंवीर्यौ कं समाश्रितौ।
  सर्वं मे शंस भगवन्! वृत्तं ब्रह्मद्विषोस्तयोः.' ॥ ६४

महर्षिः कथयामास, 'रावणानुचरौ खलौ।
  तौ मारीचसुबाहू द्वौ पुत्रौ सुंदोपसुंदयोः. ॥ ६५

श्रीमतागस्त्यमुनिना शप्तौ राक्षसतां गतौ।
  रावणप्रहितौ कर्तुं यज्ञविघ्नं महाबलौ.' ॥ ६६

राजा प्रोवाच, 'भगवन्! ब्रह्मदत्तवरः परः।
  नाहं तत्पुरतः स्थातुं शक्तः संग्राममूर्धनि. ॥ ६७

महेंद्रप्रमुखा देवाः सोढुं शक्ता न रावणम्,।
  मानवानां कथा कैव सुदुरात्मा श्रुतो मया. ॥ ६८

जगत्कर्त्रा ब्रह्मणा योऽनुगृहीतः स दानवः।
  हिरण्यकशिपुर्दैत्यस्तेजसायं सदा नवः. ॥ ६९

---

१. हस्त्यश्वरथपदातिरूपांगचतुष्टययुतं सैन्यम् चतुरङ्गम्. २. मागें पृ० १ टीप ५ पहा. ३. अगं विंध्याचलं स्त्यायति स्तभ्नाति इति अगस्त्यः। अथवा अगं विंध्यं स्तम्भयति इति अगस्तिः। पृषोदरादित्वात् इः। विंध्यपर्वत आणि मेरुपर्वत परस्परांच्या स्पर्धेनें वाढूं लागले, तेव्हां सूर्यमार्गांत अवरोध झाल्यामुळें देवांच्या इच्छेवरून अगस्तिमुनि विंध्यपर्वताकडे गेले. तेव्हां तो विंध्य नमस्कार करण्यासाठीं लवला. त्याला मुनींनीं आज्ञा केली कीं, 'मी परत येईपर्यंत तूं असाच रहा.' अशा रीतीनें त्याची स्पर्धा हतवीर्य करून सूर्यगमनाचा मार्ग मोकळा केला. [वा० रा० अरण्य० स० ११ श्लो० ८५.] ४. सुंदाच्या मरणानंतर ताटका अगस्त्यमुनीला त्रास देण्याकरितां गेली तेव्हां त्यानें तिला व तिच्या पुत्रांला शाप दिला. [वा०रा०बाल० स०२५ श्लो०९-१३.] ५. रावणानें प्रहित (पाठविलेलें). ६. वा०रा०बाल०स०१६ श्लो०४-६. 'नानाविधेभ्यो भूतेभ्यो भयं नान्यत्र मानुषात्.' ७. शत्रु. (रावण.) ८. संग्राममूर्धनि=रणशिरसि. रणांत सर्वांच्या पुढें होऊन लढण्याकरितां समर्थ नाहीं. ९. ज्यापुढें देवांचा देखील पाड नाहीं तेथें मानवांची काय कथा? कशाला गोष्ट सांगायाला पाहिजे? या ठिकाणीं अगस्त्यमुनीचा शाप, राजा दशरथाचें रावणाला ब्रह्मदेवाचा वर आहे हें सांगणें, व रावण हा हिरण्यकशिपुदैत्याचा अंश आहे इत्यादि कथाभाग नवीन घातला आहे. १०. 'हिरण्यकशिपुर्दैत्यस्तेजसायं सदा नवः' असा पाठ घेतला तर त्याचा अर्थ खालीं दिल्याप्रमाणें होईल:—ज्याच्यावर ब्रह्मदेवाचा अनुग्रह झाला तो खरोखर हिरण्यकशिपु दानव होय व त्याच्या तेजानें हा रावण सदा नूतन आहे, म्हणजे त्या हिरण्यकशिपुदैत्याचें तेज याचे ठायीं संक्रांत झालें आहे. 'सती च योषित् प्रकृतिः सुनिश्चला पुमांसमभ्येति भवान्तरेष्वपि' असें माघकाव्यांत म्हटलें आहे. अथवा 'हिरण्यकशिपोर्दैत्यतेजसायं सदा नवः' असें पाठांतर कल्पावें. या पद्यांत यमक नामक शब्दालंकाराचें 'सदानवः' हें उदाहरण आहे.

यमात्क्रूरतरः स्पष्टं रावणो लोकरावणः[1] ।
मर्त्यस्तेन विरोधं कः कर्ता नाहं क्षमो मुने!' ॥ ७०

राज्ञि तस्मिन्ब्रुवत्येवं संक्रुद्धः कौशिकोऽब्रवीत् ।
'अलं[2], गच्छाम्यहं राजन्! सुखी भव सुहृद्वृतः.' ॥ ७१

मन्योस्तस्य प्रभावज्ञो[3] वसिष्ठो भगवान्नृपम् ।
उवाच, 'नैनं राजर्षे! प्रत्याख्यातुं[4] त्वमर्हसि. ॥ ७२

जन्मनस्ते सुसाफल्यं क्षिप्रं रामं विसर्जय, ।
कृतास्त्रमकृतास्त्रं[5] वा गुप्तं[6] कुशिकसूनुना. ॥ ७३

यत्नवंतोऽपि नालं ते रामं धर्षयितुं परे. ।
कृशाश्वपुत्रास्त्रशतं[7][8] दत्तमस्मै[9] पिनाकिना[10]. ॥ ७४

जयायायमलं[11] तेषां विश्वामित्रो महायशाः. ।
तव पुत्रहितार्थाय त्वामुपेत्याभियाचते.' ॥ ७५

यशस्कारं गुरोर्वाक्यं स्वीकृत्य प्रकृतिं[12] गतः ।
राजा दशरथो राममाजुहाव सलक्ष्मणम्. ॥ ७६

राजमानं विशेषेण जनन्या समलंकृतम् ।
कृतस्वस्त्ययनं[13] नत्वा तं तस्मै मुनये ददौ[14]. ॥ ७७

---

१.लोकांना रडविणारा. २.अलम्=पुरे, पुढें बोलण्याचें प्रयोजन नाहीं. 'मिथ्यावादी त्वं सुहृद्वृतः सुखी भवेति विपरीतलक्षणयोक्तिः' इति तिलककृतः. 'पूर्वमर्थं प्रतिश्रुत्य प्रतिज्ञां हातुमिच्छसि । राघवाणामयुक्तोऽयं कुलस्यास्य विपर्ययः ॥ यदीदं ते क्षमं राजन्! गमिष्यामि यथागतम् । मिथ्याप्रतिज्ञः काकुत्स्थ! सुखी भव सुहृद्वृतः ॥' [वा० रा० बाल० स० २१ श्लो० २-३ पहा.] ३. वा० रा० बाल० स० ५५-५६ पहा. ४. 'प्रत्याख्यानं निरसनं प्रत्यादेशो निराकृतिः' इत्यमरः. ५. धनुर्विद्या शिकला असो किंवा नसो. ६. यस्मै पिनाकिना कृशाश्वपुत्रास्त्रशतं दत्तम् तेन कुशिकसूनुना विश्वामित्रेण गुप्तं कृतास्त्रमकृतास्त्रं वा ते रामं परे यत्नवंतोऽपि धर्षयितुं अलं न भवंति इत्यन्वयः. ७. कुशवंशांत झालेला. [वा० रा० बाल० स० ३४ श्लो० ५-६.] ८. 'सर्वास्त्राणि कृशाश्वस्य पुत्राः परमधार्मिकाः । जया च सुप्रभा चैव दक्षकन्ये सुमध्यमे ॥ ते सूतेऽस्त्राणि शस्त्राणि शतं परमभास्वरम् ॥.' (ते सूते सुवाते इत्यर्थः.) [वा० रा० बाल० स० २१ श्लो० १३-१५.] कृशाश्व नामक प्रजापतीला दक्षकन्याच्या ठायीं जे पुत्र झाले ते सर्व अस्त्ररूप होते. विश्वामित्र राज्य करीत असतां त्याला हीं पुत्ररूप अस्त्रें शिवानें दिलीं—अशी कथा आहे. ९. विश्वामित्राय. १०. पिनाक नांवाचें धनु ज्याचेजवळ आहे तो. (शिव.) [वा० रा० बाल० स० ५५ श्लो० १५-१९.] ११. समर्थ. १२. स्वस्थचित्त झाला, कारण आतांपर्यंत त्याची मनोवृत्ति फार क्षुब्ध झाली होती. १३. स्वस्त्ययन ज्यानें केलें आहे असा. प्रयाणाचे वेळीं ब्राह्मणांकडून 'स्वस्त्यस्तु ते, स्वस्त्यस्तु ते' असा उच्चार करवून संपादावयाच्या मंगलविधीला स्वस्त्ययन नांव आहे. [रघुवंश—स० २ श्लो० ७०]. १४. ददौ=स्वाधीन करिता झाला.

महोत्सवोऽभवद्वायुः सुखस्पर्शस्तदा ववौ ।
पुष्पवृष्टिर्महत्यासीद्देवदुंदुभिनिःस्वनः. ॥ ७८

श्रीमान्मुनिर्ययावग्रे ततो रामो महायशाः ।
काकपक्षधरो[1] धन्वी[2] तं च सौमित्रिरन्वगात्[3]. ॥ ७९

राजपुत्रौ धनुष्पाणी चारुरूपौ महामुनिम् ।
अनुजग्मतुरक्षुद्रौ पितामहमिवाश्विनौ. ॥ ८०

महर्षिमनुयातौ तौ महासत्वावनिंदितौ ।
स्थाणुं[4] देवमचिंत्यं तं कुमाराविव पावकी[5]. ॥ ८१

जनार्दनाय[6] गत्वासौ मुनिरध्यर्धयोजनम्[7] ।
बलां[8] चातिबलां विद्यां ददौ क्षुत्तृट्श्रमापहाम्[9]. ॥ ८२

यतात्मा[10]वास सरयू[11]तीरे ताभ्यां विभावरीम्[12] ।
स्थाणोरथाश्रमं गंगासरय्वोः संगमेऽगमत्[13]. ॥ ८३

राघवौ श्रीगुरोस्तत्र रुद्रनेत्राग्निना[14] कृतम् ।
श्रुत्वा कृतागसो[15] दाहं कामस्य मुदमापतुः. ॥ ८४

महेशशिष्यैर्मुनिभिः पूजितौ गुरुणा सह ।
उषित्वा[16] तरितुं रात्रिं गंगातीरमुपागतौ. ॥ ८५

जन्हुकन्यामुत्तरंतौ नावा मुन्युपनीतया ।

---

१. बालकोचितशिखाधरः २. धन्वं विद्यतेऽस्येति धन्वी. इन्नन्तोऽयं शब्दः. ३. सुमित्राया अपत्यं पुमान् सौमित्रिः.४. स्थाणु म्हणजे शिव, कारण तो महायोगी अविकार्य आहे. स्थाणुप्रमाणें अचल. स्थाणु=स्तंभ, Stump. ५. पावकस्य अपत्यं पुमान् पावकिः; तौ पावकी स्कंदविशाखौ. हा चरण जसा मूळांत आहे तसाच येथें ठेविला आहे. [स० २२ श्लो० ११.] ६. अर्द्यते-ऽभीष्टमसौ जनैरिति जनार्दनः, यद्वा जनं जननं अर्दयति इति. ७. अर्धाधिकयोजनम्. षट्क्रोशमिति यावत् इति तिलके. ८. बलातिबलाविद्यासंज्ञकं मंत्रसमूहम्. दूर चालून आल्यामुळें कदाचित् राजपुत्र थकून जातील यास्तव अन्नाशिवाय तृप्ति देणाऱ्या विद्येचा उपदेश केला. ९. क्षुध् +तृष्+श्रम+अपहा=क्षुधेपासून आणि तृषेपासून होणाऱ्या श्रमांला घालविणारी विद्या. [मंत्ररामायण–बाल० आर्या ५५.]१०. जितेंद्रिय. (विश्वामित्र.)११. सरसो यौति प्रवर्तते इति सरयूः. [वा० रा० बाल० स० २४ श्लो० ८-१०.] प्रथम दिवशीं रामानें शरयूनदीच्या दक्षिण तटावर एक रात्र मुक्काम केला. [स० २२ श्लो० ११.] १२. विभावरी=रात्रि. १३. दुसरे दिवशीं गंगासरयूसंगमीं वसति केली. [स० २३ श्लो० १६-१७.] १४. वा० रा० बाल० स० २३ श्लो० ५-१५; कुमारसंभवम्–सर्ग २-४.१५. कृत+आगस्=ज्यानें अपराध केला आहे त्याचा. १६. भर्गाश्रमे वसतिं कृत्वा.

मानसात्सरयूत्पत्तिं पुण्यां शुश्रुवतुर्गुरोः. ॥ ८६
यद्दारुणं वनं दृष्टं पृष्ट'मीदृक्कथं न्वि'ति. ।
कौशिकः प्राह, 'वत्सैतच्छृणु त्वां कथयाम्यहम्. ॥ ८७
जलजाक्ष! पुरा वृत्रहंतुर्हत्याहतद्युतेः ।
प्रायश्चित्तेन संत्यागस्तनोर्मलकरूशयोः. ॥ ८८
यस्माद्राघव! भद्रं ते, नाम्नेंद्रवरदानतः ।
मलदश्च करूशश्च जातौ जनपदाविमौ. ॥ ८९
राघवास्ते सुंदभार्या यक्षिणी कामरूपिणी ।
बलं नागसहस्रस्य धारयंती सुदारुणा. ॥ ९०
मदिरामांसनिरता ताटका नाम दुर्मतिः ।
मारीचमाता तातास्मिन्कानने ऽध्यर्धयोजने. ॥ ९१
श्रीमंस्त्वमागतां दुष्टां तामस्मद्वचनाज्जहि, ।
भविष्यति यशः पुण्यं पापमण्वपि ते न हि.' ॥ ९२
'राक्षस्येषा कथं जाता, बलं चास्यामियत्कथम्?' ।
इति पृष्टो मुनिः प्राह, 'वत्सैतदपि मे शृणु. ॥ ९३
महत्तपश्चकारैकः सुकेतुर्यक्षनायकः ।

---

१. कैलासपर्वते राम मनसा निर्मितं परम् । ब्रह्मणा नरशार्दूल तेनेदं मानसं सरः ॥'. [वा० रा० बाल० स० २४ श्लो० ८-९.] २. इंद्र. [वा० रा० बाल० स० २४ श्लो० १५-२३ पहा.] या भयंकर वनांत इंद्रानें ब्रह्मपुत्र जो वृत्रासुर त्याचा नाश केला. त्या ब्रह्महत्येच्या पापामुळें इंद्राला फार तहान लागली व तो निष्प्रभ झाला. नंतर गंगास्नान करून पुनः पूर्ववत् झाला. ३. गंगाजलस्नानरूप प्रायश्चित्त. 'कलशैः स्नापयामासुर्मलं चास्य प्रमोचयन् । इह भूम्यां मलं दत्त्वा देवाः कारूषमेव च ॥ शरीरजं महेंद्रस्य ततो हर्षं प्रपेदिरे । निर्मलो निष्करूषश्च शुद्ध इंद्रो यथाभवत् ॥'. ४. पापक्षुधयोः. ५. 'कथापि खलु पापानामलमश्रेयसे यतः' 'भद्रं ते' असे आशीर्वादरूप शब्द अमंगलाच्या निवारणार्थ उच्चारले. ६. जेथें इंद्राचा मल टाकिला त्या देशाला मलद व जेथें क्षुधात्याग केला त्याला करूष अशीं नांवें इंद्राच्या वरानें प्राप्त झालीं. [स० २४ श्लो० २३-२५.] ७. सुकेतु नांवाच्या यक्षाची कन्या, सुंदाची भार्या ताटका. ताटका ही यक्षकन्या असून सुंदासुराची भार्या झाली, कारण असुर आणि यक्ष यांस देवयोनित्व असल्यामुळें त्यांचा विवाहसंबंध उचित समजला जातो. [वा० रा० बाल० स० २५ श्लो० ५-८.] ८. वाटेल तें रूप धारण करणारी. ९. नगावर (पर्वतावर) उत्पन्न झालेला तो नाग=हस्ती. १०. 'तात' हा शब्द प्रेमातिशय किंवा लडिवाळपणा दाखवितो. ज्येष्ठकनिष्ठाला सारखाच लावतां येतो. ११. 'हन् (मारणें)' धातूचें आज्ञार्थाचें द्वितीयपुरुषैकवचनाचें 'जहि (मार)' हें रूप विशेषनियमानें सिद्ध झालें आहे.

ब्रह्मणास्मै सुता दत्ता बैलवत्यतिरूपिणी. ॥　　　　९४

जैलजासनलब्धां तां ताटकां नाम कन्यकाम् ।
जैंभपुत्राय सुंदाय प्रैादादतिबलां पिता. ॥　　　　९५

यक्षी मारीचनामानं सुत लेभे महाबलम्. ।
कृतापराधोऽगस्त्येन हतः सुंदो महात्मना. ॥　　　　९६

रौक्षसत्वमियं प्राप्ता सपुत्रा ताटका कुँधीः ।
पँतिघ्नं हंतुमिच्छंती शापात्तस्यातितेजसः ॥　　　　९७

मन्नियोगात्त्वया राम! हंतव्यैषातिदारुणा. ।
जातुचिल्लंघितो नाग्निः सुदृढेनापि दारुणा.' ॥　　　　९८

जँलदश्यामलो रौंमः 'श्रुतिराज्ञा तवाँर्य! मे.' ।

---

१. हिला एक हजार हत्तींचें बल होतें. ब्रह्मदेवाच्या वरानें हें बल प्राप्त झालें. (सर्ग २५ श्लोक ७.) २. जलापासून झालेलें तें जलज म्हणजे कमल. या शब्दाचा कमल किंवा पद्म असा अर्थ होतो, कारण 'जलज' हा शब्द योगरूढ आहे. [भाषापरिच्छेदमुक्तावली-कारिका ८१ पहा.] 'शक्त'पद चार प्रकारचें असूं शकतें:–१ यौगिक, २ रूढ, ३ योगरूढ व ४ यौगिकरूढ. पाचक, गो, पंकज व उद्भिद् अशीं क्रमानें त्यांचीं उदाहरणें होत. पहिल्या प्रकारच्या शब्दाचा अवयवार्थ समजला जातो; दुसऱ्याचा अवयवार्थ सोडून देऊन समुदायशक्ति मात्र घेतली जाते; तिसऱ्यांत अवयवशक्तिमध्यें समुदायशक्ति देखील असते; चवथ्यांत अवयवार्थ व समुदायशक्ति स्वतंत्रतेनें असतात; तिसऱ्यांत व चवथ्यांत भेद हाच कीं तिसऱ्यांत समुदायशक्तिच प्रधान असते व चवथ्यांत दोन्हीही शक्ति स्वतंत्र असतात म्हणजे त्या शब्दाचे दोन स्वतंत्र अर्थ होतात; जसें उद्भिद्=तरुगुल्मादि किंवा यागविशेष. ३. जंभासुराच्या मुलाला. ४. प्र+अदात्=दिली. प्रादात् हें 'दा' धातूचें लुङि तृतीयपुरुषैकवचनाचें रूप. ५. 'राक्षसत्व' या शब्दांत 'राक्षसी'शब्दाचा पुंवद्भाव दुर्घट आहे. कथासंक्षेपाच्या नादीं लागून कधीं कधीं शब्दांचे प्रयोग फार वेडगळ होतात, त्यांपैकीं हें उदाहरण होय. या ठिकाणीं ताटकेच्या संबंधानें 'राक्षसीत्वम्' असा प्रयोग पाहिजे व तिच्या मुलाचे संबंधानें 'राक्षसत्वम्' असा प्रयोग ठीकच आहे. 'राक्षसीत्व' असाच कदाचित् पंतांचा पाठ असेल. [सर्ग २५ श्लो० १२.] ६. कु+धी=जिची बुद्धि वाईट आहे अशी, दुर्बुद्धिः. ७. पतिं हंति इति पतिघ्नः तम्=पतीला मारणारा जो (अगस्त्य) त्यास. ८. सुदृढ म्हणजे फार कठीण देखील लांकूड अग्नीचें कधींही उल्लंघन करूं शकत नाहीं. याचा सरलार्थ असा:–ज्याप्रमाणें कितीही कठीण लांकूड (दारु) असलें तथापि त्याला अग्नि जाळतोच. त्याप्रमाणें अतिबला ताटका असली तरी तिला तूं खचित नाहींशी करशील. ९. मेघनील राम म्हणाला:–हे आर्य! आपली आज्ञा मला वेदवाक्याप्रमाणें मान्य आहे. १०. रमते लोकः अस्मिन् इति रामः. [रम्+अधिकरणे घञ्.] ११. आर्य=जो आपलें कर्तव्य उत्तमप्रकारें करतो आणि अकर्तव्य करीत नाहीं त्याला 'आर्य' असें म्हणावें. 'कर्तव्यमाचरन्काममकर्तव्यमनाचरन् । तिष्ठति प्रकृताचारे स वै आर्य इति स्मृतः ॥'.

इत्युक्त्वा सज्जकोदंडो [1]ज्यानिनादं तदाकरोत्. ॥ ९९
यक्षी श्रुत्वा महानादं [2]वात्येवाभ्यद्रवद्[3]रुषा ।
चकार गर्जनां घोरां [4]लयमेघघटेव सा. ॥ १००
जघान रामस्तां [5]मायां कुर्वतीं विकृताकृतिम् ।
लक्ष्मणेना[6]शुगैरुग्रै[7]श्छिन्नकर्णाग्रनासिकाम्. ॥ १०१
यशस्विनं मुनिं रामं [8]तुष्टावा[9]भ्येत्य [10]वासवः ।
ववर्ष दिव्यैः कुसुमैर्जगुर्गंधर्वसत्तमाः. ॥ १०२
'[11]रामायास्त्रशतं देही'त्युक्त्वेंद्रो [12]गाधिनंदनम् ।
ययौ हृष्टैः सुरैः स्वर्गं [13]भर्गं दृष्ट्वेव [14]तुष्टधीः. ॥ १०३
[15]महामना [16]मुनी रामलक्ष्मणाभ्यां समन्वितः ।
उवासैकां वने [17]तस्मिञ्शर्वरीं [18]शर्वरीतिभृत्. ॥ १०४
[19]श्रीकंठ इव सुप्रीतो [20]मूर्ध्न्युपाघ्राय कौशिकः ।
[21]दंडचक्राद्यस्त्रशतं ददौ रामाय धीमते. ॥ १०५

---

१. ज्या+निनाद=धनुष्याची दोरी+शब्द. २. वात्या=वावटळ, चक्रवात. ३. रुष्=क्रोध; रुषा=क्रोधानें. ४. लय+मेघ+घटा+इव=प्रलय+पयोद+समूह+सारखी=प्रलयकालीन मेघांच्या समुदायाप्रमाणें घोर गर्जना केली. ५. माया (कपट) करणारी=मायेच्या योगानें अनेक रूपें घेणारी. (सर्ग २६ श्लो० १९.) ६. आशुग=बाण, कारण त्यांचें गमन फार शीघ्र (आशु) असतें. ७. लक्ष्मणानें नाक व कान कापिले. ८. 'तुष्टाव' हें 'स्तु'धातूचें तृतीयपुरुषैकवचनाचें लिट्लकाराचें रूप होय. ९. येऊन. १०. इंद्र. ११. रामाला शंभर अस्त्रें दे असें. [सर्ग २६ श्लोक २९-३०.] १२. विश्वामित्राला. १३. त्रिपुरांतक. १४. संतृप्तमानस. ज्यानें कामादिक शत्रूंचें भर्जन (दहन) केलें तो भर्ग. १५. उदारधीः. १६. 'रो रि लोपः पूर्वाणो दीर्घश्च' या नियमानें मुनिशब्दांतील 'नि' अंत्याला दीर्घत्व आलें. १७. रजनीम्. अयोध्येहून प्रयाण केल्यावर तिसऱ्या दिवशीं ताटकावनांत रामानें मुक्काम केला. (स० २६ श्लो० ३५.) १८. शर्वस्य रीतिं बिभर्ति इति शर्वरीतिभृत्=शंकरासारखा जो (मुनि). १९. श्रीः शोभा कंठे यस्य स श्रीकंठः=शिवः. महादेवाच्या गळ्याचा वर्ण निळा व इतर अंगाचा वर्ण श्वेत होता त्यामुळें विलक्षण शोभा दिसत होती, म्हणून श्रीकंठ असें नांव पडलें. २०. विश्वामित्रानें रामाच्या मस्तकाचें अवघ्राण केलें. अवघ्राण करणें हें वात्सल्याचें व प्रेमातिरेकाचें दर्शक होय. २१. "दंडचक्र, धर्मचक्र कालचक्र, विष्णुचक्र, ऐंद्रचक्र, वज्र, शूल, ब्रह्मशिरोस्त्र, ऐषिकास्त्र, ब्रह्मास्त्र, धर्मपाश, कालपाश, वारुणास्त्र, पैनाकास्त्र, नारायणास्त्र, आग्नेयास्त्र, वायव्यास्त्र, मोहन, प्रस्वापन इत्यादि शस्त्रें तशींच, गदा, शक्ति, खड्ग इत्यादि शस्त्रें, रामा! मी तुला देतों. तूं मला प्रिय आहेस'. असें म्हणून ऋषीनें शुचिर्भूत होऊन पूर्वेकडे मुख करून उभा राहून मंत्राचा जप करून अस्त्रें आणि शस्त्रें रामास दिलीं. ऋषीनें मंत्र जपतांच अस्त्रदेवता मूर्तिमान् रामापुढें उभ्या राहून म्हणाल्या, 'रामा! आम्ही तुझे सेवक आहों.' राम त्यांस स्पर्श करून म्हणाला, 'स्मरण करीन तेव्हां मजपाशीं सिद्ध असा'. नंतर विश्वामित्रास रामानें नमस्कार करून ते पुढें चालूं लागले." (दाशरथिरामचरितामृत–पृष्ठ २७ पहा.)

रा[1]गवान्यत्र तपसि चिरं सिद्धाश्रमे प्रियम् ।
कश्यपादितिशक्राणां कर्तुं हर्तुं बलेः श्रियम् ॥ } युग्मकम्. १०६
महर्षिः पाययित्वा तद्वामनस्य यशोमृतम् ।
निन्ये तैमाश्रमं रामं विष्णुभक्त्यात्मना वृतम्. ॥ १०७

जहृषुस्तापसा दृष्ट्वा गाधिजं रामलक्ष्मणौ ।
सोत्साहौ षेडहोरात्रं तपोवनमरक्षताम् ॥ १०८

'यंष्टुमद्यैव दीक्षां त्वं प्रविशे'ति कृतांजली ।
राघवौ मुनिशार्दूलमूचतुस्तावेरिंदमौ. ॥ १०९

राजपुत्रौ समाश्लिष्य प्रहृष्टो मुनिपुंगवः ।
प्रविवेश तदा दीक्षां नियतो नियतेंद्रियः. ॥ ११०

---

१. श्लोक १०६-१०७ यांचा अन्वय असा:—यत्र सिद्धाश्रमे कश्यपादितिशक्राणां प्रियं कर्तुं बलेः श्रियं हर्तुं वामनः चिरं तपसि रागवान् आसीत् तत् वामनस्य यशोमृतम् महर्षिः पाययित्वा विष्णुभक्त्यात्मना वृतं रामं तम् आश्रमम् निन्ये. हिरण्यकशिपूचा पुत्र प्रल्हाद त्याचा पुत्र विरोचन त्याचा पुत्र बळी (जो प्रसिद्ध दानशूर) त्याची लक्ष्मी हरण करण्यासाठीं इंद्राच्या इच्छेवरून विष्णूनें वामनाचा अवतार घेतला. त्यानंतर वामन बळीजवळ येऊन त्रिपादभूमि दान मागूं लागला. तेव्हां शुक्राचार्यांनीं 'आपणांस वचनांत गोवून घेऊं नकोस' असें पुष्कळ सांगितलें. परंतु आचार्यांचें न ऐकतां त्यानें भूमिदानाचा संकल्प केला, कारण परमेश्वर याचक होऊन दान मागतो त्याला त्याच्यानें ना म्हणवेना. 'सर्वस्वदानीं बळि सिद्ध झाला । पूज्यासनीं बैसविलें द्विजाला ॥ प्रक्षाळि त्या श्रीपदपंकजातें । ध्याती रमा अब्जभवादि ज्यातें ॥ आली समीप यजमानिन पट्टराणी । पाहे हरीस न पुरेच जिची शिराणी ॥ ओती करीं कनकपात्र भरूनि वारी । सर्वस्व दे पति तयास न जे निवारी ॥ याच प्रसंगीं शुक्राचार्यांचा एक डोळा फुटला. अहो बळी भाग्यवंत । ज्याचे दारीं भगवंत । देतां जग अंतवंत । अनंतत्व पावला ॥. २. कश्यपमुनि अदितिसह तप करीत असतां त्यास विष्णु प्रसन्न झाला व त्यानें वामनावतार घेऊन अदितीच्या पोटीं जन्म घेतला आणि या ठिकाणीं तपश्चर्या केली म्हणून या स्थळाला 'सिद्धाश्रम' असें म्हणतात. वामनरूपी विष्णूच्या तपःस्थानाला 'सिद्धाश्रम' असें नांव आहे. [सर्ग २९—श्लो० ३-५.] ३. कश्यप अदिति आणि इंद्र यांचें हित करण्यासाठीं. ४. सिद्धाश्रमम्. या आश्रमांत राम चवथ्या दिवशीं आला [सर्ग २९ श्लो० २४-२५] व येथें पुरे सहा दिवस होता. ५. या आश्रमांत विश्वामित्रानें सहा दिवसपर्यंत यज्ञदीक्षा घेऊन मौन धारण केलें होतें, म्हणून रामलक्ष्मण सहा दिवसपर्यंत तपोवनाचें रक्षण करीत होते. [सर्ग ३० श्लोक १-५.] ६. 'षडहोरात्रं तपोवनमरक्षताम्' असेच शब्द मूळांत आहेत. [सर्ग ३० श्लो० ५.] ७. सर्ग २९ श्लोक २८-२९ यांत असेच शब्द आहेत. ८. मुनिश्रेष्ठ. 'सिंहशार्दूलनागाद्याः पुंसि श्रेष्ठार्थवाचकाः.' ९. शत्रूचें दमन करणारे. १०. हें श्लोकार्ध मूळांतही असेंच आहे. [स० २९ श्लो० ३०.] पंतांनीं मूळांतील चरण असे कोठें कोठें योजिले आहेत असें दिसतें. ११. निगृहीतांतःकरणः. [तिलकाख्यटीका—स० २९ श्लो० ३०.]

मर्दितुं राक्षसौ यत्तावनिद्रौ रामलक्ष्मणौ ।
सोत्साहौ षडहोरात्रं तपोवनमरक्षताम्. ॥ १११

जलदाविव मारीचसुबाहू नभसि स्थितौ ।
वेदीममेध्यवर्षेण दूषयामासतुः क्रतोः ॥ ११२

यत्तेन रामभद्रेण मारीचः शतयोजनम् ।
क्षिप्तोऽब्धौ मानवास्त्रेण वातेनेव तरुच्छदः. ॥ ११३

जवेनोत्सार्य मारीचं सुबाहुं कुणपाशनम् ।
ददाह रामोऽग्न्यस्त्रेण स्वनाम्नेवाघपर्वतम्. ॥ ११४

यशस्विप्रवरः शीघ्रं तयोरनुचरान्खिलान् ।
शेषान्वायव्यमादाय निर्जघान रघूद्वहः. ॥ ११५

राशिभिः पुण्यतपसां सर्वैराश्रमवासिभिः ।
ऋषिभिः पूजितो रामो यथेंद्रो विजये पुरा. ॥ ११६

'मम सिद्धाश्रमो राम! कृतोऽन्वर्थस्त्वये'त्यमुम् ।
प्रशस्य गाधिजस्ताभ्यां सायं संध्यामुपागमत्. ॥ ११७

श्रीरामः सानुजः प्रातर्विधिं कृत्वा कृतांजलिः ।
'किंकरः किं करोमी'ति गुरुं गाधिजमब्रवीत्. ॥ ११८

राजर्षिपुत्रं तं प्राह मुनि'र्जनकभूभुजः ।
यज्ञो भविष्यत्यचिराद्यास्यामस्तत्र भो! वयम्. ॥ ११९

मखं द्रष्टुं त्वमस्माभिः सह राम! गमिष्यसि ।

---

१. सर्ग ३० श्लो० १३ पहा. २. अमेध्य म्हणजे अपवित्र पदार्थ, रक्तमांसादि. मारीच व सुबाहु हे रक्तमांसाची वृष्टि करूं लागले असें मूळांत आहे. [स० ३० श्लो० १२-१३.] ३. रामाचें मानवास्त्र धनुष्याला लावून मारीचाच्या उरावर फेंकलें, तेव्हां तो शंभर योजनें लांब समुद्रांत पडला. ही गोष्ट सहावे दिवसीं झाली. [सर्ग ३० श्लो० १७-१८.] ४. तरु+छद=झाडाचें पान. ५. कुणप+अशन=शवें किंवा प्रेतें ज्याचें अशन आहे तो राक्षस. मारीचाला मानवास्त्राचे बलानें शतयोजन दूर फेंकून दिला. सुबाहु आग्नेयास्त्रानें भस्म झाला व इतर राक्षस वायव्यास्त्राचे योगानें दूर जाऊन पडले व तेथें नाश पावले. ६. राक्षसान्. ७. हें अर्ध मूळांत बहुतेक असेंच आहे. [स० ३० श्लो० १३.] ८. निजघान दूरोत्सारणपूर्वकं नाशनं वायव्यास्त्रफलं बोध्यम्. [तिलकाख्यटीका-स० ३० श्लो० २४.] ९. यज्ञसिद्धि झाल्यामुळें हा आश्रम 'सिद्धाश्रम' असा अन्वर्थनामक झाला. १०. सेवक. किं करोमि कुर्याम् वा इति स्वामिनं पृच्छति इति किंकरः । अथवा कुत्सितं करोति इति. 'काय करूं महाराज' असें विचारणारा सेवादक्ष चाकर याला किंकर म्हणावें. किंवा जो काम नीट करीत नाहीं, कारण चाकरच तो, म्हणूनही त्याला किंकर म्हणावें. ११. जनकश्चासौ भूभुक् च जनकभूभुक् तस्य जनकभूभुजः; दासजन इतिवत् समासः; भुवं भुनक्ति (पालयति) इति भूभुक्.

तत्र शंभोर्धनुर्दिव्यं द्रक्ष्यस्यमितविक्रमम् ! ॥ १२०

जनकस्य सभायां तद्विद्यतेऽरिनिबर्हणम्[1] ।
पादपद्ममिवेशस्य[2] सदा सद्भिः समर्चितम्. ॥ १२१

यत्सुरासुरगंधर्वराक्षसैर्वसुधाधिपैः ।
अशक्यारोपणं[3] राम ! धनूरत्नं[4] प्रयत्नतः.' ॥ १२२

राममुक्त्वैवमामंत्र्य कौशिको वनदेवताः[5] ।
सर्षिसंघः[7] सकाकुत्स्थः[8] स जगामोत्तरां दिशम्. ॥ १२३

महर्षिमनुजग्मुस्तं मृगाणां पक्षिणां गणाः ।
निवर्तयामास स तान्सर्वसत्वसुहृत्स्वयम्[9]. ॥ १२४

---

१. शत्रूंचें दमन करणारें धनु. २. 'पादपद्म' हें रूपक समासाचें उदाहरण होय. कारण अर्चनाचा संबंध पद्मशब्दाशीं निकटतर आहे. ३. अशक्यारोपणं धनुः=ज्यावर 'बाण लावणें' अशक्य आहे असें. 'आरोपण'शब्दाचा अर्थ टीकाकारांनीं 'शरप्रक्षेपयोग्यज्यासंबंधः' असा दिला आहे. [सर्ग ३१ श्लो० ९ टीका.] ४. धनुस्+रत्न=धनुष्यांच्या वर्गातील श्रेष्ठ धनु. 'रो रि ढो ढि च लोपः पूर्वाणो दीर्घश्च' या सूत्रानें मागील 'नु'ला दीर्घत्व आलें. रत्नशब्दाच्या अर्थासंबंधानें खालीं दिलेली पंक्ति लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे.—'जातौ जातौ यदुत्कृष्टं तद्रत्नमभिधीयते.' ५. विश्वामित्र वनदेवतांचा निरोप घेऊन उत्तरेस हिमालयाकडे जाण्यास निघाला. [सर्ग ३१ श्लो० १४-१६.] या श्लोकांतील पदें बहुतेक मूळांत आढळतात. ६. सर्व सृष्ट पदार्थांत परमात्मा व्यापून राहिला आहे अशी आर्यांची उदात्तकल्पना आहे. एका परमात्म्याशिवाय अन्य वस्तु नाहीं अशी देखील अद्वैतमतानुयायी आर्यांची पक्की समज आहे. अशाच प्रकारचे प्राचीनकाळीं ग्रीक व रोमन लोकांचे विचार होते असें त्यांच्या ग्रंथांवरून अनुमान करितां येतें. जिज्ञासु लोकांच्या विचारसरणीला तीक्ष्णता आणण्याकरितां खालीं कांहीं ऋचा देतों:—'सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्। स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्दशाङ्गुलम्॥ पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् । उतामृतत्वस्येशानो यदन्नेनातिरोहति ॥' (पुरुषसूक्तम्). 'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत् ।' [ऐतरेयोपनिषत्]. वरील अर्थाच्या प्रतिपादक ऋचा ईशोपनिषत्, कठोपनिषत्, मुंडकोपनिषत् वगैरे ग्रंथांत आहेत. ७. स+ऋषि+संघ=ऋषिगणासहवर्तमान असलेला. ८. स+काकुत्स्थ=रामलक्ष्मणांसहित. काकुत्स्थ=ककुदि (वृषांसे) तिष्ठति इति ककुत्स्थः' तस्य गोत्रापत्यं पुमान् काकुत्स्थः. पूर्वी इक्ष्वाकु वंशांत कोणी एक राजा महापराक्रमशील झाला. त्यानें देवांच्या आणि दैत्यांच्या युद्धांत इंद्राचे शत्रु मारून त्याला साहाय्य केलें. या प्रसंगीं इंद्रानें वृषभाचें म्हणजे बैलाचें रूप घेतलें, आणि या राजानें त्याच्या ककुदावर (कोळ्यावर) आरूढ होऊन वृषपर्वादिक दैत्यांचा संहार केला. या गोष्टीवरून या सूर्यवंशीय राजाला ककुत्स्थ (बैलाच्या कोळ्यावर बसणारा) अशी संज्ञा प्राप्त झाली. या पौराणिकी कथेचें वर्णन रघुवंश स० ६ श्लोक ७१,७२,७३ यांत केलें आहे तें पहा. (लेलेकृत रघुवंशाचें पद्यात्मक भाषांतर—पृष्ठ ८१, ८२.) या ककुत्स्थराजाचा पुत्र=काकुत्स्थ. ९. सर्व+सत्व+सुहृत्=सर्व प्राणिवर्गाचा सखा=विश्वामित्र. 'विश्वामित्र' शब्दाचा अवयवार्थ असाच आहे.

[1]जनितप्रमुदे [2]शोणातीरे रामाय पृच्छते ।
कथयामास पूर्वेषां मुनिर्माहात्म्यमा[3]त्मनः. ॥ १२५
ययावथ ततो देशा[4]न्गंगायास्तटमुत्तमम् ।
तत्राप्यकथय[5]द्गंगामाहात्म्यमखिलं मुनिः. ॥ १२६

---

१. जनित+प्रमुद्+चतुर्थीप्रत्यय=ज्यानें विश्वामित्राच्या मनांत आनंद उत्पन्न केला त्याला. विश्वामित्राला आनंद होण्याचें कारण हेंच कीं रामानें विश्वामित्राच्या पूर्वजांची माहिती विचारली; आणि असा सानंदाभिमान आपल्या पुण्यश्लोक पूर्वजांचे संबंधानें सुजाणाला व अजाणाला सारखा होणें हें साहजिकच आहे. २. 'शोण'नदाचेंच 'शोणा' हें नामांतर असें कोणी समजतात, परंतु खरोखर, 'शोणा' ही गिरिव्रजाजवळील नदी आहे. [सर्ग ३१ श्लो० २० टीका पहा.] अयोध्याप्रयाणापासून अकरावे दिवशीं शोणाकूलीं रामानें मुक्काम केला. ३. सर्ग ३२-३४ यांत विश्वामित्राच्या पूर्वजांचें वर्णन आहे. विश्वामित्राचा वंशवृक्ष असा आहे:—




४. बारावे दिवशीं शोणनदीतीरावरून निघून दोनप्रहरीं जान्हवीतीरावर राम आला. [स० ३५ श्लो० ६.] ५. गंगेची उत्पत्ति ३५ व्या सर्गांत वर्णिली आहे. गंगेचा वंश असा:—

मेरु (स० ३५ श्लो० १३-२०.)
|
मेना×हिमवान्
|
गंगा — उमा×रुद्र

जन्म [1]स्कंदस्य चरितं [2]सगरस्य च विस्तरात् ।
[3]गंगावतरणं पुण्यं कौशिकोऽकथयत्स्वयम्. ॥ १२७

यमुनायाः सखीं गंगामुत्तीर्य स तपोनिधिः ।
[4]विशालां नगरीं प्राप्य तत्रोवास महायशाः. ॥ १२८

[5]राघवेणा'र्थे कस्येयमि'ति पृष्टे प्रसंगतः ।
[6]क्षीरोदमथनं प्रोक्तं युद्धं देवासुरोद्भवम् ॥ १२९

[7]मरुतां जन्म च दितेस्तत्तपःस्थान उत्तमे ।
पुर्या इक्ष्वाकुवंश्येन विशालेन निवेशनम्. ॥ १३०

---

१. आदौ ईश्वरयोः सकाशात् स्कन्नः पश्चात् गङ्गाया गर्भात् परिस्नुत इति हेतोः स्कंदः । स्कंद परिस्नुत इत्यर्थे स्कंद इति पृषोदरादित्वात्साधुः–इति तिलके. [वा० रा० बाल० स० ३७ श्लोक २७.] स्कंद इत्यब्रुवन्देवाः स्कन्नं गर्भपरिस्रवे । कार्तिकेयं महाबाहुं काकुत्स्थज्वलनोपमम् ॥ २. 'सपत्न्या तु गरस्तस्यै दत्तो गर्भजिघांसया । सह तेन गरेणैव संजातः सगरोऽभवत्.' [स० ७० श्लो० २८-३७.] ३. गंगावतरणम्. [वा० रा० बाल० स० ४२-४४ श्लोक १४.] ४. विशालेन राज्ञा निर्मिता नगरी विशाला । 'अलंबुषायामुत्पन्नो विशाल इति विश्रुतः । तेन चासीदिह स्थाने विशालेति पुरी कृता ॥.' [वा० रा० बाल० स० ४७ श्लोक १२.] ५. तेराव्या दिवशीं भागीरथीच्या उत्तरतीरीं विशाला नगरींत रामानें मुक्काम केला. [सर्ग ४५ श्लोक ९.] ६. क्षीर+उदक= क्षीरम् उदकम् अस्य तस्य क्षीरोदस्य क्षीरसागरस्य मथनम् । 'उदकस्य उद उत्तरपदे उत्तरपदस्थस्य च संज्ञायाम्' इति सूत्रेण उदकस्य उदः इति आदेशः । [वा० रा० बाल० स० ४५.] देवासुरांला एकदां आपण अमर विजर व निरामय कसें व्हावें ही बुद्धि उत्पन्न झाली. त्यानंतर क्षीरसमुद्रमथनाची कृप्ति त्यांपैकीं कांहीं शहाणे होते त्यांनीं काढल्यावरून समुद्रमंथन केलें. त्यांत चवदा रत्नें निघालीं. मंथनाला सुरुवात होण्यापूर्वी विष्णूनें युक्तीनें असुरांना (दैत्यांना–दितिपुत्रांला) मंथनरज्जु झालेला वासुकि याच्या तोंडाकडे केलें व देवांना (आदित्यांना–अदितिपुत्रांला) पुच्छाकडून ओढायाला सांगितलें. पुढें वासुकीच्या तोंडांतून अतिदुर्धर हालाहल नांवाचें विष बाहेर आल्यामुळें पुष्कळ असुरांचा नाश अनायासें झाला व कांहीं देवही मेले. तें विष शंकरानें प्राशन केलें यामुळें शंकराला 'नीलकंठ' हें नांव पडलें. चतुर्दश रत्नांचीं नांवें:—धन्वंतरि, अप्सरा, वारुणी, उच्चैःश्रवाः, कौस्तुभ, अमृत, ऐरावत, लक्ष्मी, कामधेनु, हालाहल, शंख, चंद्र, पारिजात व शार्ङ्ग. [वा० रा० बाल० स० ४५ श्लो० ३२-३९.] अमृत निघालें तेव्हां देवासुरांत कलह उत्पन्न झाला त्यामुळें भयंकर युद्ध झालें. या प्रसंगीं कलह मिटविण्याकरितां विष्णूनें **'मोहिनी'**चें रूप धारण केलें व चंद्रसूर्यांचे सूचनेनें राहूचा तानवडरूपी सुदर्शनचक्रानें वध केला. वाल्मीकिरामायणांत या राहुवधाच्या गोष्टीस आधार नाहीं. ७. जेव्हां दितीनें पाहिलें कीं आपलीं मुलें मेलीं तेव्हां ती दुःखित होऊन कश्यप जो आपला भर्ता त्याला म्हणूं लागली कीं, 'इंद्राचा नाश करणारा मला मुलगा झाला पाहिजे.' तेव्हां कश्यपाच्या सांगण्यावरून तिनें ९९० वर्षेपर्यंत तीव्र तप केलें. त्यानंतर एके दिवशीं पतीच्या पायांकडील बाजूकडे डोकें करून व डोक्याकडील बाजूकडे पाय करून शय्येवर निजली. अशा

श्रीमता गाधिजेनेदं प्रोक्तं रामाय सादरम् ।
विशालाधिपती राजा सुमतिस्तानपूजयत् ॥ १३१

रात्रिं तत्रातिवाह्यायं मिथिलोपवनं ययौ ।
तत्र दृष्ट्वाश्रमं रम्यं निर्जनं मुनिपुंगवम् ॥ १३२

मधुरं मधुराभाषी मनुजेश्वरनंदनः ।
रामः पप्रच्छ, 'कस्येदं स्थानमीदृक् कथं प्रभो!' ॥ १३३

जगद्गीततपाः प्राह, 'वत्सासीदत्र गोतमः ।
सोऽहल्यया सहातिष्ठत्तपः सुचिरमात्मवान्. ॥ १३४

---

अशुचि स्थितींत तिला इंद्रानें पाहून तिच्या गर्भाचे वज्रानें सात तुकडे केले. गर्भाचा वध करीत असतां इंद्र त्या गर्भाला म्हणाला, 'मा रुदो मा रुदश्चेति=रोदन नको करूं'. [स० ४६ श्लोक २०.] याच कारणास्तव त्या सात गर्भशकलांना पुढें मारुत हें नांव प्राप्त झालें, [वा० रा० बाल० स० ४७ श्लो० ४-७.] मरुत् इत्येतत् पृषोदरादित्वात् साधु. ८. कुशाग्रवांतील विशाला नांवाच्या पूर्वदेशस्थ तपोवनांत.

१. विशालाधिपति काकुत्स्थतनय, याचें नांव सुमति. २. रामाच्या वेळीं विशालेंत सुमति नामक राजा होता. [स० ४७ श्लो० १७.] ३. चवदावे दिवशीं राम, लक्ष्मण व विश्वामित्र हे मिथिलेस गेले. [स० ४७ श्लो० १९; स० ४८ श्लो० ९; सर्ग ६५ श्लोक ३६-३७.] ४. मिथिलेंत पोंचल्यापासून १२ व्या दिवशीं म्हणजे २५ व्या दिवशीं जनकाच्या यज्ञाची समाप्ति झाली. [सर्ग ५० श्लोक १५-१६.] ५. पुंगव=पुमान् गौः=ऋषभ. मुनिपुंगव=मुनिश्रेष्ठ. 'स्युरुत्तरपदे व्याघ्रपुंगवर्षभकुंजराः । सिंहशार्दूलनागाद्याः पुंसि श्रेष्ठार्थगोचराः ॥.' ६. जगत्+गीत+तपस्=जगांनीं ज्याच्या तपाची फार प्रशंसा केली असा (विश्वामित्र). ७. अहल्या ही ब्रह्मदेवाची अतिरूपवती कन्या. 'जो पृथ्वीप्रदक्षिणा सर्वांच्या अगोदर करील त्याला ही कन्या देईन' असा पण ब्रह्मदेवानें केला होता. त्याप्रमाणें इंद्रानें पृथ्वीप्रदक्षिणा सायंकाळपर्यंत पूर्ण केली, परंतु त्याच्यापूर्वीं गोतमऋषीनें उभयतोमुखी (म्हणजे जिचा प्रसव होत आहे व वांसराचें मुख मात्र बाहेर आलें आहे अशी) गाय पाहून लागलींच तिला सात प्रदक्षिणा केल्या. त्यामुळें ऋषीला पृथ्वीसभोंवतीं सात प्रदक्षिणा केल्याचें श्रेय आलें. तेव्हां अहल्या ब्रह्मदेवानें ऋषीला दिली. इंद्रानें, आपल्या मनोरथाचा भंग अशा रीतीनें झाला, हें पाहून तिच्याविषयीं कामुकता धरिली. नंतर गोतमाच्या वेषानें तिशीं रममाण झाला. वाल्मीकिरामायणांत रत होणारा पुरुष इंद्र आहे असें अहल्येला माहीत होतें असें वर्णन आहे. (वा० रा० बाल० स० ४८ श्लो० १९।२०.) [मुनिवेषं सहस्राक्षं विज्ञाय रघुनंदन । मतिं चकार दुर्मेधा देवराजकुतूहलात् ॥ अथाब्रवीत् सुरश्रेष्ठं कृतार्थेनांतरात्मना । कृतार्थास्मि सुरश्रेष्ठ गच्छ शीघ्रमितः प्रभो ॥] ही गोष्ट आश्चर्यकारक मुळींच नाहीं. कारण फार जुन्या काळांतील पूर्वजांचे विचार ह्या संबंधानें फार निराळे होते असें अनेक उदाहरणांवरून दिसून येतें. अलीकडे तत्संबंधानें विचार अगदींच बदलल्यामुळें अहल्याधर्षणाच्या कथेंत इतर ठिकाणीं भेद दिसतो. वामनपंडितानें तर आपल्या

यथावदहल्यां बुभुजे शक्रो गोतमरूपभाक् ।
तया 'त्वं मां च रक्षे'ति प्रोक्तोऽगादुटजाद् द्रुतम्. ॥ १३५

राजानं द्युसदां ज्ञात्वा मुनिवेषं कृतागसम् ।
'अफलस्त्वं भवे'त्येवं मुनिवर्योऽशपद्रुषा. ॥ १३६

महेंद्रस्यर्षिशप्तस्य पेततुर्वृषणौ भुवि ।
तथा शप्त्वा च देवेशं भार्यामपि च शप्तवान्. ॥ १३७

'जयंतजनकेनासि यत्त्वं ज्ञात्वापि संगता ।
अदृश्या सर्वभूतानां वाताहारा भविष्यसि. ॥ १३८

यदैतच्च वनं घोरं रामो दशरथात्मजः ।
आगमिष्यति दुर्धर्षस्तदा पूता भविष्यसि. ॥ १३९

जगदेकपवित्रस्य रामस्याद्भुतकर्मणः ।
करिष्यसि यदातिथ्यं मत्संगं त्वं तदाप्स्यसि.' ॥ १४०

यथोक्तं तत्तथा जातं स गतस्तुहिनाचलम् ।

---

'अहल्योद्धारां'त अध्यात्मविद्यारूपी परिसाच्या योगानें कथेचें कृष्णस्वरूप बदलून टाकलें व उज्ज्वलरूप दिलें. इतकें मात्र लक्ष्यांत ठेवलें पाहिजे कीं वरील कथा इतर ग्रंथांच्या साहाय्यानें दिली आहे. ;वाल्मीकिरामायणांत अहल्याधर्षणाचें कारण देवकार्य, व तें करण्यासाठीं इंद्रानें भयंकर साहस केलें असें दिलें आहे. अहल्याकथा सर्ग ४८-४९ यांत आहे.

१. गोतम+रूप+भाज्=गोतमाच्या रूपातें धारण करणारा. २. 'अगात्' हें तृतीयपुरुषीं एकवचनीं 'लुङ्'चें रूप. ह्यांतील मूळ धातु 'इ', त्याचा 'गा' असा लुङांत आदेश झाला. ३. द्यु+सद्+प० प्रत्यय=स्वर्गांत राहणारे त्यांचा. दिवि सीदन्ति ये ते द्युसदः तेषाम्. ४. कृत+आगस्=ज्यानें अपराध केला आहे त्याला. ५. अ+फल=वृषणरहित. वाल्मीकिरामायणांत विगतवृषण होण्याचा शाप इंद्राला झाला असें लिहिलें आहे; परंतु पद्मपुराणांत 'अहल्याख्या शिला जज्ञे शतलिंगः कृतः स्वराट्' असें आढळतें. याकरितां त्या दोन गोष्टी भिन्न कल्पांत घडल्या असें मानून विरोधपरिहार केला पाहिजे. तथापि वा० रामायणांत ज्या श्लोकांत 'इंद्राला अफल हो' असा शाप दिला त्याच्या मागील श्लोकांत इंद्राला 'सहस्राक्ष' हें पद लाविल्याचें आढळतें. याचा उलगडा बहुश्रुत वाचक करितील अशी आशा आहे. ६. जयंत हें इंद्राच्या मुलाचें नांव. ७. समजून जाणून देखील. ८. शिलारूपप्राप्ति शाप कल्पान्तरीण आहे असें तिलककार म्हणतात. वाताहाराचा (वायुभक्षणाचा) शाप एवढ्याच करितां कीं अहल्येला झालेल्या पातकाचें क्षालन करण्याकरितां तीव्र तपश्चर्या घडावी. ९. दशरथ=दशसु दिक्षु रथः रथगतिः यस्य सः. दशरथाला 'दशरथ' असें नांव पडण्याचें कारण कालिदासानें रघुवंशांत सांगितलें आहे. [सर्ग ८ श्लोक २९.] १०. हिमालयम्=तुहिन+अचल.

मेषस्य वृषणौ दत्तौ जिष्णोर्[2]ऽग्निपुरोगमै[3]: ॥ १४१
रा[4]हुणेवामृतरुचे[5]र्मंडलं राम! सन्मुनेः।
क[6]लत्रं ग्रस्तमत्रास्ते दोषेण त्वं विमोचय ॥ १४२
मया सहाश्रमे तत्त्वं प्रविशाशु रघूत्तम!'।
इत्युक्तोऽसौ तथा चक्रे व[7]क्रेतरसुहृन्मणिः ॥ १४३
श्रीराम आश्रमे तस्मिन्प्रविष्टे गुरुणा सह।
सती सा[8]त्विकवृत्त्यासौ साकं प्रादुरभूत्क्षणात्. ॥ १४४
रा[9]हित्येनैन[10]सो येषां सौ[11]हित्येनाशु सा[12] सती।
शापस्यांतमुपागम्य [13]तेषां दर्शनमागता. ॥ १४५
महाविनयसंपन्नौ म[15]हामहददर्शनौ।
राघवौ तु तदा तस्याः पादौ जगृहतुर्मुदा[16]. ॥ १४६
'जये'त्युक्त्वा रामपादौ नत्वाहल्या सुदर्शना।
अ[17]र्घ्यं पाद्यं तथातिथ्यं चकार सु[18]समाहिता. ॥ १४७

---

१. इंद्राचे वृषण गळून पडले तेव्हां त्याला अग्न्यादि देवांनीं मेषाचे वृषण पितृदेवांची प्रार्थना करून दिले. त्या दिवसापासून त्याला 'मेषवृषण' हें नांव पडलें. एकनाथीरामायण—बालकांड, अध्याय १४ ओव्या ११३-१३२ ह्या वाचकांनीं अवश्य पहाव्या. २. जिष्णु=इंद्र. ३. दैवैः. (सर्ग ४९ श्लो० ५.) ४. राहुणा इत्यादि ही कवीची स्वताच्या कल्पनेची उपमा आहे, मूळांत नाहीं. ५. अमृताप्रमाणें तृप्ति देणारी रुचि म्हणजे किरणसमूह ज्याची तो. ६. कलं वीर्यं त्रायते इति कलत्रम्. ७. वक्र+इतर+सुहृद्+मणि=वक्रांहून जें भिन्न म्हणजे सरल त्यांचा सुहृन्मणि म्हणजे त्यांचा मोठा सखा. ८. सात्त्विक भावांसह. साठ हजार वर्षांनीं भगवद्दर्शनाचा लाभ झाल्यामुळें तिचें अंग रोमांचित झालें व तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रु गळूं लागले; ती गद्गदवाणीनें बोलूं लागून प्रकट झाली—असा भावार्थ. ९. श्लोक १४५ याचा अन्वयः—येषां साहित्येन आशु शापस्य अंतम् उपागम्य एनसो राहित्येन [उपलक्षिता] सा सती [जाता] तेषां दर्शनमागता. १०. एनस्=पातक. ११. सम्यक् हितः सुहितः, समोऽन्त्यलोपः। तस्य भावः तेन। सौहित्य=आनुकूल्य. १२. सा=पूर्वोक्ता प्रसिद्धा वा. [प्रक्रान्तप्रसिद्धार्थानुभूतविषयः तच्छब्दो यच्छब्दोपादानं नापेक्षते इति साहित्यविदः.] १३. तेषां=रामादीनां दर्शनविषया जाता. १४. हें अर्धं मूळांतही असेंच आहे. [सर्ग ४९ श्लो० १६.] १५. महत्+मह+द+दर्शन=ज्यांचें दर्शन मोठ्या मंगलाला देणारें आहे ते. या ठिकाणीं 'महत्' शब्दाला 'महा' असा आदेश झाला आहे. १६. हें अर्धं मूळांत असेंच आहे. [स० ४९ श्लो० १७.] १७. कोणी पाहुणा आपल्या घरीं आला असतां त्याला अगोदर पाय धुवायाला पाणी, त्यानंतर मधुपर्क, आणि मग इतर आतिथ्याचे प्रकार, अशी विशेषेंकरून जुन्या काळीं जुन्या लोकांची चाल होती. अजून ही जुन्याचालीच्या लोकांत असे आतिथ्याचे कांहीं प्रकार

यतिभिः स्वांतमध्ये यो ध्येयो वेदांतवेदिभिः ।
प्रतिजग्राह काकुत्स्थः प्रेम्णा पूजां तया कृताम्. ॥ १४८

रामायां मुनिवर्यस्य रामे च रघुनंदने ।
पुष्पवृष्टिर्महत्यासीद्दिव्यदुंदुभिनिःस्वनैः. ॥ १४९

महान्समुत्सवो ह्यासीद्गंधर्वाप्सरसां तदा, ।
'साधु साध्वि'ति देवास्तामहल्यां समपूजयन्. ॥ १५०

जगाम मिथिलां रामो गोतमेनाभिपूजितः ।
अहल्यां प्राप्य परमां कीर्तिं च मुदितात्मना. ॥ १५१

यजमानो मुनिं प्राप्तं श्रुत्वा सह पुरोधसा ।
शतानंदेन ऋत्विग्भिर्हृष्टः प्रत्युज्जगाम तम्. ॥ १५२

जनकः पूजयामास गाधिजं परमादृतः ।
तौ रामलक्ष्मणौ दृष्ट्वापृच्छत् 'कस्यात्मजावि'ति. ॥ १५३

'यदृच्छया भुवं प्राप्तावश्विनाविव सुंदरौ ।
भूषयंताविमं देशं चंद्रसूर्याविवांबरम्.' ॥ १५४

राजर्षिर्गाधिजः प्राह, 'प्रियौ दशरथात्मजौ ।
इमौ मया समानीतौ महाभागौ महाबलौ. ॥ १५५

---

दिसतात. पूर्वीच्या काळीं अतिथीला फार मान असे. 'पूजनीयो यथायोग्यं सर्वदेवमयोऽतिथिः' असें एक ठिकाणीं म्हटलें आहे. १८. अप्रमत्ता. हें अर्थ असेंच मूळांत आहे. [स० ४९ श्लो० १८.]

१. स्वनति इति स्वान्तम्. अथवा स्वनयति ध्यायति ब्रह्मरूपम् यस्मिन् इति स्वान्तम्. 'निःस्वनैः' यापुढें 'सह' अध्याहृत आहे. २. सर्ग ४९ श्लोक १९।२० पहा. ३. गोतम ऋषि हिमाचलावर होते तथापि योगबलानें रामागमन जाणून त्या स्थलीं प्राप्त झाले व त्यांनीं रामाची पूजा केली. [सर्ग ४९ श्लोक २१ टीका पहा.] ४. शतानंद=अहल्यापुत्र. ५. त्याला सामोरा गेला. ६. १५३-१५४ श्लोकांचें युग्मक आहे. ७. सौंदर्याच्या संबंधानें उपमा देणें झाल्यास अश्विनीकुमारांची किंवा नलकूबराची (कुबेरपुत्राची) उपमा देतात. संज्ञा नांवाची सूर्याची स्त्री होती. तिला सूर्याचें तेज सहन न झाल्यामुळें, ती छाया नांवाची आपली प्रतिकृति ठेवून आपण घोडीच्या रूपानें भूमीवर फिरत होती. हें सूर्य जाणून अश्वाचें रूप धारण करून बलात्कारानें, तिच्याशीं रममाण होऊं पहात होता, त्या प्रसंगीं त्यानें त्या घोडीच्या नासापुटांत रेतनिषेक केला व त्यानंतर तिला अश्विनीकुमारौ नांवाचे दोन पुत्र झाले. ते देवाचे वैद्य होत असा समज आहे. ८. हें अर्थ मूळांत असेंच आहे. [स० १० श्लो० २०.] ९. चंदति इति चंद्रः । सरति इति सूर्यः । अंबं शब्दं राति इति अंबरम् । शब्दगुणमाकाशमिति नैयायिकाः.

मद्यज्ञविघ्नशमनावहल्यागोतमार्चितौ ।
द्रष्टुं तव क्रतुं प्राप्तौ शैवं चात्यद्भुतं धनुः.' ॥ १५६

श्रीमाञ्ज्येष्ठः शतानंदो गोतमस्यात्मजो मुनेः ।
श्रुत्वा मातुः समुद्धारं प्रहृष्टो राममब्रवीत्. ॥ १५७

'राजपुत्र ! महाप्राज्ञ ! राजवंशविभूषण ! ।
स्वागतं ते नरश्रेष्ठ ! दिष्ट्या[2] प्राप्तोऽसि राघव ! ॥ १५८

मह्यां धन्यतरो राम ! त्वत्तो नास्तीह कश्चन, ।
गोप्ता[3] कुशिकपुत्रस्ते येन तप्तं महत्तपः. ॥ १५९

जगत्यधिपतिः[4] पूर्वमेष आसीन्महाबलः ।
जहार लोभात्सुरभिं[5] वसिष्ठस्य महात्मनः ॥ १६०

यवनैर्निर्जितः[6] क्रूरैः कल्माषीनिर्मितैरयम्[7] ।
हुंकारेण[8] वसिष्ठस्य दग्धसैन्योऽप्रभोऽभवत्. ॥ १६१

रामैष रुद्रमाराध्य प्राप्यास्त्राण्यद्भुतान्यपि ।
वसिष्ठब्रह्मदंडेन भग्नदर्पोऽभवत्पुनः. ॥ १६२

---

१. वर्षव्यौ वृद्धस्येति सूत्रेण ज्यादेशः इष्ठनि. २. भाग्येन. हें अर्ध मूळांत आहे. [स० ५१ श्लो० १३.] ३. अन्नदानादिना रक्षिता. ४. जगती+अधिपति=भूपाल. ५. सुरभिम्=वसिष्ठहोमधेनुम्. रामायणांत या धेनूचें नांव **'शबला'** दिलें आहे. [सर्ग ५२ श्लोक २१.] ६. यवन=म्लेच्छजातिविशेष. तर्कवाचस्पतिकृत 'शब्दस्तोमां'त तुरुष्क असा पर्यायशब्द दिला आहे. पाश्चात्य पंडितांनीं 'यवनाः शयाना भुञ्जते' या महाभाष्यांतील वाक्यावरून 'यवन' हे 'आयोनिअन' (Ionian) असावेत असा तर्क लढविला, कारण आयोनिअन (ग्रीक लोक) यांच्यांत ही चाल पूर्वी होती. ७. कल्माषी=शबला=चित्रवर्णा होमधेनु. [स०५२ श्लो० २०.] विश्वामित्र ज्या वेळीं शबलेचें हरण करूं लागला त्या वेळीं शबलेनें आपल्या अवयवांपासून यवन निर्माण केले. सुरभीनें आपल्या 'हुंभा' नामक रवानें पल्लव, शक, यवन, कांबोज, बर्बर, हरीत, किरात इत्यादि म्लेंच्छजातिविशेष निर्माण केले. [सर्ग ५४ श्लो० १७–२३.] विश्वामित्र ससैन्य वसिष्ठावरही धांवला, परंतु वसिष्ठाच्या हुंकारानें दग्धसैन्य होऊन हतवीर्य झाला. या योगानें क्षात्रतेजापेक्षां ब्रह्मतेजाचा मोठेपणा विश्वामित्राच्या मनांत चांगला बिंबला, व तेव्हांपासून तो उग्र तप करूं लागला. विश्वामित्राच्या शबलाहरणाच्या साहसाची कथा सुप्रसिद्ध आहे. [वा० रा० बाल० स० ५१-५६.] मोरोपंतकृत आदिपर्व-अध्याय ३३—काव्यसंग्रह—पृ० १७१-१८१ यांत ही विश्वामित्रवसिष्ठकथा आहे. ८. वसिष्ठाच्या हुंकारानें विश्वामित्राचे शंभर पुत्र भस्म झाले. [स० ५५ श्लो० ५६.]

मत्वा ब्राह्मं बलं श्रेष्ठं[1] तुच्छं क्षात्रमयं तदा ।
ब्रह्मत्वकारणं घोरं चकार सुमहत्तपः. ॥ १६३

[2]जगत्कर्ता जगामाब्दसहस्रांते सुरैर्वृतः ।
'मन्ये गाधिज ! राजर्षिं त्वा[3]मि'त्युक्त्वा दिवं ययौ. ॥ १६४

यत्कृतं तद्वृथा मत्वा भूय एव महातपाः ।
तपश्चचार रामायं [4]ब्रह्मर्षित्वाप्तये भृशम्. ॥ १६५

[5]जगत्प्रथित इक्ष्वाकुवंशजातो नृ[6]सत्तमः ।
त्रि[7]शंकुरिति यन्नाम वसिष्ठेन महात्मना ॥ १६६

यस्त्यक्तो गु[8]रुपुत्रैश्च नीतश्चांडालतां हठात् ।
स एनं शरणं प्राप्तोऽमुना संप्रेषितो दिवम्. ॥ १६७

---

१. 'धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजोबलं बलम् । एकेन ब्रह्मदंडेन सर्वास्त्राणि हतानि मे ॥' इति गाधिजोक्तिमनुसृत्येदं वर्णनम्. [स० ५३ श्लो० २३.] २. ब्रह्मा. ३. स० ५७ श्लो० ४-६ पहा. ४. ब्रह्मर्षित्व+आप्ति+चतुर्थीप्रत्यय=ब्रह्मर्षित्वाच्या प्राप्तीकरितां. ५. जगांत सुप्रसिद्ध. १६६-१६७ श्लोकांचें युग्मक आहे. ६. नरश्रेष्ठ. ७. त्रयः शंकवः कलुषानि पापानि यस्य सः । गुर्वाज्ञाभंगः, गुर्वतिक्रमः, चंडालस्य सतः क्षत्रिययाजकेन यज्ञारंभः च त्रयः शंकवः. त्रिशंकु ह्याला सशरीरस्वर्गप्रापक यज्ञ करण्याची इच्छा झाली. तेव्हां तो कुलगुरु वसिष्ठाकडे गेला. वसिष्ठानें त्याला 'ही अशक्य गोष्ट करण्याच्या नादीं लागूं नकोस' असें सांगून परत पाठविला. मग तो वसिष्ठाचे पुत्रांकडे गेला व त्यांच्याजवळही त्यानें तीच विनंति केली. गुरुपुत्रांनीं देखील 'यज्ञ करूं नकोस' असेंच सांगितलं. तेव्हां राजा ह्मणाला, 'जर तुम्ही सर्वच नाकबूल करितां तर मी अन्य याजकाकडे जातों.' हें ऐकून गुरुपुत्रांनीं 'तूं चंडाळ हो' असा शाप दिला, व त्याप्रमाणें तत्काळ चंडाल झाला, त्यानंतर चंडालवेषानेंच विश्वामित्राकडे गेला. विश्वामित्रानें याजक होण्याचें कबूल केलें व यज्ञही केला, तथापि सशरीरस्वर्गप्राप्ति राजाला झाली नाहीं. तेव्हां आपल्या पुण्यानें त्रिशंकूला स्वर्गाला पाठविला, परंतु तेथून इंद्रानें त्याला खालीं लोटून दिला. त्रिशंकूनें खालीं पडत असतां विश्वामित्राचा धांवा केला. तेव्हां विश्वामित्रानें आपल्या तपोबलानें त्याला अंतराळीं स्थिर केला, व त्याच्याकरितां नवीन स्वर्ग तयार करण्याची प्रतिज्ञा केली व त्याप्रमाणें नवीं नक्षत्रें व सप्तर्षि तारे इत्यादि [सर्ग ६० श्लोक २१-३२.] कांहीं भाग तयारही केला—अशी कथा आहे. या त्रिशंकूच्या गोष्टीवरूनच 'त्रिशंकुरिव अंतरा तिष्ठ' अशी म्हण पडली. [वा० रा० बाल० स० ५७-६०.] क्षत्रियत्वेऽपि याजने प्रवृत्तिः, तत्रापि चंडालयाजने प्रवृत्तिः, ब्राह्मणेषु वासिष्ठेषु वधादिकृत्या प्रवृत्तिः एतत्सर्वं ब्राह्मणत्वेच्छया प्रवर्तमानतपसो विनाशाय दैवकृतमिति बोध्यमिति तिलककृतः. त्रिशंकु हा दक्षिणध्रुवाचा तारा. याच्या देखील सभोंवतीं फिरणारें सप्तर्षिमंडळ आहे. ८. वासिष्ठैः. (सर्ग ५८ श्लो० ९-११.)

रामान्यामद्भुतां सृष्टिं कर्तुमेष समुद्यतः ।
प्रार्थितस्त्रिदशैः सर्वैर्विरराम महायशाः. ॥ १६८
'महान्विघ्नः प्रवृत्तोऽत्र' इति मत्वायमीश्वरः ।
पुष्करेषु तपस्तेपे रामभद्र! महातपाः. ॥ १६९
श्रीमानयं शुनःशेपं मृत्युपाशादमोचयत् ।
अंबरीषाध्वरे राम! यत्कृते शप्तवान्सुतान्. ॥ १७०

---

१. तिस्रो दशाः जन्मसत्ताविनाशाख्याः न तु वृद्धिपरिणामक्षयाः मर्त्यानामिव दशाः येषां ते. अथवा त्र्यधिकाः त्रिरावृत्ताः दश परिमाणमेषां ते त्रिदशाः. २. 'त्रिशंकुरूपो महाविघ्नोऽस्माकं तपोनाशकत्वात्प्रवृत्तः' इत्यादि टीका पहा. [स० ६१ श्लो० १-५.] त्रिशंकुच्छायेनें व्यापिलेला दक्षिण-दिशेकडील देश तपश्चर्येला अयोग्य असें समजून विश्वामित्र मुनि विशालतपोवनयुक्त पश्चिमदिशेस पुष्कर नामक तीर्थविशेषाच्या तीरीं तप करूं लागला. ३. कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं समर्थः. ४. पुष्करतीर्थ अजमीराजवळ तीन कोसांवर आहे तेथें आदिवराहाची मूर्ति आहे. याची गणना सुप्रसिद्ध 'पंच-सरोवरां'त आहे. "पुष्करराज, हें अजमीरपासून तीन कोस आहे. तेथील ब्राह्मणास पुष्कर ब्राह्मण किंवा पोखर्णे म्हणतात. शिवाय तेथें छनात नांवाचे ब्राह्मणही आहेत. छनात म्हणजे सवाई जयसिंगानें एकत्र केलेल्या सहा ज्ञाती, त्याः—१ खंडेलवाळ, २ गौड, ३ सारस्वत, ४ दायमा, ५ पारीख, व ६ पुष्करणे. यांची एक पंगत करून त्यांनीं क्षत्रियांचें अन्न घ्यावें असें ठरविलें. पुष्कर हें सरोवर डोंगरांत असून त्यांत पाणी फार खोल व उत्तम आहे. या क्षेत्रीं देवळें फार आहेत. त्या नजीकच ज्येष्ठ, कनिष्ठ व मध्यम असे तीन पुष्कर आहेत." [लोकहितवादीकृत ऐतिहासिक गोष्टी—भाग दुसरा. पृ० ४.] ५. शुनः इव शेपः शेफो वा यस्य सः. अलुक् समासः. शुनःशेपाला (शुनःशेप हा विश्वामित्राच्या सत्यवती नामक बहिणीचा पुत्र होय. 'पूर्वजा भगिनी चापि ऋचीके प्रतिपादिता । नाम्ना सत्यवती नाम मम राघव! सुव्रता ॥'—वा० रा० बाल० स० ३४ श्लोक ७) मुक्त करण्याचे वेळीं क्रोध उत्पन्न करून विश्वामित्राचा तपोभंग केला हें ब्रह्मत्वप्राप्तीच्या उद्देशानें केलेल्या उग्र तपाला दुसरें मोठें विघ्न देवांनीं केलें. अंबरीष नांवाचा राजा यज्ञारंभ करणार होता तोंच त्याचा यज्ञीय पशु इंद्रानें हरण केला. तेव्हां ब्राह्मणांनीं सांगितलें कीं, 'राजा! पशु आण किंवा मनुष्य आण, नाहीं तर तुझें अनिष्ट होईल.' राजानें पशूचा पुष्कळ शोध केला परंतु तो मिळाला नाहीं; म्हणून ऋचीक नांवाच्या ऋषीजवळ जाऊन 'कांहीं द्रव्य घेऊन आपल्या मुलांपैकीं एक मुलगा मला दे' असें राजानें ऋषीला म्हटलें. त्यानंतर ऋषी म्हणाला, 'मी वडील पुत्राला देणार नाहीं,' आई म्हणाली, 'मी धाकट्या मुलाला देणार नाहीं.' हें बोलणें मधल्या मुलानें ऐकलें व तो राजाला म्हणाला, 'राजा! मी तुझ्याबरोबर येण्याला तयार आहें. माझ्या बापाला द्रव्य दे.' राजानें द्रव्य देऊन त्या मुलाला बरोबर घेतला व वाट चालून पुष्करतीर्थी मध्याह्नीं पोहोंचला. तेथें विश्वामित्र तप करीत होता, त्याला शुनःशेपानें ओळखून मोठ्यानें त्याच्याजवळ रोदन करून आपलें सर्व वर्तमान त्याला सांगितलें. तेव्हां विश्वामित्राला दया येऊन त्यानें आपल्या मुलांपैकीं एकाला शुनःशेपाकरितां देह खर्ची घालून त्याचें सार्थक्य करून घेण्याचा उपदेश केला. तें त्यांना आवडलें नाहीं.

राघवायं तपस्तेपे दशवर्षशतान्यमुम् ।
'ऋषिस्त्वमसि भद्रं ते' इति ब्रह्माब्रवीत्पुनः. ॥ १७१

महत्तपः पुनश्चक्रे तत्रापि स्नातुमागताम् ।
दृष्ट्वैव मेनकां देवीमभजद्दशवत्सरान्. ॥ १७२

जनाधिपैष तत्रापि ज्ञात्वा देवैस्तपो हृतम् ।
कौशिकीतीरमासाद्य तपस्यामकरोत्पराम्. ॥ १७३

यतात्माब्दसहस्राणि तपः पर्वत उत्तरे ।
घोरं चकार रामास्माद्देवतानामभूद्भयम्. ॥ १७४

राजीवासन एत्याह, 'महर्षे! वत्स! कौशिक! ।
महत्त्वमृषिमुख्यत्वं ददामि तव तोषितः.' ॥ १७५

महादेवमुवाचायं भवान्, ''यद्धि पितामह! ।
ब्रह्मर्षिरिति मां नाह किमहं न जितेंद्रियः?' ॥ १७६

---

तेव्हां विश्वामित्राला क्रोध आला व त्याच्या भरांत त्यानें आपल्या मुलांला शाप दिला. शुनः-शेपाला आग्नेय मंत्राचा उपदेश केला व इंद्रोपेंद्रदैव नामक गाथा शिकविल्या. त्या मंत्रांच्या योगानें शुनःशेप दीर्घायु झाला. [वा० रा० बाल० स० ६१-६२.] ६. सर्ग ६२ पहा.

१. पुष्करतीर्थी केलेल्या तपाचा, पुत्रांना शाप दिल्यामुळें, नाश झाला. तेव्हां पुनः हजार वर्षें तपश्चर्या केली. अनंतर ब्रह्मा येऊन 'तूं ऋषि आहेस' असें बोलून चालता झाला. मागें त्याला 'राजर्षि' म्हटलें होतें, आतां 'ऋषि' असें म्हणाला, त्यावरुन क्षत्रजातिविशेष सूचित केला आहे. २. रूपलावण्यसंपन्ना स्त्री. ३. 'जनाधिप' हें संबोधनयुक्त दिसत नाहीं, कारण कुमार राम राजा नव्हता. 'वाल्मीकिरामायणां'त 'रघुनंदन' हें संबोधन आढळतें. दुसऱ्या कोणाला उद्देशून हें संबोधन योजलेलें नाहीं, कारण 'रामायणां'त 'शतानंदो महातेजा रामं वचनमब्रवीत्' असें लिहिलें आहे, करितां 'सिद्धस्य गतिश्चिंतनीया' या न्यायानें 'जनरक्षक' असा अर्थ करणें इष्ट आहे. ४. ऋचीकाला दिलेली विश्वामित्राची भगिनी सत्यवती हिनें पतिसहगमन केलें व ती दुसऱ्या जन्मांत कौशिकी नांवाची नदी झाली. [वा० रा० बाल० स० ३४ श्लोक ७-९ पहा.] ५. अब्द=संवत्सर. ६. राजीव+आसन=कमल+आसन. (ब्रह्मदेव.) कमळामध्यें दलराजी असते म्हणून कमलाला 'राजीव' म्हणतात. ७. 'वत्स' हें संबोधन प्रेमातिशय दार्शवितें. ८. तव=त्वया. [तोषित=तुष्+णिच्+क्त.] ९. पितामह ब्रह्मदेव याला 'महादेव' असें म्हटलें तें योग्यच आहे, कारण त्यानें आपल्या अद्भुत शक्तीनें हें ब्रह्मांड निर्माण केलें. १०. कौशिक. ११. या श्लोकांत 'यद्धि' पाठाच्या जागीं 'यदि' असा अन्य कल्पित पाठ पाहिजे तर घ्यावा. १२. 'ब्रह्मर्षिः' ही प्रथमा 'इति' शब्दाच्या योगानें झाली. 'अव्यये चेति सूत्रेण इतियोगे प्रथमा. 'वदंत्यपर्णेति च तां पुराविदः' [कुमारसंभव—सर्ग ५ श्लोक २८], 'क्रमादमुं नारद इत्यबोधि सः' [शिशुपालवध—सर्ग १ श्लोक ३].

जागून सुग्रीव माझा उपकार जाणील ह्यांत मशय नाहीं. तस्मात्, हे शुभलक्षणसंपन्न लक्ष्मणा, सुग्रीवाचें मन स्वस्थ होऊन नद्यांचें जल निर्मळ होण्याची इच्छा धरणारा मी प्रस्थानकालाची वाट पहात राहिलों आहें. कोणीं उपकार केला असतां वीर पुरुष त्याच्यावर प्रत्युपकार अवश्य करीतच असतो. कारण, दुसऱ्याचा उपकार झाला असतां जो कृतघ्न बनून त्याच्यावर प्रत्युपकार करीत नाहीं, त्याची उपकार करणाऱ्या सामर्थ्यवानाशीं मैत्री रहात नाहीं."

ह्याप्रमाणें रामांनीं लक्ष्मणाला सांगितलें असतां, त्यांच्या भाषणाला मान देऊन व तें लक्ष्यांत आणून लक्ष्मणानें हात जोडिले, आणि आपला सुविचार दर्शविण्याच्या उद्देशानें तो म्हणाला "राजा, ह्या म्हणण्याप्रमाणें आपला सर्व मनोरथ थोडक्याच दिवसांनीं वानरराज सुग्रीव सिद्धीस नेईल. तेव्हां शत्रूचा निग्रह करण्याचा निश्चय करून आपण शरदृतूची प्रतीक्षा करीत रहा, आणि एवढा हा पर्जन्यकाल सरेपर्यंत धीर धरा."

## सर्ग एकोणतिसावा.

—:०:—

### हनुमंताची रामकार्याविषयीं सुग्रीवाला सूचना.

ज्यांतील विद्युल्लता व मेघ नाहींतसे झाले आहेत, जेथें सारस पक्ष्यांच्या समुदायांचा ध्वनि सुरू झाला आहे, आणि रमणीय चंद्रिकेचा थर ज्यामध्यें बसून राहिलेला आहे, असें निर्मल आकाश अवलोकन करून हनुमान सुग्रीवाकडे गेला. त्या सुग्रीवाचा मनोरथ परिपूर्ण झालेला होता, धर्म आणि अर्थ ह्यांचा संग्रह करण्याकडे त्याचें विशेषसें लक्ष्य नव्हतें. कामप्रवृत्तिरूप दुर्जनमार्गाचें अवलंबन तो अतिशयच करीत होता, विषयोपभोगाला योग्य अशा एकांत प्रदेशाचे ठिकाणीं त्याचें चित्त अगदीं वेधून गेलेलें होतें, कार्यसिद्धि होऊन राज्यप्राप्तीचाही त्याचा उद्देश सिद्धीस गेलेला होता, इतकेंच नव्हे, तर दुसरेही त्याचे सर्व इष्ट मनोरथ परिपूर्ण झालेले होते. तो सर्वदा तरुण स्त्रियांचेच ठिकाणीं रममाण होऊन राहिलेला होता, योग्य व इष्ट अशी स्वतःची स्त्री व तारा त्याला प्राप्त झालेली होती, कृतकृत्य झाल्यामुळे निश्चित होऊन तो अहोरात्र क्रीडा करण्यामध्येच दंग झालेला होता. आणि म्हणूनच गंधर्व व अप्सरा ह्यांच्या समुदायासहवर्तमान क्रीडा करीत असलेल्या देवराज इंद्राप्रमाणें तो भासत होता; मंत्र्यांवर त्यानें सर्व काम सोंपविलेलीं होतीं, इतकेंच नव्हे, तर मंत्र्यांची तो कधीं भेटही घेईनासा झाला होता; आणि राज्याविषयीं सर्व प्रकारची भीति नाहींशी झाली असल्यामुळें विषयलंपट पुरुषाप्रमाणें त्याची अवस्था झालेली होती. तेव्हां भाषणाचें सार जाणणाऱ्या वानरराज सुग्रीवाचें मन मुदेसून आणि मनोहर अशा नानाप्रकारच्या भाषणांनीं वळवून, सर्व शास्त्रार्थाविषयीं निश्चय झालेला, कोणत्याही गोष्टीचें तत्त्व जाणणारा, आणि कालाला अनुसरून असणारे विशेष धर्म जाणणारा संभाषणज्ञ वायुपुत्र हनुमान, विनय आणि प्रेम ह्यांनीं संपन्न असून स्वतःचें वचन खरें करण्याविषयीं निश्चित असलेल्या वानरराज सुग्रीवाचे समीप गेला, आणि तत्काल व परिणामींही हितकारक, सत्य, साम, धर्म, अर्थ आणि नीति ह्यांनीं भरलेले भाषण त्याच्याशीं करूं लागला.

हनुमान म्हणालाः—राज्य व यश प्राप्त झाले ... कुलपरंपरागत वैभवही आपण वाढविलें आहे. आतां फक्त मित्राचा संग्रह उरलेला आहे; ह्यास्तव तेवढें कार्य आपण सांप्रत ... जो प्रसंग जाणून ... पुरुष मित्राशीं ... चांगल्या रीतीनें वागतो, त्याचे राज्य ... प्रताप ह्यांची अभिवृद्धि ... त्याचप्रमाणें खजिना, सैन्य,

ज्याचीं एकसारखीं स्वाधीन असतात, त्याला मोठें राज्य प्राप्त होत असतें. तस्मात्, ज्या अर्थी आपण सदाचारसंपन्न असून निर्भय मार्गाचें अवलंबन करणारे आहां, त्या अर्थी मित्राकरितां केलेली प्रतिज्ञा योग्य रीतीनें आतां आपण शेवटास न्यावी. कारण, सर्व कामें एका बाजूला ठेवून मित्रकार्याकरितां विशेष उत्साह धरून जो सत्वर झटत नाहीं, तो संकटानें घेरून जात असतो. मित्रकार्याची वेळ निघून गेल्यावर जो ती सिद्धीस नेण्याकरितां झटतो, त्याच्या हातून मोठमोठीं कार्यें झालीं असतांही मित्रकार्य सिद्धीस नेल्याचें फल त्याला प्राप्त होत नाहीं. ह्यास्तव, हे शत्रुदमना, हें आपलें मित्रकार्य करण्याची वेळ निघून जाणार आहे. तस्मात्, सीतेचा शोध लावणें हें राघवाचें कार्य आतां केलें पाहिजे. काळवेळ जाणणाऱ्या व तुझ्या स्वाधीन असलेल्या त्या रघुकुलवंशजश्रेष्ठ रामचंद्राला जरी स्वतःचें काम सिद्धीस नेण्याची त्वरा आहे, तरी तो एखाद्याला ओळखून चालणारा असल्यामुळें, कार्याचा समय निघून जात असल्याविषयीं तुला सूचना करणार नाहीं. रघुवंशज रामाचा प्रभाव अतुल असून तो स्वतःही गुणांनीं अप्रतिम आहे; इतकेंच नव्हे, पण तुझा तर तो नेहमीं कायम रहाणारा बंधु असून, तुझ्या मोठ्या कुळाच्या अभिवृद्धीला कारण होणारा आहे. शिवाय, त्यानें तुमचें कार्य आधींच केलेलें आहे. ह्यास्तव त्याचें कार्य आपण आतां करा, आणि रामचंद्राची आज्ञा होण्याचे पूर्वी तें सिद्धीस नेण्याविषयीं श्रेष्ठश्रेष्ठ वानरांना आपण आज्ञा करा. कार्य करण्याविषयीं पुनरपि जोंपर्यंत सूचना झाली नाहीं, तोंपर्यंत त्या कार्याची वेळ निघून गेली असें म्हणतां येणार नाहीं; कार्य करण्याविषयीं फिरून सूचना झाली म्हणजे मात्र कालातिक्रम होईल. हे वानरराज, अनुपकारी पुरुषाचेंही आपण कार्य करणारे आहां, मग वालीचा वध करून आणि राज्य प्राप्त करून देऊन ज्यानें आपणांवर उपकार केला, त्याचें कार्य आपणांला केलेंच पाहिजे हें सांगण्याची काय बरें अवश्यकता आहे. हे वानरकुलाधीश, हे ऋक्षगणाधिपते, आपण शक्तिमान असून अतिशय पराक्रमी आहां; तेव्हां दशरथपुत्र रामाची प्रीति संपादण्याकरितां आपण त्याच्या आज्ञेची कां बरें वाट पहात आहां? खरोखर दशरथपुत्र रामचंद्र देव, दैत्य आणि महोरग ह्या सर्वांना बाणांच्या योगानें जिंकण्याला अगदीं समर्थ आहे; परंतु तो फक्त आपली प्रतिज्ञा शेवटास जाण्याची वाट पहात आहे. वालीच्या वधाविषयीं युक्तायुक्ततेची शंका मनामध्यें न आणिल्यानें त्यानें तुझा मोठा मनोरथ सिद्धीस नेला आहे; ह्याकरितां, आपण त्याची भार्या विदेहराजकन्या सीता ही पृथ्वीमध्यें किंवा आकाशामध्यें जरी असली तरी शोधून काढूं. देव, दानव, गंधर्व, असुर, मरुद्गण आणि यक्ष हे सर्व मिळूनही त्याला भीति उत्पन्न करण्यास समर्थ नाहीत. मग राक्षसांची गोष्ट कशाला पाहिजे? तस्मात्, हे वानरराजा, पूर्वीच तुझ्यावर उपकार केलेल्या, आणि ह्याप्रमाणें सामर्थ्यवान असलेल्या रामाचें तुला अगदीं मनापासून प्रिय केलें पाहिजे. हे वानराधिपते, तुझा हुकूम झाला असतां तो बजावण्याला आमच्यापैकीं ज्याच्या हातून विलंब होईल, त्याला पाताल, पृथ्वी, जल आणि आकाश ह्यांमध्यें कोठेंही थारा मिळणार नाहीं. तस्मात्, कोणीं कोठून तुझें काय करावें ह्याविषयीं तूं आज्ञा कर. हे निष्पापा, सत्येनें कोट्यवधीपेक्षाही जास्त असे अजिंक्य वानर आज तुझ्या पदरीं आहेत.

## सेना जमविण्याविषयीं सुग्रीवाची आज्ञा.

हें कालाला उचित झालेलें त्याचें भाषण श्रवण करून, सत्त्वगुणसंपन्न सुग्रीवानें मनामध्यें उत्कृष्ट विचार आणिला; आणि त्या अत्यंत विचारी

सुग्रीवानें नेहमीं उद्योगशील असलेल्या नीलाला चोहोंकडील सर्व सेना जमविण्याविषयीं आज्ञा केली; तो म्हणाला, 'माझ्या सर्व सेना आणि सर्व सेनापति विलंब न करितां मुख्य सेनापती-सहवर्तमान येथें येतील अशी व्यवस्था कर. सरहद्दीचें रक्षण करणारे जे कोणी उद्योगी व शीघ्रगामी वानर असतील, तेही सत्वर माझ्या आज्ञेवरून येथें येोत आणि नंतर काय करावयाचें ह्याची तजवीज तूं स्वतःच ठेव. पंधरा दिवसांनंतर जो वानर येथें येईल, त्याला प्राणांतिक दंड होईल ह्याविषयीं मुळींच संशय घेण्याचें कारण नाहीं. निश्चयपूर्वक केलेल्या ह्या माझ्या आज्ञेला अनुसरून तूं अंगदासहवर्तमान वृद्ध वृद्ध वानरांकडे जा' अशी व्यवस्था करून तो वानरश्रेष्ठांचा अधिपति वीर्यवान सुग्रीव घरामध्यें गेला.

## सर्ग तिसावा.

—:०:—

### श्रीरामाचे सीतेविषयीं विचार.

सुग्रीव घरांत शिरल्यावर, आणि वर्षाकाल संपूर्ण झाल्यामुळें आकाश मेघनिर्मुक्त झाल्यावर, इकडे पर्वतावर वास्तव्य करीत असलेला राम कामातुर व शोकाकुल झाला. शुभ्रवर्ण आकाश, निर्मल चंद्रमंडल, आणि चंद्रिकारूप अनुलेपन यांनीं युक्त असलेली शरदतूंतील रात्र अवलोकन करून, आणि त्याचप्रमाणें, सुग्रीव स्वेच्छाचारी झाला आहे, जनककन्येचा पत्ता लागत नाहीं, व सेना जमविण्याचीही वेळ जात चालली आहे हें लक्ष्यांत आणून, अत्यंत दुःखित झालेल्या त्या रामाला कांहीं सुचेनासें झालें. नंतर थोड्या वेळानें मन स्वस्थ झाल्यावर तो रघुवंशज भूपाल मनामध्येंच वास्तव्य करणाऱ्या सीतेविषयीं चिंता करूं लागला. विद्युल्लता व मेघ नाहींतसे झाल्यामुळें निर्मल, आणि सारस पक्ष्यांच्या ध्वनीनें नादित असें आकाश दृष्टीस पडतांक्षणीं आर्त वाणानें तो विलाप करूं लागला. सुवर्णवर्ण धातूंनीं भूषित असलेल्या पर्वतशिखरावर तो बसला असतांना, शरदतूंतील निर्मल आकाशाकडे दृष्टि जाऊन त्याला प्रियेची आठवण झाली, आणि तो म्हणाला, "सारस पक्ष्याप्रमाणें शब्द करणारी जी माझी प्रिया सारस पक्ष्याच्या नादामुळें आश्रमामध्यें रममाण होत असे, तिचें चित्तरंजन आज कसें बरें होत असेल! कांचनपुष्पाप्रमाणें निर्मल असलेले प्रफुल्लित असनवृक्ष अवलोकन करून, मी दृष्टीस पडत नसल्यामुळें तिच्या मनाला कशी बरें करमणूक होत असेल! जी मधुर भाषण करणारी सर्वांगसुंदरी माझी प्रिया पूर्वी कलहंसाच्या शब्दानें जागी होत असे, ती आज कशी बरें करमणूक करून घेत असेल! भार्येसहवर्तमान संचार करणाऱ्या चक्रवाक पक्ष्यांचा स्वर कानीं पडला असतां, कमलांप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या ह्या प्रियेची काय बरें अवस्था होईल! हरिणबालकांसारखे जिचे नेत्र आहेत, अशा त्या प्रियेवांचून मला सरोवरें, नद्या, वापी, अरण्यें आणि वनें हिंडतां हिंडतां सांप्रत सुख होत नाहीं. शरदतूंतील निर्मल आकाशप्रभृति गोष्टींमुळें एकसारखा प्रवृत्त असलेला काम, सुकुमारपणा आणि माझा वियोग ह्या दोन कारणांमुळें त्या माझ्या स्त्रीला अतिशयच पीडा देईल."

अशा प्रकारें, इंद्रापासून उदक प्राप्त होण्याची आशा धरून राहिलेला तृषाक्रांत चातक ज्याप्रमाणें विलाप करीत रहातो त्याप्रमाणें, तो राजकुमार विलाप करीत बसला. तदनंतर, रमणीय पर्वतशिखरावर फळांकरितां हिंडून हिंडून वैभवशाली लक्ष्मण परत आला असतां ज्येष्ठ भ्रात्याकडे त्याची दृष्टि गेली, आणि तो खेद करीत बसला आहे असें त्याला आढळून आलें. तेव्हां दुःसह चिंतेनें घेरल्यामुळें कांहींएक सुचेनासें होऊन व दीन होऊन निर्जन प्रदेशामध्यें एकाकी बसलेल्या त्या रामाला पहातांच तो लौकर लौकर

त्याजकडे आला, आणि म्हणाला, "हे आर्य, कामाधीन झाल्यानें, आणि त्यामुळें स्वतःचें पौरुष व्यर्थ झाल्यानें आपलें कोणतें कार्य सिद्धीस जाणार आहे? शोकामुळें हें आपलें चित्तस्वास्थ्य नाहींसें होत आहे. अशा स्थितीमध्यें समाधीच्या योगानें कोणतेंही दुःख निवृत्त होणार नाहीं काय? कर्मानुष्ठान आणि मनाची प्रसन्नता ह्यांचें अवलंबन करून तू आपला वेळ समाधियोगामध्येंच घालवीत जा, आणि धैर्य न सोडतां आपल्या पौरुषवृद्धीला कारण होणारें आणि मित्रलाभ करून देणारें स्वकर्म करीत जा. हे मनुवंशाधिपते, तुझ्यामुळें सनाथ झालेली जानकी इतराला प्राप्त होणें सुलभ नाहीं. कारण, हे महामान्य वीरा, प्रज्वलित असलेल्या अग्नीच्या ज्वालेसमीप आल्यावर कोणी दग्ध होत नाहीं असें कधीं घडत नाहीं."

## सुग्रीवावर रामाचा कोप.

### ( शरदृतुवर्णन. )

ह्याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असतां, राजलक्षणांनीं युक्त असलेल्या त्या अजिंक्य लक्ष्मणाला राम म्हणाले, "तुझें हें भाषण तत्काल व परिणामींही हितावह, स्वाभाविक, राजनीतीनें युक्त, आणि साम, धर्म आणि अर्थ ह्यांनाही धरून आहे. तस्मात्, तूं जें कर्तव्य सांगितलस, तें तर निःसंशय केलेंच पाहिजे, आणि कर्मयोगाचेंही अनुष्ठान केलेंच पाहिजे. हे राजकुमारा, कर्म आणि ज्ञान ह्यांची पर्वा न करितां वृद्धिंगत आणि म्हणूनच अत्यंत प्रबल झालेलें जें कर्म, त्याच्या फलाची अपेक्षा धरितां उपयोगीं नाहीं.

नंतर, कमलपत्रांप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या मैथिलीचें पुनरपि स्मरण झालें असतां रामाचें मुख निस्तेज झालें, आणि तो लक्ष्मणाला म्हणाला, "उदकानें पृथ्वी तृप्त झाल्यामुळें, आणि धान्यें उत्पन्न केल्यामुळें, इंद्र आपलें काम आटोपून बसला आहे. हे राजकुमारा, पर्वतसमुदाय आणि वृक्षगण ह्यांचें अवलंबन करणारे, आणि दीर्घ व गंभीर घोषानें युक्त असलेले मेघ जलवृष्टि करून शांत झाले आहेत. नीलकमलांच्या पाकळ्यांप्रमाणें श्यामवर्ण असलेले मेघ दशदिशा श्यामवर्ण करून मदरहित झालेल्या गजांप्रमाणें सांप्रत वेगरहित झालेले आहेत. हे विनयसंपन्न लक्ष्मणा, ज्यांच्या उदरांमध्यें उदक आहे, असे मोठमोठे मेघ, आणि कुडा व अर्जुनवृक्ष ह्यांच्या पुष्पगंधानें आणि वृष्टीनें युक्त झालेले वायु वर्षाकालीं प्रवृत्त झाले असतांही चोहोंकडे संचार करून सांप्रत स्वस्थ झाले आहेत. सारांश, हे निष्पापा, मेघ, वानर, मयूर आणि जलप्रवाह ह्यांचा ध्वनि एकाएकीं बंद झाला आहे. अद्भुत शिखरांनीं युक्त असलेले पर्वत मोठमोठ्या मेघांची वृष्टि झाल्यामुळें निर्मल झाले असून, चंद्रकिरणांनीं चोपडल्यासारखे भासत आहेत. सप्तपर्णवृक्षांच्या† शाखा, सूर्यचंद्र व तारा ह्यांच्या प्रभा, आणि उत्कृष्ट गजांच्या लीला ह्यांचे ठिकाणीं सौंदर्य वांटून देऊन सांप्रत शरदृतु प्रवृत्त झाला आहे. अनेक पदार्थांच्या आश्रयानें रहाणारी, जिची अद्भुत शोभा आहे, अशी ही सौंदर्यलक्ष्मी सांप्रत शरदृतूतील गुणांनीं संपन्न असून सूर्याच्या पहिल्या किरणांनीं प्रफुल्लित झालेल्या सरोवरांचे ठिकाणीं अतिशय झळकत आहे. सप्तपर्णसंज्ञक वृक्षांच्या पुष्पांतील गंधानें युक्त, आणि म्हणूनच वायूचें अनुकरण करणारा हा शरदृतु गुंजारव करणाऱ्या भृंगांनीं युक्त झाल्यामुळें, व मत्त गजांचा मद वृद्धिंगत करण्यास व जल शुष्क करण्यास उद्युक्त झाल्यामुळें शोभा देत आहे. सुंदर व विशाल पक्षांनीं युक्त, मदनप्रिय, कमलपरागानें व्याप्त, व स्वतःबरोबर मानस सरोवरापासून आलेल्या आणि महानद्यांच्या वाळवंटावर जुळलेल्या चक्रवाक पक्ष्यां-

† सांतवण.

सहवर्तमान हंस क्रीडा करीत आहेत. नानाप्रकारांनीं विभागून गेलेली सौंदर्यलक्ष्मी—मदामुळें गंभीर झालेले गज, मदमत्त झालेले गोसमुदाय आणि निर्मळ उदकानें युक्त झालेल्या नद्या—ह्यांचे ठिकाणीं झळकत आहे. आकाश मेघनिर्मुक्त झालेलें अवलोकन करून पिच्छरूप भूषणाचा त्याग केल्यामुळे शोभारहित झालेले उत्साहशून्य मयूर पक्षी प्रियाविषयीं आसक्ति सोडून देऊन वनामध्ये ध्याननिष्ठ झालेले आहेत. मनोहर गंध व सुवर्णासारखा गौरवर्ण ह्यानीं युक्त असल्यामुळें दृष्टीला रमणीय भासणाऱ्या, आणि पुष्पभारांच्या योगानें नम्र अशा शाखानीं युक्त झालेल्या मोठमोठ्या सालवृक्षांच्या योगानें वनें जशीं काही प्रकाशित झालेली आहेत. सरोवरे व वने ज्यांना प्रिय आहेत, असे प्रियांसहवर्तमान असलेले व पुष्पांचा सुवास घेण्यास प्रवृत्त झालले जे श्रेष्ठ गज त्यांचा मद उत्कट झाल्यमुळे ते विषय वासनेने युक्त झाले आहेत, आणि म्हणूनच सांप्रत त्यांच्या गति मद झाल्या आहेत. घासून लकलकीत केलेल्या शस्त्राप्रमाणें आकाशाचा वर्ण अगदीं निर्मळ झालला आहे, नद्यांच्या उदकाचे प्रवाह कमी झालेले आहेत, वायु कमलपुष्पांच्या योगाने थंडगार वाहू लागले आहेत, आणि दिशा अंधकारापासून मुक्त झाल्यामुळे स्वच्छ झाल्या आहेत. सूर्याचें ऊन पडू लागल्यामुळे भूमीवरील चिखल नाहीसा झाला असून, पुष्कळ दिवसांनीं तिच्यावर घट्ट धूळ दृष्टीस पडत आहे; आणि एकमेकांशी वैर बांधून राहिलेल्या राजांच्या चळवळीचा काल समीप आला आहे. शरदृतूतील गुणांमुळे ज्यांच्या स्वरूपाची शोभा वृद्धिंगत झाली आहे, व ज्यांचीं शरीरें धुळीनें भरलीं आहेत, असे मदमत्त झालेले युद्धलुब्ध बैल मोठ्या आनंदाने गाईंच्या मध्यें डरकण्या फोडीत आहेत. कामवासना, अत्यंत प्रेम, मंद गति आणि स्वतःचा परिवार ह्यानीं युक्त असलेली हत्तीण मदमत्त होऊन वनामध्यें चाललेल्या आपल्या भर्त्याला वढून टाकून त्याच्या मागोमाग चालली आहे. नदीतीरावर असलेले मयूर पक्षी स्वतःचें भूषण असलेलीं उत्कृष्ट पिसें टाकून देऊन, सारस पक्ष्यांच्या कळपाकडून निंदा होऊं लागल्यामुळेच कीं काय मनामध्यें खिन्न व दीन होऊन जात आहेत. ज्यांच्या गंडस्थलांतून मद चालला आहे, असे मोठमोठे गज आपल्या प्रचंड गर्जनांनी कारंडव आणि चक्रवाक पक्ष्यांना त्रासवून सोडून विकसित कमळांनी युक्त असलेल्या सरोवरामध्ये ढवळून ढवळून पाणी पीत आहेत. वालुका, निर्मळ उदक, गाईंचे कळप, आणि सारस पक्षी ह्यानी युक्त असून त्या पक्ष्यांच्या ध्वनीने नादित व पंकरहित झालेल्या नद्यांकडे हंस आनंदित होऊन धावत आहेत. नदीजल, मेघोदक, आड्याचें पाणी, प्रचंड वायु, मयूर पक्षी व आनंदरहित झालेले बेडूक ह्यांचे ध्वनि सांप्रत अगदीं पूर्णपणे नाहींसे झाले आहेत. नवीन मेघ प्रकट होताक्षणीं उपजीविकेचे साधन नाहींसे झाल्यामुळे मृतप्राय बनलेले, व भयंकर विषानें युक्त असलले रंगीबेरंगी सर्प पुष्कळ दिवसपर्यंत आत राहिले असून आता बिळांतून बाहेर पडू लागले आहेत. सुशोभित चंद्रकिरणांचा समुदाय हाच एक कोणी प्रियपतीचा हात, व त्याचा स्पर्श झाल्यामुळे जिला हर्ष झालेला आहे, आणि म्हणूनच नक्षत्ररूप नेत्रतारका जी किंचित् प्रकट करूं लागली आहे, अशी ही रक्तवर्णरूप अनुरागाने युक्त असलेली संध्यारूप कामुक स्त्री आपोआपच आकाशरूप वस्त्राचा त्याग करीत आहे. चंद्ररूप प्रसन्न व सौम्य मुखानें, तारागणरूप उघडलेल्या मनोहर नेत्रानीं, आणि चंद्रिकारूप वस्त्रानें युक्त असलेली रात्र शुभ्र शेला पांघरलेल्या स्त्रीप्रमाणें भासत आहे. परिपक्व झालेली भाताचीं लोंबरें खाऊन आनंदित झालेली सारस पक्ष्यांची मनो-

हर रंग वाऱ्यानें उडालेल्या पुष्पगुफित मालेप्रमाणें मोठ्या वेगावेगानें आकाशामध्यें ही चालली आहे. निद्रिस्थ हंस पक्ष्यांनीं व कमळांनीं युक्त असलेलें मोठ्या सरोवरांतील उदक रात्रीं पूर्णचंद्रानें युक्त होऊन नक्षत्रगणांनी व्याप्त झालेल्या मेघशून्य आकाशाप्रमाणें दिसत आहे. उत्कृष्ट वापींची शोभा भूषित झालेल्या उत्कृष्ट स्त्रियांप्रमाणें सांप्रत अधिकच भासत आहे. कारण, इकडे तिकडे असलेले हंस पक्षी हेच त्याचे रत्नांनीं गजबजून गेलेले कमरपट्टे आहेत, आणि विकसित कमळें ह्याच कमलपुष्पांच्या माळा त्यांनीं धारण केलेल्या आहेत. कीचकसंज्ञक वेणूंचा ध्वनि हाच एक कोणी स्पष्ट वाद्यघोष, व त्याच्या योगानें मिश्र झालेले, आणि प्रातःकाळीं वायूमुळें प्रवृत्त होऊन आसपासचा प्रदेश व्यापून राहिलेले पर्वतसंबंधी गुहांचे व बैलाचे शब्द परस्परांना वृद्धिंगत करीत आहेत. मंद वायूनें कंपित, नूतन व विकाररहित अशा पुष्पभरानीं युक्त, आणि धुऊन स्वच्छ केलेल्या शालूप्रमाणें भासणाऱ्या काशसंज्ञक तृणाच्या योगानें नद्यांचीं तीरें सुशोभित झालीं आहेत. मधुपान करण्यामध्यें निपुण, आणि कमलपुष्पातील व असनपुष्पांतील परागामुळें पीतवर्ण झालेले वनांतील प्रचंड भृंग, प्रियांनीं युक्त असल्यामुळें आनंदित व मत्त होऊन गंधलोभानें वाऱ्याच्या मागोमाग चालले आहेत. स्वच्छ उदक, पुष्पविकासानें व क्रौंच पक्ष्यांचा ध्वनीनें युक्त होऊन परिपक्व दशेस आलेलें भाताचें शेत, मंद वायु, आणि निर्मल चंद्र ही पर्जन्यरहित असा शरत्काल प्राप्त झाल्याचे सुचवीत आहेत. प्रिय पतींनीं उपभोग घेतल्यामुळें अळसत आळसत चालणाऱ्या कामिनी स्त्रियांचे वेग ज्याप्रमाणें प्रभातकाळीं मंद झालेले असतात, त्याप्रमाणें मत्स्यरूप कमरपट्टा दृष्टोत्पत्तीस आणूं लागलेल्या नदीरूप स्त्रियांचे वेग सांप्रत मंद झाले आहेत. चक्रवाक पक्षी व शेवाळें ह्यांनीं युक्त असून काशसंज्ञक तृणांनीं आच्छादित झालेलीं नद्यांचीं मुखें, केशराचा वगैरे रंग लावून वर वेलबुट्टी काढलेल्या आणि शेल्यांनीं आच्छादिलेल्या स्त्रियांच्या मुखांप्रमाणें दिसत आहेत. प्रफुल्लित कोन्हांट्या, आणि असाणे ह्यांच्या योगानें चित्रविचित्र होऊन आनंदित भृंगांच्या गुंजारवानें युक्त झालेल्या वनामध्यें कामानें प्रचंड धनुष्य धारण करून त्याच्या योगानें सांप्रत विरही जनांना दंड करण्यास आरंभ केला आहे. योग्य वृष्टीनें लोक संतुष्ट, नद्यांचीं तीरें उदकानें परिपूर्ण, आणि पृथ्वी धान्यानें युक्त केल्यावर मेघ आकाशाचा त्याग करून नाहीतसे झाले आहेत. लक्ष्मणा, चक्रवाक पक्ष्यांच्या समुदायांनी व्याप्त आणि कुरर पक्ष्यांनी नादित होऊन निर्मल जलानें युक्त झालेले जलाशय रमणीय दिसत आहेत. हे राजकुमारा, राजांच्या स्वाऱ्यांचा हा समय प्राप्त झाला असून सुग्रीव माझ्या दृष्टीस पडत नाहीं; आणि तशा प्रकारचा त्याचा कांहीं उद्योगही माझ्या आढळण्यांत येत नाहीं. असाणे, सांतवण, कांचन, आणि तमाल हे वृक्ष पर्वतशिखरांवर प्रफुल्लित झालेले दिसत आहेत. हंस सारस, चक्रवाक आणि कुरर ह्या पक्ष्यांच्या योगानें सर्व बाजूंनीं गजबजून गेलेलीं नद्यांचीं वाळवंटें तू अवलोकन कर. अरे, सीता दृष्टीआड झाल्यामुळें शोकाकुल झालेल्या मला पर्जन्यकालाचे हे गेलेले चार महिने शेकडों वर्षांप्रमाणे झाले आहेत. कारण, दंडकारण्यसंज्ञक गहन वन उपवन आहे असें समजून, भर्त्याच्या मागोमाग जाणाऱ्या चक्रवाक पक्षिणीप्रमाणे माझ्या मागोमाग ती आली होती. लक्ष्मणा, राज्याचा अपहार होऊन अरण्यांत हांकून लावलेल्या, आणि त्यांतूनही प्रियेचा वियोग झाल्यामुळें दुःखाकुल झालेल्या माझ्यावर राजा सुग्रीव दया करीत नाही. "राज्याचा अपहार झाल्यामुळें हा अनाथ झाले-

ला आहे, रावणानें ह्याचा अपमान केलेला आहे, ह्याचें घर दूर राहिलें आहे, आणि हा विषयवासनेनें ग्रस्त झाल्यामुळें दीन बनून मला शरण आला आहे," अशा प्रकारची कारणें दुरात्म्या वानरराज सुग्रीवाच्या मनांत येत असल्यामुळें, मी शत्रूंना ताप देणारा असूनही माझी तो पर्वा करीत नाहीं. अमुक अमुक दिवस लोटले म्हणजे सीतेचा शोध लावावयाचा अशा रीतीनें कालगणनापूर्वक सुग्रीवानें मजयाशीं ठराव केला असूनही, कृतकृत्य झाल्यामुळें आतां त्या दुष्टाला त्याची ओळख राहिलेली नाहीं. ह्यास्तव तूं किष्किंधा नगरीमध्यें जा, आणि विषयसुखाचे ठिकाणीं आसक्त झालेल्या त्या मूर्ख सुग्रीवाला माझ्या आज्ञेनें असें सांग की, "पूर्वी ज्यांनी आपल्यावर उपकार केला आहे, आणि नतर काहीं इच्छा परिपूर्ण होण्याच्या आशेने जे आपणाकडे आलेले आहेत, त्यांची इच्छा परिपूर्ण करण्याचें वचन देऊन जो त्यांच्या आशेचा विघात करितो, तो पुरुष जगतामध्ये अधम होय. तोंडातून काढिलेल बरें वाईट भाषण जो खरें करून दाखवितो, तोच वीर पुरुषांमध्ये उत्कृष्ट होय. आपला मनोरथ सिद्धीस गेला असूनही, मनोरथ परिपूर्ण न झालेल्या मित्रांच्या कार्याकरितां जे झटत नाहींत, ते कृतघ्न मृत झाले असतां त्यांना श्वापदेही खात नाहीत. सुवर्णपृष्ठानें युक्त व प्रत्यंचा चढवून ताणिलेल्या अशा माझ्या धनुष्याचें विद्युत्समुदायतुल्य स्वरूप संग्रामामध्यें पहाण्याचीच तुला खरोखर इच्छा झाली आहे! संग्रामामध्यें क्रुद्ध झालेल्या माझ्या प्रत्यंचेचा वज्राच्या ध्वनीप्रमाणें भयंकर टणत्कार पुनरपि श्रवण करण्याची तुला हांव सुटली आहे!" वीरा लक्ष्मणा, इतके झालें असूनही म्हणजे तुझें साहाय्य असलेल्या माझा पराक्रम माहीत झाला असूनही, सुग्रीवाच्या मनाला त्याबद्दल कांहीच दिक्कत वाटू नये हें खरोखर आश्चर्य आहे. हे शत्रुसमूहविजयी लक्ष्मणा, ज्याच्याकरितां ही खटपट केली, त्याविषयीं केलेल्या प्रतिज्ञेचें ह्या कृतकृत्य झालेल्या वानरराजाला भान राहिलें नाहीं. पावसाळा निघून गेला म्हणजे उद्योगाला लागावयाचें अशी संकेतविषयक कालाची प्रथम प्रतिज्ञा करूनही, क्रीडा करण्यामध्यें दंग झालेल्या त्या वानरराजाला चार महिने लोटून गेल्याचें भान राहिलेलें नाहीं. अरे, मंत्रिमंडळासहवर्तमान क्रीडा करण्यांत दंग झालेला हा सुग्रीव मद्यपानच करीत बसला आहे;—शोकामुळें दीन झालेल्या आम्हांवर तो दया करीत नाहीं. ह्यास्तव, वीरा लक्ष्मणा, जा, आणि माझ्या क्रोधाचें स्वरूप सुग्रीवाला निवेदन करून त्याला आणखी असेंही सांग की, "वाली वध पावून ज्या मार्गानें गेला, तो मार्ग कांहीं अगदीं संकुचित नाहीं;—वाली जात असतांना तुलाही त्याच्याबरोबर जातां येईल इतका तो मोठा आहे. तस्मात्, आपल्या वचनाविषयीं खबरदार रहा, आणि वालीच्या मार्गानें जाऊं नको. अरे, संग्रामामध्यें बाणाच्या योगानें वालीचा एकट्याचाच वध मी केला; परंतु तूं सत्यापासून भ्रष्ट झाल्यामुळें मी तुझा मात्र बांधवांसहवर्तमान वध करीन." हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, उपस्थित झालेल्या कार्यासंबंधानें जें जें कांहीं त्याला व आपणांला हितावह असेल, तें तें तूं त्याला सांग आणि त्वरा कर. कारण, कालातिक्रम होत आहे. सारांश, "हे वानरराजा, सनातन धर्म लक्ष्यांत आणून मला दिलेलें आपलें वचन खरें कर; माझ्या बाणांनी विद्ध होऊन तूं आज प्रेत बनूं नको, आणि यमाच्या घरीं जाऊन वालीची भेट घेऊं नको" इतकें तूं सुग्रीवाला सांग."

ह्याप्रमाणें, प्रचंड व वृद्धिंगत झालेल्या क्रोधानें युक्त होऊन भाषण करीत असलेल्या आपल्या दीन श्रेष्ठ भ्रात्याकडे पाहून, मनुवंशाची कीर्ति

वृद्धिंगत करणाऱ्या महातेजस्वी लक्ष्मणानें वानरराज सुग्रीवाविषयीं भयंकर विचार मनामध्यें आणिला.

## सर्ग एकतिसावा.

—:०:—

### लक्ष्मणाचा सुग्रीवावर कोप.

मनाचा उदार, परंतु विषयासक्त झाल्यामुळें दीन होऊन शोकग्रस्त झालेल्या, आणि उत्कृष्ट कामवासनेनें युक्त झालेल्या आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला लक्ष्मण म्हणाला, 'वानर सज्जनाप्रमाणें वागणारा नाहीं, आणि म्हणूनच, कोणाच्या पराक्रमामुळें हीं निष्कंटक राज्यभोगादि फळें त्याला प्राप्त झालीं आहेत, हें त्याच्या गांवींही नाहीं. तस्मात्, ज्या अर्थी झालेलें सख्य रक्षण करण्याकडे त्याचें फारसें लक्ष्य नाहीं, त्या अर्थी वानरसंबंधी राज्यवैभवाचा उपभोग तो घेणार नाहीं. तुमच्या प्रसादामुळें विचारमूढ बनून ग्राम्यसुखांविषयीं आसक्त झालेल्या ह्या वानराचे ठिकाणीं प्रत्युपकारबुद्धि राहिलेली नाहीं. ह्यास्तव, असल्या गुणहीनाला राज्य देणें योग्य नाहीं. माझ्या हातून वध पावून आज ज्येष्ठ भ्रात्या वीर वालीशींच ह्याची भेट होऊं दे. ह्या अनावर झालेला कोप आवरून धरण्यास मी समर्थ नाहीं. ह्या सत्यभ्रष्ट सुग्रीवाचा मी आजच वध करणार. वानरश्रेष्ठांसहवर्तमान वालिपुत्र अंगद राजकन्या जानकीचा शोध लावील."

ह्या प्रमाणें सुग्रीवाच्या वधाची प्रतिज्ञा केल्याचें कळवून, संग्रामविषयक प्रचंड शोकानें युक्त झालेल्या, आणि धनुष्य घेऊन झपाट्यानें चालू लागलेल्या लक्ष्मणाशी परवीरघातक राम सांत्वनपूर्वक व समयोचित भाषण करूं लागले: ते म्हणाले, "तुझ्यासारख्यानें अशा प्रकारचें पाप करूं नये. उत्कृष्ट विवेकाच्या योगानें जो कोणाचा घात करितो, तोच ह्या जगतामध्यें वीर व श्रेष्ठ गुरु होय. लक्ष्मणा, त्वां सद्वर्तनी पुरुषानें ह्या प्रसंगीं असें मनामध्यें आणितां उपयोगीं नाहीं. सुग्रीवाचे ठिकाणीं तूं पूर्वीप्रमाणेंच प्रेम ठेव, आणि त्याच्याशीं जें आपलें पूर्वी सख्य झालें आहे त्याची आठवण ठेव. कठोर शब्द न उच्चारितां, कालातिक्रमण होत आहे एवढेंच तूं सुग्रीवाला सौम्य भाषेनें सांग."

### लक्ष्मणाचें किष्किंधेकडे गमन.

अशा प्रकारें ज्येष्ठ भ्रात्यानें यथायोग्य उपदेश केला असतां, लक्ष्मण किष्किंधा नगरीकडे निघाला. सारांश, काल व अंतक ह्यांप्रमाणें भयंकर असें इंद्रचापतुल्य आणि पर्वतशिखरासारखें धनुष्य हातांत घेतल्यामुळें शिखरयुक्त मंदर पर्वताप्रमाणें तो दिसूं लागला. रामचंद्राच्या आज्ञेप्रमाणें वागणारा, आणि बुद्धीनें बृहस्पतीची बरोबरी करणारा तो लक्ष्मण, भ्रात्याच्या मनोरथाचा विघात झाल्यामुळें उत्पन्न झालेल्या क्रोधाग्नीनें व्याप्त झाल्याकारणानें क्षुब्ध झाला, आणि आपण सुग्रीवाशीं काय भाषण करावयाचें, व त्यानें उत्तर दिल्यानंतर त्याला पुनरपि प्रत्युत्तर काय द्यावयाचें ह्याचा विचार करून तो वायुवेगानें चालला. तो वेगवान लक्ष्मण साल, ताल व अश्वकर्ण हे वृक्ष चालण्याच्या वेगानें उलथून पाडूं लागला, पर्वतशिखरें व इतर वृक्ष स्वसामर्थ्यानें अस्ताव्यस्त करूं लागला, पायांच्या योगानें शिळांचे तुकडे तुकडे करूं लागला, आणि जरूरीचें काम असल्यामुळें जलद चालणाऱ्या गजाप्रमाणें एकेक ढांग लांब लांब टाकून सत्वर चालता झाला. नंतर, प्रवेश होण्यास दुर्घट, सैन्यानें गजबजलेली, व पर्वताप्रमाणें असलेली ती वानरराजाची महानगरी किष्किंधा अवलोकन केल्यावर, सुग्रीवाविषयीं क्रोध उत्पन्न झाल्यामुळें ओंठ स्फुरण पावूं लागलेल्या लक्ष्मणानें किष्किंधेमध्यें बाहेर हिंडणारे भयंकर वानर अवलोकन केले. तेव्हां पर्वतामध्यें वास्तव्य कर-

णाऱ्या, व आकारानें गजतुल्य असलेल्या त्या सर्व वानरांनीं, त्या पुरुषश्रेष्ठ लक्ष्मणाला अवलोकन करितांक्षणीं शेंकडों पर्वतशिखरें व मोठमोठे वाढलेले वृक्ष हातांत घेतले. तेव्हां, हातामध्यें आयुधें घेतलेल्या त्या सर्व वानरांना अवलोकन करितांच विपुल इंधनानीं युक्त झालेल्या अग्नीप्रमाणें लक्ष्मण दुप्पट क्रुद्ध झाला. तेव्हां काल, मृत्यु अथवा युगांतकालीं संहार करण्यास उद्युक्त झालेला रुद्र ह्यांप्रमाणें क्षुब्ध झालेल्या त्या लक्ष्मणाला पहातांक्षणीं ते वानर भीतीनें लट्लट् कांपूं लागले आणि चहूंकडे पळून गेले; व सुग्रीवाकडे जाऊन लक्ष्मणाचें आगमन व क्रोध त्याला निवेदन करूं लागले. परंतु ग्राम्यसुखाविषयीं तारेसहवर्तमान आसक्त होऊन राहिलेल्या त्या विषयलंपट सुग्रीवानें त्या श्रेष्ठ वानरांच्या सांगण्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. तदनंतर, सुग्रीवाला वर्तमान कळवून त्याच्या अनुमतीनें लक्ष्मणाला आम्ही आंत घेऊन येईपर्यंत तुम्ही लक्ष्मणाचा प्रवेश नगरींत होऊं देऊं नका, अशी हनुमान वगैरे मंत्र्यांची आज्ञा झाल्यावर, आकारानें पर्वत, गज व मेघ ह्यांसारखे असलेले आणि म्हणूनच पहाणाऱ्याच्या अंगावर कांटा उठविणारे ते वानर नगरांतून बाहेर पडले. त्या सर्वही वीर वानरांचें स्वरूप उग्र असून सर्वांच्या दाढा व्याघ्रासारख्या होत्या, आणि नखें व दाढा ह्या स्वाभाविकच आयुधांनीं ते सर्व युक्त होते; त्यांपैकीं कांहींना दहा दहा हत्तींचें सामर्थ्य असून कांही तर त्यांच्याही पेक्षां दसपट दसपट सामर्थ्यवान होते; आणि कांहींचें बल तर सहस्र गजांच्या बलाची बरोबरी करणारें होतें. असो. तदनंतर, हातामध्यें वृक्ष घेऊन सज्ज झालेल्या त्या महाबलाढ्य वानरांनीं व्याप्त, आणि म्हणूनच प्रवेश होण्यास अशक्य झालेली ती किष्किंधा नगरी अतिशय क्रुद्ध झालेल्या लक्ष्मणानें अवलोकन केली; आणि ते सर्व वानरही कोटाच्या भोंवतीं असलेल्या खंदकांतून निघून उघडपणें बाहेर येऊन उभे राहिले. तेव्हां सुग्रीवाचा प्रमाद, वानरांचा अडथळा, आणि ज्येष्ठ भ्रात्याचें कार्य ह्यांचा विचार करून तो वीर लक्ष्मण पुनरपि क्रोधाधीन झाला. त्याचे नेत्र कोपानें लाल झाले. तो दीर्घ, उष्ण व भयंकर सुस्कारे टाकूं लागला, आणि त्यामुळें तो धूमयुक्त अग्नीप्रमाणें भासूं लागला. बाणशल्यरूप चंचल जिव्हेनें व चापरूप वेटोळ्यानें युक्त असलेला, आणि तेजोरूप विषानें व्याप्त झालेला तो लक्ष्मण पंचमुखी भुजगाप्रमाणें दिसूं लागला. तेव्हां कालाग्नीप्रमाणें प्रदीप्त व नागराजाप्रमाणें क्रुद्ध झालेल्या त्या लक्ष्मणाची गांठ पडल्यावर, अंगद भीतीमुळें पराकाष्ठेचा दुःखित झाला. इतक्यांत, क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत असा तो महाकीर्तिमान लक्ष्मण अंगदाला म्हणाला, "वत्सा, सुग्रीवाला माझ्या आगमनाची वर्दी दे, आणि त्याला सांग कीं, 'हे शत्रुदमना, हा रामाचा कनिष्ठ भ्राता लक्ष्मण तुझ्याकडे आला आहे; आणि तो भ्रात्याच्या दुःखामुळें संतप्त झाला असून दाराशीं उभा आहे. तेव्हां मर्जी असेल तर त्याच्या म्हणण्याप्रमाणें आपण वागा.' वत्सा, ह्याप्रमाणें सुग्रीवाला चांगलें सांग, आणि असें सांगितल्यानंतर तो काय सांगतो तें ऐकून घेऊन तूं सत्वर इकडे ये."

लक्ष्मणाच्या त्या अत्यंत तीक्ष्ण वाणीमुळें मनामध्यें गोंधळून गेलेला, आणि म्हणूनच अत्यंत दीनवदन झालेला अंगद तेथून निघाला, आणि राजा सुग्रीवाचे अंतःपुरांत जाऊन त्यानें प्रथम त्याचे आणि नंतर रुमेचे चरण वंदिले. नंतर त्यानें आपल्या मातेचे पाय धरिले, आणि लीन होऊन त्या अंगदानें तो लक्ष्मणाचा वृत्तांत निवेदन केला. तथापि निद्रेनें जर्जर व व्याप्त करून टाकलेल्या त्या वानरानें त्याच्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. कारण, तो विषयवासनेनें मोहित व मदमत्त झालेला होता!

अंगद सुग्रीवाकडे गेल्यानंतर, त्या क्रुद्ध लक्ष्मणाला अवलोकन करितांक्षणीं वानर भीतीमुळे मनामध्यें अगदीं गांगरून गेले, आणि लक्ष्मणाची कृपा संपादन करण्याकरितां किलकिलाट करूं लागले. सारांश, त्यांनीं लक्ष्मणाला अवलोकन केल्यावर, त्याच्यासमीपच, महाप्रवाहाप्रमाणें आणि वज्र व विद्युल्लता ह्यांच्यासारखा एकदम सिंहनाद केला. तव्हां मदनानें विह्वळ करून टाकलेला, आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त असलेला, कांहीं सुचेनासें झालेला, आणि पुष्पमाला धारण केलेला तो सुग्रीव त्या प्रचंड ध्वनीनें देहभानावर आला! तदनंतर, अंगदाचें भाषण श्रवण करून त्याच्याच बरोबर त्या वानरराजाचे दोन मंत्री त्या वानरराजाकडे आले. ते उभयतांही त्या सुग्रीवाला संमत असून उभयतांचीही मति उत्कृष्ट होती. अपो. अर्थ व धर्म ह्यासंबंधानें कांहीं बरावाईट प्रकार राजाला कळविण्याकरितां प्राप्त झालेल्या लक्ष्मणाचा, त्या यक्ष व प्रभाव ह्या नांवांच्या मंत्र्यांनीं प्रशंसा केली. प्रथमतः निश्चित अर्थानें संपन्न असलेल्या भाषणांनीं सुग्रीवाचें मन प्रसन्न करून घेऊन, मरुद्गणाधिपति इंद्राप्रमाणें बसलेल्या त्या सुग्रीवाचे समीप ते बसले, आणि म्हणाले, "त्रैलोक्याचें राज्य करण्यास पात्र असूनही तुला राज्य अर्पण करणारे, मनुष्यरूप धारण केलेले, सत्यवचनी, आणि महाभाग्यवान राम लक्ष्मण अरण्यामध्यें आहेत, व त्या उभयतांपैकीं एक लक्ष्मण हातामध्यें धनुष्य घेऊन किष्किंधा नगरीच्या द्वाराशीं उभा आहे, आणि त्यालाच भिऊन लटलट कांपूं लागलेले वानर आरोळ्या मारीत आहेत. रामाच्या आज्ञेवरून हा त्याचा भ्राता लक्ष्मण निश्चयरूप रथावर आरूढ होऊन रामवचनरूप सारथ्यासहवर्तमान येथें प्राप्त झाला आहे; इतकेंच नव्हे, परंतु, हे निष्पापा राजा, तारेचा हा प्रिय पुत्र अंगद लक्ष्मणानें तुझ्यासमीप पाठविला आहे. सारांश, हे वानराधिपते, क्रोधानें ज्याचे नेत्र व्याप्त झालेले आहेत, असा तो हा वीर्यवान लक्ष्मण आपल्या दृष्टीच्या योगानें वानरांना दग्ध करीतच कीं काय द्वाराशीं उभा आहे. त्याच्याकडे तूं पुत्र व बांधव ह्यांसहवर्तमान सत्वर जाऊन त्या समस्तकानें प्रणाम कर. हे महाराजा, त्याचा क्रोध आजच्या आज शांत होऊं दे. राजन्, धर्मात्मा राम सांगेल त्याप्रमाणें तूं स्वस्थांतःकरणपूर्वक वाग, आणि स्वतः जो संकेत तूं त्याच्याशीं केला आहेस, त्याला धरून राहून आपली प्रतिज्ञा खरी कर."

## सर्ग बत्तिसावा.

--:०:--

### सुग्रीवाची गाळण.

मंत्र्यांसहवर्तमान असलेला विचारी सुग्रीव, अंगदाचें भाषण श्रवण करून लक्ष्मण क्रुद्ध झाल्याचें ऐकताच आसनावरून सरला. नंतर, मसलतीविषयीं निपुण असलेला, आणि सल्लामसलतांना धरून चालणारा तो सुग्रीव, बऱ्यावाईटपणाचा विचार करून मंत्र्यांना म्हणाला, "मी कांहीं अनुचित भाषण केलें नाहीं, व कांहीं अयोग्य कृत्यही माझ्या हातून झालेलें नाहीं; तेव्हां राघवभ्राता लक्ष्मण कां क्रुद्ध झाला ह्याविषयीं मला विचार पडला आहे. नेहमीं माझे छिद्र पहाण्यास टपून बसून माझा अपकार करणाऱ्या माझ्या शत्रूंनीं माझे नसते दोष खरोखर राघवाच्या कनिष्ठ भ्रात्याला सांगितले आहेत. ह्यास्तव, सर्वांनीच आपआपल्या बुद्धीप्रमाणें योग्य विचार करून लक्ष्मणाच्या कोपाचें कारण काय हे विचारपूर्वक चांगल्या रीतीनें ठरविलें पाहिजे. वास्तविक विचार केला असतां, माझ्या हातून कांहीं अपराध घडल्यामुळे लक्ष्मणापासून अथवा रामापासून आज मला भीति उत्पन्न झालेली नाहीं. मित्र विनाकारण क्रुद्ध झाला आहे, ह्यामुळे मात्र मला भीति उत्पन्न झाली आहे. मित्र संपादन

करणें सुलभ आहे, परंतु त्याच्याशीं सख्य कायम राखणें मात्र सर्व प्रकारें कठिण आहे. कारण, अंतःकरणें स्थिर नसल्यामुळें, शत्रूंनीं अल्पस्वल्प जरी कांहीं मित्राच्या कानांत सांगितलें, तरी सुद्धां उभयतांतील प्रेमाला व्यत्यय येतो. ह्यामुळें मी भयभीत झालों आहें. रामाचा माझ्या हातून कांहीं अपराध घडला असेल, आणि त्यामुळें तो क्रुद्ध झाला असेल, असे समजून मी भयभीत झालों नाहीं. माझ्या हातून रामाचा अपराध होईल कसा? कारण, महात्म्या रामानें जो माझ्यावर उपकार केला आहे, त्याची फेड माझ्या हातून होणें शक्य नाहीं."

## हनुमंताचें भाषण.

ह्याप्रमाणें सुग्रीवानें भाषण केलें असतां, वानरश्रेष्ठ हनुमान स्वतःच्या तर्फानें वानरमंत्र्यांमध्यें म्हणाला, "हे वानरगणाधिपते, रामचंद्रानें केलेला चांगला उपकार तूं विश्वासघातकीपणानें विसरत नाहींस हें कांहीं आश्चर्य नव्हे. वीर राघवानें वालीच्या पराक्रमाची भीति यत्किंचितही न बाळगितां तुझें प्रिय करण्याकरितां त्या इंद्रतुल्य पराक्रमी वीराचा वध केला आहे. ह्यावरून, तो राघव खास प्रेमामुळें क्रुद्ध झाला असून त्यानें आपला लक्ष्मीवर्धक भ्राता लक्ष्मण तुझ्याकडे पाठविला आहे ह्यांत संशय नाहीं. कारण, मदमत्त झाल्यामुळें तुला कालाचें भान राहिलें नाहीं. प्रफुल्लित सप्तच्छदवृक्षांच्या योगानें श्यामवर्ण प्रदेशांनीं युक्त असलेला शुभ शरदृतु जवळ जवळ निघून गेल्यासारखाच आहे. आकाशांतील मेघ नाहींतसे झाले असून ग्रह व नक्षत्रें निर्मल झालीं आहेत, आणि त्याचप्रमाणें सर्व दिशा, नद्या व सरोवरें स्वच्छ झालीं आहेत. हे वानरश्रेष्ठा, उद्योगसमय प्राप्त झाल्याचें तूं जाणीत नाहींस, तेव्हां तूं मदमत्त झाला आहेस असें स्पष्ट समजून हा लक्ष्मण येथें आला आहे. तस्मात्, भार्येचा अपहार झाल्यामुळें दुःखाकुल झालेल्या महात्म्या रघुवंशज रामाचें दुसऱ्याच्या द्वारानें झालेलें हें कठोर भाषण तुला सहनच केलें पाहिजे. प्रतिज्ञा केल्याप्रमाणें योग्य वेळीं हजर न राहण्याचा तुझ्या हातून अपराध झाला असल्यामुळें, हात जोडून लक्ष्मणाची कृपा संपादन करण्याशिवाय तुला गत्यंतर नाहीं असें मला वाटतें. हितोपदेशाविषयीं नेमलेल्या मंत्र्यांनीं, जें कांहीं हित असेल तें राजाला अवश्य सांगितलें पाहिजे; आणि म्हणूनच मी भय न बाळगितां निश्चित भाषण करीत आहें. रामानें क्रुद्ध होऊन हातामध्यें धनुष्य घेतलें असतां देव, असुर आणि गंधर्व ह्यांसहवर्तमान हें सर्व जगत् आपल्या अधीन ठेवण्यास तो समर्थ आहे. ज्याची पुनरपि कृपा संपादन करण्याचा प्रसंग यावयाचा असेल, त्याला क्रोध आणणेंच योग्य नाहीं; आणि विशेषतः स्वतःवर पूर्वी झालेला उपकार स्मरणाऱ्या कृतज्ञ पुरुषानें तर ही गोष्ट करितांच उपयोगीं नाहीं. ह्यास्तव, राजा, तूं त्याला मस्तकानें प्रणाम कर; आणि आपल्या संकेताला धरून राहून, भार्या ज्याप्रमाणें भर्त्याच्या अधीन होऊन राहते त्याप्रमाणें, पुत्र व सुहृद्गण ह्यांसहवर्तमान तूं त्याच्या अधीन होऊन रहा. हे वानरराजा, राम आणि रामाचा कनिष्ठ भ्राता लक्ष्मण ह्यांच्या आज्ञेची उपेक्षा करण्याचें मनामध्यें आणणेंही तुला योग्य नाहीं; कारण, रघुवंशज लक्ष्मणासहवर्तमान असलेल्या ह्या इंद्रतुल्य पराक्रमी रामाचें अमानुष सामर्थ्य तुला ठाऊक आहेच."

# सर्ग तेहेतिसावा.

—:०:—

## लक्ष्मणाचा किष्किंधेंत प्रवेश.

(नगरशोभा.)

तदनंतर, अंगदानें परत निरोप सांगितला असतां लक्ष्मण रामाच्या आज्ञेनें रमणीय अशा

त्या किष्किंधा नगरीमध्यें गेला. त्या ठिकाणीं देवडीवर असलेले सर्व धिप्पाड व महाबलाढ्य वानर लक्ष्मणाला अवलोकन करितांक्षणीं हात जोडून उभे राहिले. क्रुद्ध होऊन दीर्घ सुस्कारे टाकूं लागलेल्या त्या दशरथपुत्र लक्ष्मणाला अवलोकन करितांक्षणीं वानर भिऊन गेल्यामुळें, किष्किंधा नगरीमध्यें शिरण्यास त्याला कोणीही आडकाठी केली नाहीं. तेव्हां प्रफुल्लित वनांनी युक्त, रत्नांनीं व्याप्त, व उत्कृष्ट वस्तूनीं भरलेली अशी ती दिव्य, रमणीय व प्रचंड गुहा लक्ष्मणानें अवलोकन केली. ती गुहा नानाप्रकारच्या रत्नांनीं सुशोभित झालेली होती, धनिक लोकांच्या निवासस्थानांनीं व राजवाड्यानीं गजबजून गेलेली होती, आणि सर्वदा मनोरथानुरूप फलांनीं युक्त असलेल्या प्रफुल्लित वृक्षांनींही तिला शोभा आलेली होती. दिव्य पुष्पें आणि वस्त्रें धारण करीत असल्यामुळें ज्यांचें दर्शन प्रिय झालेलें आहे, अशा यथेष्ट रूप धारण करणाऱ्या देवपुत्र व गंधर्वपुत्र वानरांच्या योगानेंही ती सुशोभित झालेली होती. चंदन, अगुरु व पद्मक ह्यांच्या गंधांमुळें आणि उसांच्या रसापासून व मोहापासून तयार केलेल्या मद्यसमुदायामुळें त्या नगरींत जिकडे तिकडे सुवास सुटलेला होता, आंतील राजमार्गावर तर जिकडे तिकडे सुगंधाचा कडेलोटच झालेला होता, आणि विंध्याचल व मेरु ह्या पर्वतांसारख्या अनेक मजली उंच राजवाड्यांनीं ती नगरी भरलेली होती.

असो; प्रथमतः पर्वतावरील निर्मल नद्या रघुवंशज लक्ष्मणानें अवलोकन केल्या, व नंतर अंगदाचें रम्य गृह त्यानें पाहिलें. तदनंतर मैंद, द्विविद, गवय, गवाक्ष, गज, शरभ, विद्युन्माली, संपाति सूर्याक्ष, हनूमान्, वीरबाहु, सुबाहु, महात्मा नल, कुमुद, सुषेण, तार आणि जांबवान्, दधिवक्त्र नील आणि सुपाटल व सुनेत्र ह्याही महात्म्या वानरश्रेष्ठांचीं मोठीं मजबूत व उत्कृष्ट गृहें राजमार्गामध्यें लक्ष्मणानें अवलोकन केलीं. हीं गृहें श्वेतवर्ण अभ्राप्रमाणें प्रकाशणारीं असून सुगंधि द्रव्यांनीं व पुष्पांनीं भरलेलीं होतीं, आणि त्याचप्रमाणें विपुल धनधान्यांनीं तीं संपन्न असून सर्वोत्कृष्ट स्त्रियांनी सुशोभित झालेलीं होतीं.

## राजगृहाची शोभा

तर केवळ अनुपम होती. तें इंद्रभुवनासारखें रम्य होतें, व श्वेत पर्वतानें तें परिवेष्टित असल्यामुळें त्यांत दुसऱ्याचा प्रवेश होणेंही कठिण होतें. कैलास पर्वताच्या शिखरांप्रमाणें शुभ्रवर्ण असलेल्या राजवाड्यांच्या शिखरांनीं आणि सर्वदा मनोरथानुरूप फलें देणाऱ्या प्रफुल्लित वृक्षांनी तें सुशोभित झालेलें होतें. दिव्य पुष्पें व फलें आणि शीतल छाया ह्यांनीं युक्त असून, आकारानें नीलमेघाप्रमाणें असलेल्या इंद्रदत्त मनोहर भव्य वृक्षांनी त्याला शोभा आलेली होती; हातामध्यें शस्त्रें घेतलेल्या बलाढ्य वानरांनीं त्याच्या द्वाराचें रक्षण केलेलें होतें; आणि तें शुभ्रवर्ण गृह दिव्य पुष्पांनी व्याप्त झालेलें असून उत्कृष्ट सुवर्णाच्या तोरणांनी युक्त होतें.

## अंतःपुरशोभा.

असो; मोठ्या मेघामध्यें प्रविष्ट होणारा सूर्यच की काय अशा रीतीनें कोणाचीही आडकाठी न होतां महाबलाढ्य लक्ष्मण सुग्रीवाच्या रम्य गृहामध्यें प्रविष्ट झाला; आणि रथ व बैठकी ह्यांनीं गजबजून गेलेले सात चौक ओलांडून गेल्यावर त्या महात्म्या लक्ष्मणानें फारच विस्तीर्ण व सुरक्षित असें मोठें अंतःपुर अवलोकन केलें. त्या अंतःपुरांत सोन्यारुप्याचे अनेक पलंग ठिकठिकाणीं ठेविलेले असून, मोठमोठ्या मूल्यवान चादरी ज्यांच्यावर पसरलेल्या आहेत अशीं सिंहासनेंही ठिकठिकाणीं ठेविलेलीं होतीं. अशा प्रकारच्या त्या अंतःपुरामध्यें शिरतां शिरतांच ताल व शब्दांतील अक्षरें ह्यांचा ज्यांत मेळ

आहे असा एकसारखा तेथे सुरू असलेला व विण्याच्या स्वराने युक्त असलेला मधुर ध्वनि त्याच्या कानी पडला; आणि सौंदर्याच्या व तारुण्याच्या तोऱ्यात असलेल्या व नानाप्रकारच्या आकारानीं युक्त असलेल्या अनेक स्त्रिया सुग्रीवाच्या अत पुरामध्ये त्या महाबलाढ्य लक्ष्मणाने अवलोकन केल्या. कुलीन, पुष्पमाला धारण केलेल्या, उत्कृष्ट माला गुफण्य मध्ये गढून गेलेल्या, आणि उत्तम भूषणानी भूषित झालेल्या स्त्रिया तेथे अवलोकन केल्यावर, सतुष्ट, विशेष गडबडीत नसलेले, आणि साधारणच पोषाख व अलकार घातलेले सुग्रीवाचे सेवकही लक्ष्मणाने अवलोकन केले. तदनतर, तोरड्याचा छुमछुम् शब्द, व कमरपट्ट्य चा ध्वनि कानी पडल्यामुळे वैभवशाली सुमित्रापुत्र लक्ष्मण लज्जित झाला; आणि भूषणध्वनि कानावर आल्यामुळे अधिकच रोप चढलेला तो वीर लक्ष्मण, धनुष्याच्या ध्वनीने दशदिशा नादित करीत करीत प्रत्यचेचा टणत्कार करू लागला. सुग्रीवाचे हातून रामकार्य होत नसल्याकारणाने क्रुद्ध झालेला तो महापराक्रमी वीर, सदाचार लक्ष्यात आणून अत पुरामध्ये प्रवेश न करिता परत फिरला; आणि स्त्रीजनरहित अशा एका प्रदेशामध्ये प्रत्यचेचा टणत्कार करीत करीत उभा राहिला. तेव्हा लक्ष्मणाचे आगमन झाले आहे असे त्या ध्वनीवरून वानरराज सुग्रीवाने जाणले, आणि त्या ध्वनीने त्रस्त होऊन तो आपल्या सिंहासनावरून दूर झाला, व 'अगदाने पूर्वी मला कळविल्याप्रमाणे नि.सशय हा भ्रातृवत्सल सुमित्रापुत्र प्राप्त झाला आहे' असा आपल्याशीं विचार करू लागला;आणि ते समजताक्षणी त्याच्या तोडचे पाणी पळाले! तदनतर, भीतीमुळे मनाची चांदल उडून गेलेला तो वानरश्रेष्ठ दुसऱ्या कामाकडे गुतून न राहता मनोहर मुद्रेने युक्त असलेल्या तारेला आपल्या हिताची गोष्ट विचारू लागला.

तो म्हणाला, "हे सुभ्रु,‡ स्वभावतः सौम्य मनाने युक्त असलेल्या पुरुषाला राग येण्याचे काय बरे कारण असावे? हा रामाचा कनिष्ठ भ्राता लक्ष्मण कोणत्या कारणामुळे येथे क्रुद्ध होऊन आल्यासारखा दिसत आहे? हे निर्दोष स्त्रिये, ह्या राजपुत्राच्या रोषाचे कारण तुझ्या लक्ष्यात काय यत आहे? खरोखर हा पुरुषश्रेष्ठ कधीही विनाकारण क्रोधाचे अवलबन करणार नाही. ह्यास्तव, आमच्या हातून जर कांही ह्याचा अपराध झाला असेल, तर तो कोणता झाला आहे हे तू विचार करून सत्वर ठरीव, आणि त्याला प्रसन्न करून घेण्याचा उपायही मला सत्वर साग; अथवा तू स्वत च त्याची भेट घेऊन सात्वनयुक्त भाषणानी त्याची कृपा सपादन कर. शुद्ध मनाने युक्त असलेला हा लक्ष्मण तू दृष्टीस पडल्यावर रागावणार नाही. कारण, महात्मे कधीही स्त्रियावर विनाकारण क्रुद्ध होत नाहीत. तू सौम्य शब्दानी त्याच्याशी सभाषण करून त्याची क्षुब्ध झालेली इंद्रिये व मन ही स्वस्थ करलीस, म्हणजे मी त्या शत्रुदमन कमलनयन लक्ष्मणाची भेट घेईन."

## तारामुखें लक्ष्मणकोपसांत्वन.

ह्याप्रमाणे सुग्रीवाने सागितले असता, मद्यपानाचा मद चढल्यामुळे जिची दृष्टि धुद झाली आहे, जिचा कमरपट्टा व तो आवळण्याची सोन्याची साखळी ही दोन्ही लोंबत आहेत, आणि स्तनभारामुळे जिचे शरीर नम्र झालेले आहे, अशी ती सुलक्षणी तारा अडखळत अडखळत लक्ष्मणासमीप गेली असता, त्या वानरराजाच्या पत्नीला अवलोकन करिताक्षणी तो महात्मा लक्ष्मण उदासीनपणाने स्तब्ध राहिला. इतकेच नव्हे, परतु स्त्री जवळ आल्यामुळे क्रोधाचा त्याग करून तो राजपुत्र वर पाहिनासा झाला. स्वत मद्यपाना

‡ जिच्या भिवया [illegible] आहे। [illegible]

केलें असल्यामुळें, आणि राजकुमार लक्ष्मणाची मुद्रा प्रसन्न दिसल्यामुळें, ती तारा सौम्य शब्द व महत्त्वाचा अर्थ ह्यांनीं भरलेलें आणि मैत्री कायम राखण्यास समर्थ असें भाषण त्याच्याशीं करूं लागली: ती म्हणाली, "हे राजकुमारा, तुझ्या क्रोधाचें कारण काय? तुझ्या आज्ञेमध्यें कोण वागत नाहीं? अरे, शुष्कवृक्षांनीं युक्त असलेलें वन दग्ध करून बसलेल्या दावाग्नीवर कोण बरें निःशंकपणें बसणार आहे?"

मैत्री कायम राखणें हा ज्यांतील मुख्य उद्देश आहे, असें तें तिचें सांत्वनपर्वक भाषण श्रवण केल्यावर लक्ष्मण निर्भयपणें तिला म्हणाला, "हे भर्तृहिताविषयीं तत्पर असणारे स्त्रिये, धर्म व अर्थ संपादन करण्याचें मुळींच सोडून देऊन हा तुझा भर्ता कामाच्याच मागें लागलेला आहे हें तूं जाणीत नाहींस काय? तारे, अमात्य व इतरही सभासद ह्यांसहवर्तमान हा केवळ राज्याच्या स्थैर्याकरितांच झटणारा असून कामाचेंच सेवन करीत आहे, व शोकाकुल असलेल्या आमची गोष्टही मनामध्यें आणीत नाहीं. चार महिन्यांनीं येण्याचा ह्यानेंच ठराव केला असून, ते लोटून गेले तरी मदमत्त होऊन क्रीडा करण्यामध्यें दंग झालेल्या ह्या सुग्रीवाच्या तें गांवीही नाहीं. धर्म व अर्थ सिद्धीस जाण्याकरितां केवळ मद्यपानच करून राहणें प्रशस्त नाहीं. मद्यपानामुळें धर्म, अर्थ व काम ह्या सर्वांचाच ऱ्हास होतो. उपकार करणाऱ्यावर प्रत्युपकार न करणें ही आधीं मोठीच धर्महानि होत असून, गुणवान मित्राची मैत्री नाहींशी होणें ही मोठीच अर्थहानि होत आहे. मित्रकार्यसंपादन आणि सत्य धर्माविषयीं तत्परता हे दोन गुण मित्राचे ठिकाणीं असणें अवश्य आहे; परंतु तुझ्या भर्त्यानें त्या दोन्ही गुणांचा त्याग केला असून मैत्रिपरिपालनरूप धर्माचेंही अवलंबन केलेलें नाहीं. तस्मात्, हे कार्यतारे, सांप्रत अशी गोष्ट झाली असतांना आमचें ह्यानंतर कर्तव्य काय तें तूं कथन कर."

धर्म व अर्थ ह्यांना धरून असलेलें, आणि स्वभावतःच मधुर असलेलें त्याचें तें भाषण श्रवण केल्यावर, सुग्रीवाच्या हातून सिद्धीस न गेलेलें राजकार्य शेवटास नेण्याविषयीं निश्चय करून राहिलेल्या त्या लक्ष्मणाला ती तारा पुनरपि म्हणाली, "हे राजपुत्रा, क्रोधाचा हा समय नव्हे, आणि स्वजनाचे ठिकाणीं कोप करणेंही योग्य नाहीं; हे वीर, तुझाच मनोरथ सिद्धीस नेण्याची इच्छा धरणाऱ्या त्या सुग्रीवाचा प्रमादही सहन करणें तुला योग्य आहे. हे राजकुमारा, गुणांनीं श्रेष्ठ असलेला पुरुष क्षुद्र प्राण्यावर कसा बरें कोप करील? सत्त्वगुणानें व्याप्त आणि म्हणूनच केवळ तपाचें स्थान असलेला कोण बरें तुझ्यासारखा पुरुष क्रोधाधीन होईल? वानरवीर सुग्रीवाचा मित्र जो राम, त्याच्या कोपाचें कारण काय हें मी जाणीत आहें; त्याचें कार्य होण्याला विलंब लागला आहे ही गोष्ट माझ्या लक्ष्यात आहे; तूं जें आमचें कार्य केलें आहेस तेंही मी समजून आहें; आणि ह्यासबंधानें आम्हीं प्रत्युपकार काय केला पाहिजे तेंही मला माहित आहे. हे पुरुषश्रेष्ठा, कामाचें दुःसह सामर्थ्यही मी ओळखून आहें; आणि त्याचप्रमाणें, सांप्रत सुग्रीवाचें दुसरीकडे लक्ष्य नसून कामवासनेमुळें तो कोणाच ठिकाणीं आसक्त होऊन राहिला आहे हेंही मला ठाऊक आहे. तूं क्रोधाधीन झाल्याचें दिसत आहे, ह्यावरून कामाचा प्रभाव तुला माहीत नाहीं अशी माझी अटकळ होत आहे. अरे, कामासक्त झालेल्या मनुष्याला देशकालांचें भान रहात नसून धर्म व अर्थ ह्यांचीही पर्वा रहात नाहीं, हें प्रसिद्ध आहे. वास्तव, कामाधीनतेमुळें लाज सोडून माझ्याजवळ असणारा, आणि कामाच्याच मागें लागणारा जो तुझा वानरवंशाधिपति भ्राता, त्याला सांप्रत क्षमा कर. अरे, धर्म व तपश्चर्या ह्यांचे

ठिकाणींच सर्वस्वी तत्पर राहणारे महर्षिही विषयवासनेनें युक्त झाल्यामुळें स्त्रियांचे ठिकाणीं मोहानें आसक्त होऊन राहिलेले असतात तेव्हां जातीनेंच चंचल असलेला हा वानर—आणि त्यांतूनही राजा असतांना—विषसुखाविषयीं कसा बरें आसक्त होणार नाहीं ? "

अतर्क्य लक्ष्मणाशीं गंभीर अर्थानें भरलेलें असें हें भाषण केल्यानंतर, मद चढल्यामुळें जिचे डोळे धुंद झाले आहेत अशी ती तारा भर्त्याला हितावह असें हें खेदपूर्वक भाषण पुनरपि लक्ष्मणाशीं करूं लागली: ती म्हणाली, " हे पुरुषश्रेष्ठा, सुग्रीव जरी कामाचा दास होऊन राहिला आहे, तरी तुझें कार्य सिद्धीस नेण्याचा उद्योग सुरू करण्याविषयीं त्यानें कधींच आज्ञा केलेली आहे; आणि त्याप्रमाणें, नानाप्रकारच्या पर्वतांवर वास्तव्य करणारे व यथेष्ट रूप धारण करणारे महावीर्यवान वानर लाखों क्रोडों आलेले आहेत. तस्मात्, हे महापराक्रमी लक्ष्मणा, तूं आंत ये. एकाएकीं अंतःपुरांत प्रविष्ट न होण्यानें तूं आपलें ब्रीद निष्कलंकपणें राखिलें आहेस. कारण, कामविकार मनामध्यें न आणितां मित्रबुद्धीनेंच परदारा अवलोकन करणें हेंच सज्जनांचें ब्रीद होय. "

## लक्ष्मणाचा सुग्रीवाच्या अंतःपुरीं प्रवेश.

ह्याप्रमाणें तारेनें अनुज्ञा दिल्यामुळें, आणि रामाची आज्ञा सत्वर सिद्धीस नेण्याविषयींही उत्सुक झाल्यामुळें, तो महापराक्रमी लक्ष्मण अंतःपुरामध्यें प्रविष्ट झाला. तेव्हां मोठें मूल्यवान आस्तरण ज्यावर घातलें आहे अशा सुवर्णाच्या उत्कृष्ट सिंहासनावर बसलेला सूर्यासारखा तेजस्वी सुग्रीव त्याच्या दृष्टीस पडला. दिव्य अलंकारांनीं ज्याचें शरीर भूषित झालेलें आहे, दिव्य पुष्पें आणि वस्त्रें ज्यानें धारण केलेलीं आहेत, ज्याचें रूपही दिव्य आहे, आणि इंद्राप्रमाणें जो अजिंक्य आहे, असा तो यशस्वी सुग्रीव दिव्य अलंकार व माला धारण केलेल्या तरुणी स्त्रियांनीं आसमंताद्भागीं परिवेष्टित असल्याचें अवलोकन करून, लक्ष्मणाचे नेत्र अधिकच क्षुब्ध व आरक्तवर्ण दिसूं लागले, आणि तो साक्षात् मृत्यूप्रमाणेच भासूं लागला ! असो.

तारा लक्ष्मणाला आंत घेऊन आली तरी, उत्कृष्ट सुवर्णासारखी कांति आणि विशाल नेत्र ह्यांनीं युक्त असलेला तो वीर रुमेलाच दृढ आलिंगन देऊन सिंहासनावर बसला होता, व त्यानें तेथूनच विशालनयन महाशय लक्ष्मणाला अवलोकन केलें.

# सर्ग चौतिसावा.

—:०:—

## लक्ष्मणाचें सुग्रीवाशीं क्रोधयुक्त भाषण.

कोणाचीही आडकाठी न होतां आंत प्रविष्ट झालेल्या त्या पुरुषश्रेष्ठ क्रुद्ध लक्ष्मणाला अवलोकन करून सुग्रीवाची गाळण उडून गेली. तेजानें जसा काहीं प्रदीप्त असून, भ्रात्याच्या दुःखानें संतप्त झाल्यामुळें सुस्कारे टाकीत असलेल्या त्या क्रुद्ध दशरथपुत्राला अवलोकन करितांक्षणीं, उत्तम प्रकारें भूषित केलेल्या प्रचंड इंद्रध्वजाप्रमाणें दिसत असलेला तो वानरश्रेष्ठ सोन्याचें सिंहासन सोडून देऊन उठला; तेव्हां आकाशामध्यें असलेल्या पूर्णचंद्राचे मागोमाग जाणाऱ्या नक्षत्रपंक्तिच कीं काय अशा त्या रुमाप्रभृति स्त्रियाही त्याच्या मागोमाग सिंहासनावरून खालीं पटापट उड्या टाकूं लागल्या. आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त असलेला तो वैभवशाली सुग्रीव खालीं उतरतांक्षणीं हात जोडून लक्ष्मणाचे समुख आला असतां, लक्ष्मण मोठ्या कल्पवृक्षाप्रमाणें तेथें तसाच उभा राहिला, आणि तारांनी युक्त अस[illegible] प्रमाणें रुमेसहवर्तमान स्त्रियांच्या मध्यें [illegible] सुग्रीवाला तो क्रुद्ध ल[illegible]ण म्हणाला, "

कुलीन, दयाळू, जितेंद्रिय, कृतज्ञ आणि सत्यवादी असा जो राजा असेल, त्याची जगतामध्यें मानमान्यता होत असते. जो राजा अधर्माचें अवलंबन करून राहिलेला असतो, आणि उपकार करणाऱ्या मित्रांशीं केलेली प्रतिज्ञा शेवटास नेत नाहीं, त्यापेक्षां अधिक दुष्ट कोण बरें आढळणार आहे? एका अश्वाकरितां असत्य भाषण केलें असतां शंभर अश्वांचा वध केल्याचें, आणि एका गाईकरितां अनृत भाषण केलें असतां सहस्र गाईंचा वध केल्याचें पातक पुरुषाला लागत असतें; आणि दुसऱ्या पुरुषाशीं केलेली कांहीं प्रतिज्ञा शेवटास न नेली, तर प्रतिज्ञा करणारा पुरुष स्वतःच्या व स्वजनांच्या उत्तम गतीचा विघात करितो. हे वानरराजा, मित्रांच्या हातून पूर्वी स्वतःचे कार्य झालें असतांनाही त्यांच्यावर जो प्रतिज्ञा केल्याप्रमाणे प्रत्युपकार करीत नाहीं, तो कृतघ्न असून सर्व लोकांना वध्य आहे हे वानरा,

गोघ्ने चैव सुरापे च चौरे भग्नव्रते तथा ।
निष्कृतिर्विहिता सद्भिः कृतघ्ने नास्ति निष्कृतिः ‡

ह्या सर्व लोकांना मान्य असलेला एक श्लोक, कृतघ्नाचें अवलोकन करून क्रुद्ध झालेल्या जगत्पित्या ब्रम्हदेवानें उच्चारिलेला आहे. तेव्हां, हे वानरश्रेष्ठा, रामानें पूर्वी तुझें कार्य केलें असतांही ज्या अर्थी तूं याची बोलल्याप्रमाणें फेड करीत नाहींस, त्या अर्थी तू कृतघ्न व असत्यवादी आहेस. अरे, रामाच्या हातून जर तुझें कार्य झालेलें आहे, तर प्रत्युपकार करण्याची इच्छा धरून सीतेचा शोध लावण्याविषयीं तूं यत्न करणें खरोखर अवश्य असतांना, खोटी प्रतिज्ञा करणारा तू ग्राम्य अशा विषयोपभोगाचे ठिकाणीं आसक्त होऊन राहिला आहेस; परंतु बेडूक पकडण्याकरितां त्याच्यासारखा शब्द करणाऱ्या सर्पाप्रमाणें तूं वंचक आहेस ही गोष्ट रामाला ठाऊक नाहीं. अरे, तूं वास्तविक पापी व दुष्ट असूनही, परदुःख जाणणाऱ्या महाभाग्यवान महात्म्या रामानें तुला वानरांचें राज्य प्राप्त करून दिलें आहे. तेव्हां महात्म्या राघवाचा उपकार जर तूं जाणणार नाहींस, तर तीक्ष्ण बाणांच्या योगानें वध पावून तूं आतांच्या आतांच वालीची भेट घेशील. वाली वध पावून ज्या मार्गानें चालता झाला, तो मार्ग कांहीं अगदींच संकुचित नाहीं;—वालीच्या बरोबर तुलाही जातां येईल इतका तो विस्तीर्ण आहे. तात्पर्य, वालीच्या वध करण्याला ज्याप्रमाणें मुळींच वेळ लागला नाहीं, त्याप्रमाणें तुझाही वध होण्याला कांहीं वेळ लागेल ही गोष्ट तूं सोडून दे. तस्मात्, सुग्रीवा, तू जो संकेत केला आहेस, त्याला अनुसरून वाग आणि वालीच्या मार्गाचें अवलंबन करू नको. अरे, इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठ रामाच्या धनुष्यापासून सुटलेले वज्रतुल्य बाण खरोखर तुझ्या दृष्टीस पडले नाहींत, म्हणूनच तूं खुशाल चैनी बनून विषयसुखाचा उपभोग घेत पडला आहेस, व रामकार्य करण्याचें मनांतही आणीत नाहींस!"

## सर्ग पस्तिसावा.

—:०:—

### तारेचें लक्ष्मणाशीं सांत्वनयुक्त भाषण.

तेजानें जसा कांहीं जळत असलेला तो सुमित्रापुत्र लक्ष्मण तशा प्रकारें भाषण करीत असतांना, चंद्रासारख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेली तारा त्याला म्हणाली, "लक्ष्मणा, ह्या वानरराजाशीं तूं ह्याप्रमाणें कठोर भाषण करू नको. कठोर भाषण ऐकून घेण्याला—आणि त्यांतूनही विशेषतः तुझ्या मुखांतून निघालेलें कठोर भाषण ऐकून घेण्याला—हा पात्र नाहीं. हे वीरा, वानरराज सुग्रीव कृतघ्न

‡ गोवध करणाऱ्याला, सुरापान करणाऱ्याला, ब्राह्मणाचें सुवर्ण हरण करणाऱ्याला, आणि व्रतभंग करणाऱ्यालाही धर्मशास्त्रवेत्त्या सज्जनांनी निष्कृति सांगितलेली आहे; परंतु कृतघ्नाला प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं.

नाहीं, शठ नाहीं, क्रूर नाहीं, असत्य भाषण करणारा नाहीं, आणि गैरमार्गानें चालणाराही नाहीं. हे वीरा, संग्राममध्यें इतरांना दुर्घट असें जें कार्य रामानें केलें आहे, तो झालेला रामाचा उपकार हा वीर विसरलाही नाहीं. हे शत्रुतापना, रामाच्या प्रसादामुळेंच कीर्ति, रुमा, मी आणि अक्षय्य वानरराज्य हीं सुग्रीवाला इहलोकीं प्राप्त झालेलीं आहेत. पूर्वी अतिशयच दुःख भोगलेल्या ह्या सुग्रीवाला हें उत्कृष्ट सुख मिळाल्यामुळें विश्वामित्र मुनीप्रमाणें हा ग्राम्य सुखांत दंग झाला आहे, आणि म्हणूनच ह्याला प्रतिज्ञा शेवटास नेण्याचा समय प्राप्त झाल्याचें भान राहिलेलें नाहीं. लक्ष्मणा, घृताची नामक अप्सरेचे ठिकाणीं आसक्त होऊन राहिलेल्या धर्मात्म्या विश्वामित्र महामुनींना दहा वर्षें लोटलेलीं एका दिवसाप्रमाणें भासलीं. सारांश, कालवेत्त्यामध्यें श्रेष्ठ असलेल्या महातेजस्वी विश्वामित्र मुनींना जर प्राप्त झालेल्या कालाचें भान राहिलें नाहीं, तर जो बेढंग चालणारा क्षुद्र योनींतील सुग्रीव, त्याची अशी अवस्था झाली ह्यांत आश्चर्य तें काय? लक्ष्मणा, विषयोपभोगाविषयीं तृप्त न झाल्यामुळें कामशांतिरूप देहधर्मामध्यें गढून राहिलेल्या ह्या खिन्न सुग्रीवाला रामानें क्षमा करावी. बा लक्ष्मणा, खरी गोष्ट समजून न घेतां ज्याप्रमाणें एखादा साधारण मनुष्य क्रोधाधीन होतो, त्याप्रमाणें तूं क्रोधाधीन होऊं नको. कारण, हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्यासारखे सत्त्वगुणसंपन्न पुरुष विचार केल्यावांचून एकाएकी क्रोधाच्या तावडींत सांपडत नाहीत. तस्मात्, हे धर्मवेत्त्या, सुग्रीवाचें हित करण्याविषयीं तत्पर असलेली ही मी तुझी प्रार्थना करीत आहें. ह्यास्तव, ह्या क्रोधजन्य प्रचंड क्षोभाचा तूं त्याग कर. रामाचें प्रिय करण्याकरितां रुमा, मी, अंगद, राज्य, धन, धान्य व पशु ह्या सर्वांचाही सुग्रीव त्याग करील असें मला वाटतें. त्या राक्षसाधमाचा वध करून, रोहिणीशीं संगत झालेल्या चंद्राप्रमाणें सुग्रीव रामाचा सीतेशीं समागम करवून देईल. एक महापद्म, तीन लक्ष आणि नव्याण्णव हजार सहाशें इतके राक्षस लंकेमध्यें आहेत. तेव्हां त्या यथेष्ट रूप धारण करणाऱ्या अजिंक्य राक्षसांचा वध केल्यावांचून सीतेचा अपहार केलेल्या रावणाचा वध होणें शक्य नाहीं; आणि, लक्ष्मणा, संग्राममध्यें कोणाचें साहाय्य नसेल तर रामाच्या हातून त्या राक्षसांचा वध होणें शक्य नाहीं, आणि रावणही क्रूरकर्मी आहे; तस्मात्, रामाला सुग्रीवाच्या मदतीची विशेषच जरूर आहे. ह्याप्रमाणें मला वालीनें सांगितलें होतें. तो वानरराज माहीतगार होता. हा प्रकार मला काही पुरतासा माहित नाहीं; त्या वालीपासून ऐकिलें असल्यामुळें मी सांगत आहें. तुला साहाय्य करण्याकरितां म्हणजे रावणाशीं होणाऱ्या युद्धामध्ये तुझ्या बाजूला मोठमोठे असंख्य वानर आणण्याकरितां वानरश्रेष्ठ बाहेर पाठविले आहेत, आणि रामाचा मनोरथ परिपूर्ण व्हावा एतदर्थ त्या अत्यंत महाबलाढ्य व पराक्रमी वानरांची हा वानरराज सुग्रीव प्रतीक्षा करीत आहे, व म्हणून इतक्यातच हा बाहेर पडत नाहीं. लक्ष्मणा, सुग्रीवानें ज्याप्रमाणें वानर येथें येण्याची कालमर्यादा करून ठेविली आहे, त्याप्रमाणें ते सर्वही महाबलाढ्य वानर आज येथें येतील. हे शत्रुदमना, हजार कोट ऋक्ष, आणि शेकडों गोलांगूल आज तुझ्याकडे येतील; तूं क्रोधाचा त्याग कर. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना, उज्ज्वल तेजानें युक्त असे कोट्यवधि वानर सुग्रीवाचे ताब्यांत आहेत. हे तुझें मुख, आणि कोपामुळें रक्तासारखे लाल झालेले हे तुझे नेत्र दृष्टीस पडल्यापासून मोठमोठ्या वानरस्त्रियांचीं मनें अस्वस्थ झालेलीं आहेत. कारण, वालीचा वधरूप जें कृत्य तुझ्या ज्येष्ठ भ्रात्यानें केलें आहे, तें लक्षांत आणून आम्ही भयभीत झालों आहों; आणि सुग्री[illegible]

हातून तीच अवस्था होईल की काय अशी आम्हांला शका वाटत आहे."

## सर्ग छत्तिसावा.

—:०:—

### लक्ष्मण व सुग्रीव यांचें प्रेमयुक्त भाषण.

ह्याप्रमाणें धर्माला अनुसरून असलेलें व विनययुक्त असें तें तारेचें भाषण त्या सौम्यस्वभावी लक्ष्मणाला मान्य झालें असें पाहून, अंगावरील ओलें वस्त्र ज्याप्रमाणें टाकून देतात त्याप्रमाणें, लक्ष्मणाचें जें अतिशय भय वाटत होतें तें सुग्रीवानें टाकून दिलें. तदनतर, कठामध्यें असलेली मोठी व अनेक पदरी अद्भुत पुष्पमाला त्यानें तोडून टाकिली, व त्यामुळे त्याचा विषयमद लगेच नाहीसा झाला. तेव्हां सर्व वानरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या सुग्रीवानें भयंकर शक्तीनें युक्त असलेल्या लक्ष्मणाला हर्ष उत्पन्न करीत करीत विनययुक्त शब्दांनीं भाषण केलें: तो म्हणाला, "लक्ष्मणा, वैभव, कीर्ति आणि अक्षय्य वानरराज्य हें सर्व नाहींसें झालें होतें; परंतु रामाच्या कृपेमुळें मला हें पुनरपि प्राप्त झालें. तेव्हां, हे राजकुमारा, स्वपराक्रमानें प्रख्यात असलेल्या त्या देवावतारी रामाच्या उपकाराची तशा प्रकारें फेड अशतः तरी करण्यास कोण समर्थ आहे? माझें एक नांवाला मात्र साहाय्य त्याला होणार आहे; परतु वास्तविक विचार केला असतां तो धर्मात्मा रघुवंशज राम स्वतःच्याच तेजानें रावणाचा वध करील आणि सीता प्राप्त करून घेईल. अरे, ज्यानें एकाच बाणानें सात प्रचंड वृक्ष, पर्वत व पृथ्वी हीं विदीर्ण केलीं, त्याला दुसऱ्याच्या साहाय्याचा खरोखर काय बरें उपयोग होणार आहे? लक्ष्मणा, जो धनुष्य ओढूं लागला असतां त्याच्या ध्वनीनें भूमि पर्वतासहवर्तमान कपित झाली, त्याला इतर साहाय्य करणाऱ्यांची काय बरें गरज आहे? तथापि, हे पुरुषश्रेष्ठा, युद्धामध्यें पुढारीपणा करणाऱ्या इतर राक्षसांसहवर्तमान शत्रु रावणाचा वध करण्यास राजा राम निघाला असतां त्याच्या मागोमाग मी येणार. ह्यास्तव, हा स्वभावाचा सौम्य आहे ह्या विश्वासामुळें किंवा सलगीमुळें ह्या दासाचा जर काही अपराध झाला असेल, तर तो क्षमा करावा. कारण, ज्याच्या हातून अपराध घडणारच नाही असा कोणीही नाहा."

ह्याप्रमाणें तो महात्मा सुग्रीव बोलूं लागला असतां लक्ष्मण सतुष्ट झाला, आणि प्रेमानें त्याला म्हणाला, "हे वानरराज सुग्रीवा, तू नाथ—आणि विशेषतः विनयसपन्न नाथ—प्राप्त झाल्यामुळें माझा भ्राता राम खरोखर आज सर्व प्रकारें सनाथ झालेला आहे. सुग्रीवा, तुझा प्रभाव आणि अशा प्रकारचें तुझें हे निर्मळ आचरण लक्ष्यांत घेतलें असतां, तू वानरराज्याच्या अनुपम वैभवाचा उपभोग घेण्यास योग्यच आहेस. ह्यावर, तुझें साहाय्य मिळाल्यामुळें राम प्रतापी होईल, आणि सग्रामामध्ये लवकरच शत्रूचा वध करील ह्यांत शका नाही. सुग्रीवा, धर्मज्ञ, कृतज्ञ आणि समरांगणांतून परत न फिरणाऱ्या तुला हें सयुक्तिक भाषण योग्यच आहे. माझा ज्येष्ठ भ्राता आणि तू ह्यांशिवाय दुसरा कोण बरें समजस पुरुष दुसऱ्याच्या सामर्थ्याविषयी प्रशसा करणार आहे? हे वानरश्रेष्ठा, बल व पराक्रम ह्यांनीं तू रामाची बरोबरी करणारा आहेस, आणि देवतांनी तुला चिरकाल साहाय्यकर्ता म्हणून रामाचे स्वाधीन केलेला आहे. तथापि, हे वीरा, माझ्याबरोबर तूं येथून लवकर बाहेर नीघ, आणि भार्येचा अपहार झाल्यामुळें दुःखित झालेल्या आपल्या मित्राचें सांत्वन कर; आणि शोकाकुल झालेल्या रामाचें भाषण लक्ष्यात आणून मी जे कठोर शब्द तुला उद्देशून उच्चारिले त्याची मला क्षमा कर."

# सर्ग सदतिसावा.

—:०:—

## वानरसैन्य बोलाविणें.

ह्याप्रमाणें महात्म्या लक्ष्मणानें सुग्रीवाशीं भाषण केलें असतां, शेजारीं असलेल्या हनुमानाला सुग्रीव म्हणाला, "महेंद्र, हिमालय, विंध्य व कैलास ह्यांचीं शिखरें आणि श्वेतवर्ण शिखरांनीं युक्त असलेला मंदर ह्या पांच पर्वतांवर जे आहेत, बालसूर्यासारख्या आरक्तवर्ण व समुद्राच्या तीरीं पश्चिम दिशेला नेहमीं झळकत असलेल्या पर्वताचे ठिकाणीं जे वास्तव्य करीत आहेत, सायंकालसमयीं पश्चिम दिशेस दिसणाऱ्या अभ्राप्रमाणें आरक्तवर्ण असलेल्या उदयाचलावर ज्यांचें वास्तव्य आहे, पद्माचलाच्या वनाचा आश्रय करून जे भयंकर वानरश्रेष्ठ राहिलेले आहेत, कांतीनें नीलमेघांप्रमाणें असून गजेंद्राप्रमाणें महाबलाढ्य असलेले जे वानर अंजन पर्वतावर रहात आहेत, सुवर्णासारखे देदीप्यमान असे जे वानर मोठमोठ्या पर्वतांच्या गुहांमध्यें वस्ती करून राहिलेले आहेत, मेरु पर्वतासमीप जे रहात आहेत, धूम्र पर्वताचा ज्यांनीं आश्रय केलेला आहे, कांतीनें बालसूर्याप्रमाणें असून प्रचंड वेग धारण करणारे असे जे वानर मैरेय मद्य पीत महारुण पर्वतावर राहिले आहेत, आणि अत्यंत रमणीय व सुगंधि अशा मोठमोठ्या वनांतून व तापशांच्या आश्रमामुळें मनोहर बनलेल्या वनप्रदेशांतून सर्व वनांनीं ज्यांनीं तळ दिलेला आहे, अशा पृथ्वींतील ठिकठिकाणच्या सर्व वानरांना तूं येथें सत्वर जमीव. पूर्वीं पाठविलेल्या वानरांपेक्षां शीघ्र गमन करणारे दुसरे वानर पाठवून, आणि सामदानप्रभृति योग्य उपाय योजण्याविषयीं त्यांना सांगून, या सर्व वानरांना येथें आणविण्याची तूं तजवीज कर. मोठे वेगवान म्हणून जे मला माहीत होते, ते मीं प्रथम पाठविलेच आहेत. तेव्हां आतां त्यांना त्वरा करण्याकरितां तूं आणखीही श्रेष्ठ श्रेष्ठ वानर तिकडे पाठवून दे. विषयोपभोगांविषयीं आसक्त आणि चेंगट असे जे कोणी असतील, त्या सर्व वानरश्रेष्ठांना तूं सत्वर इकडे घेऊन ये. दहा दिवसांत माझ्या आज्ञेप्रमाणें जे येणार नाहींत, त्या राजाज्ञा भंग करणाऱ्या दुष्टांचा वधच केला पाहिजे. माझ्या हुकुमांत असलेले शेंकडों, हजारों, कोटों वानरश्रेष्ठ माझ्या आज्ञेनें चालते होऊं द्या. शरीरानें मेघ व पर्वत ह्यांच्यासारखे असल्यामुळें, जातांना जसे कांहीं आकाश आच्छादन करणारे आणि दिसण्यांतही भयंकर असलेले वानरश्रेष्ठ माझ्या आज्ञेनें येथून चालते होऊं द्या. शीघ्र गति म्हणजे काय हें समजणारे ते सर्व वानर माझ्या आज्ञेनें येथून चालते होऊन पृथ्वींतील सर्व वानर माझ्या हुकुमावरून सत्वर घेऊन येोत."

ह्याप्रमाणें त्या वानरराजाचें भाषण श्रवण केल्यावर वायुपुत्र हनुमानानें सर्व दिशांस पराक्रमी वानर पाठवून दिले. तेव्हां पक्षी व नक्षत्रें ह्यांच्या मार्गानें गमन करणारे असे ते राजानें पाठविलेले वानर एका क्षणांत आकाशामध्यें उडून गेले; आणि समुद्र, पर्वत, वनें आणि सरोवरें ह्या ठिकाणीं जाऊन तेथील सर्व वानरांना त्यांनीं रामाकरितां सुग्रीवाकडे जमण्यास सांगितलें. तेव्हां, मृत्यूची अथवा कालाचीच उपमा ज्याला योग्य आहे अशा त्या राजाधिराज सुग्रीवाची आज्ञा श्रवण करितांक्षणीं त्याचें भय बाळगून वानर सुग्रीवाकडे आले. सारांश, कांतीनें कज्जलासारखे असलेले तीन कोट महाबलाढ्य वानर अंजन पर्वतापासून निघून रामाकडे आले. जिकडे सूर्याचा अस्त होतो, त्या श्रेष्ठ पर्वताचे ठिकाणीं क्रीडा करणारे आणि कांतीनें तप्त सुवर्णाप्रमाणें असलेले असे दहा कोट वानर त्या अस्ताचल पर्वतापासून निघाले. सिंहाच्या आयाळाप्रमाणें ज्यांची कांति आहे असे सहस्र

कोट वानर कैलास पर्वताच्या शिखरांपासून आले. फलमूलावर उपजीविका करून जे हिमालय पर्वताचा आश्रय करून राहिले होते, असे एक शंकु वानर तेथून निघाले. अग्नीसारखे तेजस्वी आणि पराक्रमाने व आकृतीनेही भयंकर असे हजारो कोट वानर विंध्यपर्वतापासून सत्वर निघाले. क्षीरसमुद्राच्या तीरी वास्तव्य करणारे, तमालवनामध्ये राहणारे, आणि नारिकेलवनात वसति करणारे वानर किती आले त्याची गणतीच नाही. सारांश, वने, पर्वताच्या गुहा आणि नद्या ह्यापासून महाबलाढ्य वानर निघाले; आणि ती वानरसेना सूर्याला गिळनच टाकीत आहे की काय अशा रीतीने आकाशात उड्डाण करीत करीत तेथे येऊन थडकली. सर्व वानराना त्वरा करण्याकरितां मागाहून जे वीर वानर गेले होते, त्यानी हिमालय पर्वतावर एक अतिप्रसिद्ध महा वृक्ष अवलोकन केला. त्या पवित्र व श्रेष्ठ पर्वतावर पूर्वी अत्यंत मनोहर असा महेश्वर यज्ञ झाला, व त्याच्या योगाने सर्व देवताचे मन संतुष्ट झाले. होमद्रव्याच्या स्त्रावापासून उत्पन्न झालेली व अमृतासारखी मधुर असलेली मुळे व फळे वानरांनी तेथे अवलोकन केली. त्या होमद्रव्यापासून झालेली दिव्य व मनोहर फळेमुळे जो कोणी एकदा खातो, तो एक महिनाभर तृप्त राहतो. ती दिव्य फळे व मुळे आणि दिव्य औषधे, फलावर उपजीविका करणाऱ्या वानरश्रेष्ठानी घेतली, आणि सुग्रीवाला संतुष्ट करण्याकरिता त्या यज्ञस्थलापासून वानरांनी सुगंधि पुष्पेही आणिली. नंतर, पृथ्वीतील सर्व वानराना येण्याची आज्ञा कळवून ते येण्याच्यापूर्वीच ते शीघ्रगामी वानर किष्किंधेंत येऊन पोहोचले. नंतर सर्व औषधि, फळे व मुळे घेऊन आलेल्या त्या वानरानी सुग्रीवाला ती अर्पण केली, आणि ते म्हणाले, "सर्व पर्वत, नद्या व वने आम्ही धुडाळली. पृथ्वीतील सर्व वानर ... आज्ञेप्रमाणे इकडे येत आहेत."

त्याचे हे भाषण श्रवण करितांक्षणीं वानरराज सुग्रीवाला हर्ष झाला, आणि संतुष्ट होऊन त्याने त्यांच्या सर्व नजराण्याचा स्वीकार केला.

## सर्ग अडतिसावा.

—:०:—

### सुग्रीवाचें रामचंद्राकडे गमन.

अशा प्रकारे पराक्रम गाजविलेल्या त्या हजारो वानरानी आणिलेला तो सर्व नजराणा घेऊन व त्यांचे सांत्वन करून, सुग्रीवाने त्या सर्वांना स्थळीं वर जाण्यास निरोप दिला; आणि तो आपल्याला व महाबलाढ्य रामाला कृतार्थ मानू लागला. (उभयतं चेही काम झालेच असे समजू लागला.) नंतर, प्रचंड बलाने युक्त असून सर्व वानरामध्ये श्रेष्ठ असलेल्या त्या विनयसंपन्न सुग्रीवाला हर्ष उत्पन्न करीत करीत तो लक्ष्मण म्हणाला, "हे विनयसंपन्न सुग्रीवा, तुला बरे दिसत असल्यास किष्किंधा नगरीतून तू आता बाहेर चल." हे लक्ष्मणाचे उत्कृष्ट भाषण श्रवण करून सुग्रीव अत्यंत संतुष्ट झाला, आणि म्हणाला, "ठीक आहे, आम्ही चलतो; मला तुझ्या आज्ञेप्रमाणे वागलेच पाहिजे."

याप्रमाणे सांगून शुभ लक्षणानी युक्त असलेल्या लक्ष्मणाला आणि ताराप्रभृति स्त्रियाना सुग्रीवाने जाण्यास सांगितले, आणि नंतर उच्च स्वराने 'इकडे या' म्हणून त्या मुख्य मुख्य वानराना हाक मारिली. तेव्हा, स्त्रिया दृष्टीस पडण्यास ज्याना हरकत नव्हती असे खासगीपैकी जे काही वानर तेथें होते, ते त्याची हांक ऐकतांक्षणी लगेच हात जोडून तेथे आले. तेव्हां सूर्यासमान तेजस्वी सुग्रीव त्यांना म्हणाला, "वानरहो, माझी पालखी लवकर तयार करा." ही त्याची आज्ञा श्रवण करितांक्षणीं शीघ्रगामी वानरानी दिसण्यांत मनोहर असलेली पालखी तेथें आणिली. पालखी आणिलेली पाहून तो वानर-

राज सुग्रीव लक्ष्मणाला म्हणाला, "लक्ष्मणा, सत्वर आरोहण कर." असें लक्ष्मणाला सांगितल्यानंतर तो सुग्रीव लक्ष्मणासहवर्तमान अनेक वानरांनीं युक्त अशा त्या सूर्यासारख्या तेजस्वी वाहनामध्ये आरूढ झाला; व मस्तकीं धारण केलेले श्वेत छत्र, सभोंवतीं वारल्या जाणाऱ्या शुभ्र चवऱ्या, शंख व भेरी ह्यांचे ध्वनि आणि भाट ह्यांच्या योगानें आनंदित झालेला व अशा प्रकारें अनुपम राज्यवैभव प्राप्त झालेला तो सुग्रीव किष्किंधा नगरीतून निघाला; आणि जिकडे राम होता तिकडे गेला. रामानें आश्रय केलेल्या त्या श्रेष्ठ प्रदेशावर आल्यानंतर तो महातेजस्वी सुग्रीव लक्ष्मणासहवर्तमान पालखींतून खालीं उतरला. आणि रामाजवळ जाऊन हात जोडून उभा राहिला; आणि तो हात जोडून उभा राहिल्यावर बरोबर आलेले वानरही त्याच्याचप्रमाणें हात जोडून उभे राहिले. तेव्हां कमळकलिकांनीं भरून गेलेल्या तटाकाप्रमाणें वानरांचें तें प्रचंड सैन्य अवलोकन करून, आणि त्या सुग्रीवालाही पाहून राम त्याच्यावर संतुष्ट झाला.

## रामसुग्रीवसंवाद.

नंतर, चरणीं मस्तक ठेविलेल्या त्या वानरराजाला उठवून बहुमानपूर्वक धर्मात्म्या रामानें त्याला सप्रेम आलिंगन दिलें, आणि "बैस" म्हणून सांगितलें. नंतर तो म्हणाला, "धर्म, अर्थ व काम ह्यांचे जो योग्य वेळीं नेहमीं कालविभागपूर्वक सेवन करितो, तो खरा राजा होय. परंतु धर्म व अर्थ ह्यांची पर्वा न करितां जो कामाचेंच सेवन करितो, तो, वृक्षाग्रावर झोंपीं गेलेला पुरुष ज्याप्रमाणें खालीं पडल्यावर जागा होतो त्याप्रमाणें, ऐश्वर्यापासून भ्रष्ट झाल्यानंतर शुद्धीवर येतो. शत्रूंच्या वधाविषयीं तत्पर, मित्र जुळविण्याविषयीं दक्ष, आणि धर्म, अर्थ व काम ह्या त्रिवर्गाच्या फलाचा उपभोग घेणारा असा जो पुरुष असेल, तोच धर्मदृष्ट्या राजा होणें योग्य आहे. हे शत्रुनाशका, हा उद्योगाचा समय प्राप्त झाला आहे. तेव्हां तूं आपल्या मंत्र्यांसहवर्तमान काय तो विचार कर."

ह्याप्रमाणें रामचंद्रानीं सांगितलें असतां सुग्रीव त्यांना म्हणाला, "हे महापराक्रमी रामा, वैभव, कीर्ति आणि अक्षय्य वानरराज्य हें सर्व नाहींसें झालें असूनही तुझ्या प्रसादामुळें मला पुनरपि प्राप्त झालें आहे. हे देवा, हे विजयिश्रेष्ठा, तुझ्या व तुझ्या भ्रात्याच्या कृपेमुळें माझ्यावर जे उपकार झाले आहेत, त्यांविषयीं कृतज्ञता न बाळगणारा जो असेल तोच सर्व पुरुषांमध्ये धर्मनाशक समजला पाहिजे. हे शत्रुनाशका, हे शेंकडो श्रेष्ठ श्रेष्ठ वानर पृथ्वीतील सर्व बलाढ्य वानरांस घेऊन येथें आले आहेत. राघवा, अरण्यांतील आणि वनांतील दुर्गम प्रदेशांचे माहीतगार व दिसण्यांत भयंकर असे हे शूर ऋक्ष, वानर व गोलांगूल येथें आले आहेत; आणि त्याचप्रमाणें यथेष्ट रूप धारण करणारे देवपुत्र व गंधर्वपुत्र वानर आपआपल्या सैन्यांनीं परिवेष्टित असल्यामुळें मार्गामध्येंच तळ देऊन आहेत. हे शत्रुतापना वीरा, वानरसेनाधिपति वानर शंभरशंभरांच्या, लाखालाखांच्या, दहा दहा हजारांच्या, शंकूशंकूंच्या, अब्जाअब्जांच्या, खर्वाखर्वांच्या आणि निखर्वानिखर्वांच्या टोळ्यांनीं परिवेष्टित झालेले आहेत, आणि अशा सैन्यांनीं परिवेष्टित झालेले सेनाधिपति अब्ज व महापद्म ह्या संख्यांनीं मोजितां येण्यास रखे आहेत. राजा, मेरु व विंध्य ह्यांवर ठाणें देऊन राहिलेले, पराक्रमानें इंद्राची बरोबरी करणारे, आणि शरीरानें मेघ व पर्वत ह्यांप्रमाणें असलेले वानर तुझ्याकडे येतील. सारांश, समरांगणामध्यें राक्षसांशीं युद्ध करण्याकरितां ते तुझ्याबरोबर येतील, आणि युद्धांत रावणाचा वध करून सीतेला तुझ्याकडे आणून देतील."

ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितल्यावर असें त्याच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या त्या [illegible]

उद्योग अवलोकन करून, हर्षामुळें त्या वीर्यवान राजकुमाराची मुद्रा विकसित झालेल्या नीलकमलासारखी आल्हादकारक दिसू लागली.

## सर्ग एकुणचाळिसावा.

—:०:—

### वानरसेनापतींचें ससैन्य आगमन.

ह्याप्रमाणें हात जोडून भाषण करणाऱ्या सुग्रीवाला कडकडून भेटल्यावर, धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेले राम त्याला म्हणाले, "अरे, इंद्रानें जर पर्जन्यवृष्टि केली, किंवा हजारों किरणांनीं युक्त असलेल्या ह्या सूर्यानें आकाश अंधकाररहित केलें, चंद्रानें आपल्या प्रभेच्या योगानें रात्र निर्मल करून टाकिली, किंवा तुझ्यासारख्यानें मित्रांवर प्रेम केलें, तर कांहीं आश्चर्य म्हणतां येणार नाहीं. सारांश, हे विनयसंपन्न सुग्रीवा, प्रत्युपकार करण्याकरितां तूं जें हें आपलें उत्कृष्ट आचरण दाखविलें आहेस, हेंही कांहीं तुझ्यासंबधानें आश्चर्य नव्हे. सुग्रीवा, तूं नेहमी प्रिय भाषण करणारा आहेस हें मी जाणीत आहें. मित्रा, तुझ्याच योगानें मी सनाथ झालों असून तुझ्याच साहाय्यानें मी संग्रामामध्यें सर्व शत्रूंना जिंकणार आहे, आणि माझा सहृद व मित्र काय तो तूच आहेस. ह्यास्तव, तूं मला साहाय्य कर. शचीच्या पित्याला फसवून स्वतःच्या नाशाकरितां पुलोमकन्या शचीचा अपहार करणाऱ्या अनुल्हादाप्रमाणें ज्या राक्षसधर्मानें सीता हरण केली, त्या रावणाचा, शत्रुघातक इंद्रानें ज्याप्रमाणें गर्वानें चढलेल्या शचीच्या पित्याचा व अनुल्हादाचा वध केला त्याप्रमाणें, मी तीक्ष्ण बाणांच्या योगानें लवकरच वध करीन."

असे रामचंद्रांचें बोलणें चाललें आहे तोंच वायधूळ उटली, आणि तिनें अंतरिक्षामध्ये असलेल्या सूर्याच्या उष्ण व ताम्र प्रभेला आच्छादित करून टाकलें. त्या अंधारानें दिशा भरून गेल्यामुळें, ही कोणची व ती कोणची हें समजासें झालें; व पर्वत, वनें आणि अरण्यें ह्यांसहवर्तमान सर्व पृथ्वी डळमळू लागली. इतक्यांत, तीक्ष्ण दंष्ट्रांनीं युक्त व नगतुल्य अशा महाबलाढ्य असंख्य वानरांनीं सर्व भूमि व्यापून गेली. नंतर एका क्षणांतच शतबली नांवाचा वैभवशाली वीर वानर दृष्टीस पडूं लागला. तो वानर प्रसिद्ध प्रसिद्ध वानरसेनानायकांनीं व शेंकडों कोट परिवार बरोबर असलेल्या दुसऱ्याही वानरसेनाधिपति वानरांनीं परिवेष्टित झालेला होता; आणि त्याचप्रमाणें नद्या, पर्वत व समुद्र ह्या ठिकाणीं वास्तव्य करणारे महाबलाढ्य वानर, व मेघांसारखी गर्जना करणारे दुसरेही अरण्यवासी वानर त्याला वेढून राहिलेले होते. इतकेंच नव्हे, परंतु दुसरेही एक निखर्व वानर त्याच्या भोंवतीं होते. त्यांपैकीं कांहींचा वर्ण बालसूर्याप्रमाणें होता, कांहीं चंद्रासारखे गौरवर्ण होते, कांहींचा वर्ण कमलांतील परागाप्रमाणें होता, आणि कांहीं श्वेतवर्ण असून हिमालय पर्वतावर घर करून राहिलेले होते. असो. शतबली वानर आल्यानंतर सुवर्णपर्वतासारखा असलेला ताराचा बलाढ्य पिताही हजारों कोट वानरांनीं परिवेष्टित असलेला दृष्टीस पडू लागला. त्याचप्रमाणे दुसरे एक खर्व वानर बरोबर घेऊन रुमेचा समर्थ पिता म्हणजे सुग्रीवाचा श्वशुर प्राप्त झाला. नंतर, कांतीनें व मलपरागाप्रमाणें असलेला व बालसूर्यासारख्या तेजस्वी मुखानें युक्त असलेला सर्व वानरांमध्यें उत्कृष्ट आणि वानरश्रेष्ठ असा वैभवशाली बुद्धिमान केसरी म्हणजे हनुमानाचा पिता हजारों वानर बरोबर घेऊन आलेला दृष्टीस पडूं लागला. गोलांगूलसंज्ञक वानरांचा अधिपति जो भयंकर पराक्रमी गवाक्ष, तो एक खर्व वानरांनीं परिवेष्टित असलेला दृष्टीस पडला. प्रचंड वेग धारण करणारे दोन खर्व ऋक्ष बरोबर घेऊन शत्रुनाशक धूम्र पुढें आला. प्रचंड पर्वताप्रमाणें धिप्पाड

असे तीन कोट भयकर वानर बरोबर घेऊन महावीर्यवान पनस नामक वानरसेनाधिपति तेथे आला. आकाराने नील पर्वतासारखा असलेला नील नामक धिप्पाड वानरसेनाधिपति दहा कोट वानरांनी परिवेष्टित असलेला दिसू लागला तदनतर, सुवर्णपर्वताप्रमाणे दिसत असलेला महावीर्यवान गवय नामक सेनाधिपति पांच कोट वानरासहवर्तमान तेथे आला. एक खर्व वानरांनी परिवेष्टित असलेला दरीमुख नामक बलाढ्य सेनाधिपति तेथे आला, व सुग्रीवाजवळ येऊन उभा राहिला. नतर मैंद व द्विविद हे उभयता महाबलाढ्य अश्विनीकुमाराचे पुत्र एक एक खर्व वानर बरोबर घेऊन तेथे आलेले दृष्टीस पडू लागले. नतर, सुग्रीवाच्या आज्ञेने असलेला जाबवान् नावाचा महातेजस्वी ऋक्षराज दहा कोट वानर बरोबर घेऊन तेथे आला. रुमण नामक तेजस्वी व महाबलाढ्य वानर एक अब्ज सैन्य बरोबर घेऊन सत्वर तेथे आला; तो पराक्रमी वानरांनी परिवेष्टित झालेला होता. नतर त्याच्या मागोमाग निघालेला गधमादन एक शकु व एक महापद्म वानर बरोबर घेऊन तेथे आला. तदनतर, हजार पद्म व शभर शकु वानर बरोबर घेऊन पित्यासारखा पराक्रमी युवराज अगद प्राप्त झाला तदनतर, नक्षत्रासारखा तेजस्वी तार भयकर पराक्रम करणाऱ्या पाच कोट वानरासहवर्तमान लाबून दिसू लागला नतर ज्ञानी आणि वीर असा इद्रजानु नामक सेनाधिपति दृष्टीस पडू लागला; तो अकरा कोट वानराचा अधिपति असून त्यांनी परिवेष्टित झालेला होता. तदनतर, मध्याह्नकालच्या सूर्याप्रमाणे प्रखर तेजाने युक्त असलेला रभ तेथे आला; त्याच्याबरोबर शभर, हजार आणि दहा हजार अशा वानराच्या तीन टोळ्या होत्या. तदनतर, वीर व बलाढ्य असा दुर्मुख नामक सेनाधिपति दोन कोट वानरांनी परिवेष्टित असलेला दृष्टीस पडू लागला. नतर, आकाराने कैलासशिखराप्रमाणे असलेला भयकर पराक्रमी व एक खर्व वानर घेऊन आलेला हनुमान दृष्टीस पडला. वृक्षावर वास्तव्य करणाऱ्या वानराची एक अब्जाची, एक हजाराची, आणि एक शभराची अशा तीन टोळ्या बरोबर घेऊन महावीर्यवान नल तेथे आला. दहा कोट वानरानी परिवेष्टित असलेला श्रीमान दरीमुख¹ गर्जना करीत करीत त्या महात्म्या सुग्रीवासमीप आला. नतर शरभ, कुमद, वह्नि आणि रभ हेही वानर तेथे आले; आणि दुसरेही यथेष्ट रूप धारण करणारे आणि पृथ्वी, पर्वत व वने व्याप्त करून राहिलेले जे पुष्कळच सेनाधिपति वानर तेथे आले, त्याची तर गणनाच करिता येत नाही. तात्पर्य, पृथ्वीमध्ये वास्तव्य करून राहिलेले सर्व उड्या मारणारे वानर लहानमोठ्या उड्या टाकीत टाकीत व गर्जना करीत करीत तेथे आले, आणि मेघसमुदाय ज्याप्रमाणे सूर्याला आच्छादून टाकितात, त्याप्रमाणे ते सुग्रीवाच्या भोवती गराडा देऊन उभे राहिले. दूरदूरच्या प्रदेशातून अनेकप्रकारच्या गर्जना करीत आलेले पराक्रमी वानर मस्तके नम्र करून राजा सुग्रीवाला आपण आल्याचे निवेदन करू लागले. दुसरे श्रेष्ठ श्रेष्ठ वानर यथायोग्य रीतीने सुग्रीवाची भेट घेऊन पलीकडे झाले; व दुसरे काही, सुग्रीवाची भेट झाल्यावर तेथेच उभे राहिले.

नतर धर्मवेत्त्या सुग्रीवाने त्वरा करून सत्वर आलेल्या त्या वानराची रामाला खबर दिली, आणि तो जवळच हात जोडून उभा राहिला, व सेनाधिपतींना विचारू लागला, 'हे वानरसेनानायकहो, पर्वत, जलप्रवाह व सर्व वने ह्या ठिकाणी योग्य रीतीने आपआपल्या सैन्याचा

¹ या नावाचे दोन अधिपति होते—एक हा, आणि दुसरा, मागे सांगितलेला एक खर्व वानर घेऊन आला होता, तो.

गेल्यानंतर, आरक्तवर्ण जलानें युक्त अशा लोहित नामक सागराला तुम्ही जा, म्हणजे त्या ठिकाणी तो मोठा कूटशाल्मलीचा (काळ्या सांवरीचा) वृक्ष तुमच्या दृष्टीस पडेल; आणि त्याचप्रमाणें, नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषित असें जें कैलास पर्वतासारखें गरुडाचें गृह विश्वकर्म्यानें निर्माण केलें आहे, तेंही तुमच्या दृष्टीस पडेल. तेथें मंदेह नामक पर्वततुल्य क्रूरकर्मी व भयंकर राक्षस नानाप्रकारचीं रूपें धारण करून पर्वतशिखरांचे ठिकाणी अधोमुख होऊन लोंबत असतात. सूर्योदयसमयीं ते नेहमीं ऊर्ध्वमुख होऊन सूर्याशीं युद्ध करूं लागतात, आणि सूर्यमंडळगत ब्रह्मतेजानें तप्त होऊन व प्रत्यहीं द्विजांच्या हातून होणारीं जीं अर्घ्यदानादि कर्में त्यांच्या सामर्थ्यानें वध पावून, उदकामध्यें पडत असतात, व पुनरपि सूर्यास्त झाल्यानंतर जिवंत होऊन पर्वतशिखरांचे ठिकाणीं लोंबकळूं लागतात. तदनंतर, श्वेतवर्ण मेघाप्रमाणें दिसत असलेल्या क्षीरसागराकडे जा, आणि लाटांमुळें मोत्यांच्या हारांनीं भूषित झाल्याप्रमाणें भासत असलेल्या त्या सागराला तुम्ही अवलोकन करा. त्या सागरामध्यें ऋषभ म्हणून एक मोठा श्वेत पर्वत आहे. तो दिव्यगंधांनी युक्त व प्रफुल्लित असून, ठिकठिकाणीं भूप्रदेश व्यापून राहिलेल्या वृक्षांनीं परिवेष्टित झालेला असतो. राजहंसांनी गजबजून गेलेलें असें एक सुदर्शन नामक प्रसिद्ध सरोवरही तेथें आहे, व तें पीतवर्ण परागांनी युक्त अशा उज्ज्वल श्वेतकमलांनी भरलेलें आहे. देव, चारण, यक्ष, किन्नर आणि अप्सरांचे समुदाय आनंदित होऊन क्रीडा करण्याच्या उद्देशानें त्या सरोवरावर येत असतात. असो. क्षीरसागर ओलांडल्यावर, सर्व प्राण्यांना भय उत्पन्न करणारा असा एक नेहमीं चंचल असलेला जलसमुद्र तुमच्या दृष्टीस पडेल. त्या जलसमुद्रामध्यें और्व ब्रह्मर्षीच्या कोपापासून ब्रह्मदेवानें एक घोडीच्या मुखासारखें प्रचंड तेज करून ठेविलें आहे. हे अद्भुत व महावेगानें युक्त असलेलें सर्व स्थावरजंगमात्मक जगत् त्या तेजोरूप मुखाचें प्रलयसमयीं भक्ष्य होत असतें. वडवामुख दृष्टीस पडतांक्षणीं, त्यांत पडूं कीं काय ह्या भीतीनें आक्रोश करूं लागलेल्या दुर्बल जलचर प्राण्यांचा ध्वनि कानावर येत असतो. शुद्धजलसमुद्राच्या उत्तर तीरावर तेरा योजनेंपर्यंत लांब असलेला एक जातरूपशील म्हणून फारच मोठा सुवर्णासारखा उज्ज्वल पर्वत आहे. त्या पर्वतावर चंद्रासारखा श्वेतवर्ण व कमलपत्राप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असा धरणीधर नाग अवलोकन कराल. सर्व देवतांना पूज्य, सहस्र मस्तकें धारण करणारा, आणि नील वस्त्र परिधान करणारा तो अनंत देव पर्वताचे अग्रभागीं बसलेला असतो. त्या प्रचंड पर्वताच्या अग्रभागीं तीन खोडांनीं युक्त असा जो सुवर्णवर्ण ध्वजाप्रमाणें तालवृक्ष स्थापित केला आहे, तो खालच्या पारासहवर्तमान झळकत असतो. स्वर्गाधिपति देवांनीं पूर्व दिशेचा तें एक ओळख पडण्याकरितां स्थापित केलेल्या शंकूप्रमाणें—पूर्व दिशेचें प्रमाण म्हणून निर्माण केलेलें आहे. त्याच्यापुढें सुवर्णमय व भव्य असा उदयपर्वत आहे. शंभर योजनें उंच असलेलें त्या पर्वताचें सुवर्णमय दिव्य शिखर स्वर्गाला स्पर्श करून खालच्या आधारभूत पर्वतासहवर्तमान झळकत राहिलेलें आहे, व साल, ताल, तमाल, प्रफुल्लित कर्णिकार आणि सूर्यासारखे उज्ज्वल असे दुसरेही सुवर्णमय दिव्य वृक्ष ह्यांनीं तें शिखर शोभत आहे. त्या उदयगिरीच्या शंभर योजनें उंच असलेल्या शिखरावर एक योजन रुंद आणि दहा योजनें उंच असें एक सौमनस नामक सुवर्णमय अचळ शिखर आहे. पूर्वी तीन पादांनीं त्रैलोक्य व्यापून टाकण्याचे वेळीं पुरुषश्रेष्ठ विष्णूनीं त्या सौमनस शिखरावर पहिलें पाऊल ठेवून दुसरें पाऊल मेरु पर्वताच्या शिखरावर ठेविलें होतें. उत्तरेच्या बा-

जूनें जंबुद्वीपाला जाऊन त्या फार उंच असलेल्या सौमनस शिखरावर गेलें असतां जंबुद्वीपवर्ती प्राण्यांना सूर्य पुष्कळ दृग्गोचर होतो. त्या ठिकाणीं, कांतीनें सूर्यासमान व तपस्वी असे वैखानस नामक वालखिल्य महर्षि प्रकाशत असलेले दृष्टीस पडत असतात. त्यांच्यापुढें हें सुदर्शन बेट झळकत आहे, व त्या सौमनस शिखरावर सूर्याचा उदय झाला असतां सर्व प्राणी सतेज होत असून त्यांचे नेत्र प्रकाशमान होऊं लागतात. त्या पर्वताच्या पृष्ठभागावर त्याच्या गुहांतून आणि वनांतून सीतेसहवर्तमान रावणाचा ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे. सुवर्णपर्वत आणि महात्मा सूर्य ह्यांच्या तेजानें सकाळीं सूर्योदयसमयीं आरक्तवर्ण झालेली पूर्व दिशा प्रकाशत असते. सूर्योदय अवलोकन करून, वरील लोकांना पृथ्वीमध्यें प्रवेश करण्याचें आणि पृथ्वींतील लोकांना ब्रह्मलोकामध्यें प्रवेश करण्याचें हें उदयगिरिरूप द्वार पूर्वी केलेलें आहे, ह्यामुळें हिला पूर्व दिशा असे म्हणत असतात. त्या उदयाचलाचे पृष्ठभाग, जलप्रवाह आणि गुहा ह्यांमध्यें रावणासहवर्तमान सीतेचा ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे. त्याच्यापुढें देवतांनीं व्याप्त झालेल्या त्या पूर्व दिशेस जातां येणार नाहीं. कारण, तेथें चंद्रसूर्यांचा प्रकाश नसल्यामुळें ती अंधकारानें व्याप्त असून अदृश्य असते. असो. ते पर्वत, गुहा आणि नद्या ह्यांमध्यें, व मीं ज्याचा उल्लेख केला नाहीं असेही जे कांहीं प्रदेश राहिले असतील त्यांमध्यें जानकीचा शोध केला पाहिजे. हे वानरश्रेष्ठहो, येथपर्यंत वानरांचें गमन होणें शक्य आहे. सूर्याचा प्रकाश ज्या ठिकाणीं नाहीं, आणि जेथें कसली मर्यादा नाहीं, असा त्याच्या पुढला प्रदेश आम्हांला ठाऊक नाहीं. रावणाच्या वसतिस्थानामध्यें जाऊन व सीतेची भेट घेऊन तुम्ही एका महिन्यांत उदयपर्वतावर जाऊन फिरा. महिन्यापेक्षां जास्त वेळपर्यंत बाहेर राहणें उपयोगी नाहीं; जो राहील त्याचा माझ्या हातून वध होईल. ह्याकरितां सीतेचा शोध लावून अर्थात् कार्यसिद्धि करून तुम्ही इतक्या मुदतींत परत फिरा, आणि रघुवंशज रामाची प्रिया सीता प्राप्त करून घेऊन सुखी व्हा."

## सर्ग एकेचाळिसावा.

—:०:—

### सीताशुध्यर्थ वानरांना दक्षिण दिशेस पाठविणें.

ह्याप्रमाणें तें प्रचंड वानरसैन्य पूर्वदिशेला पाठविल्यानंतर, अग्निपुत्र नील, हनूमान वानर, महाबलाढ्य ब्रह्मपुत्र जांबवान्, सुहोत्र, शरारि, शरगुल्म, गज, गवाक्ष, गवय, सुषेण, वृषभ, मैंद, द्विविद, दुसरा सुषेण, गंधमादन, अग्निपुत्र उल्कामुख व अनंग, आणि महावेगवान व महापराक्रमी असे अंगदप्रभृति वीर हे शोधण्याला योग्य असलेले आणि कार्य करण्यास समर्थ म्हणून ठरलेले वीर त्या वानराधिपति सुग्रीवानें दक्षिण दिशेस पाठविले; आणि त्या सर्वांवर अंगदाला मुख्य नेमून, त्या दिशेला जे कांहीं अत्यंत दुर्गम प्रदेश आहेत ते सर्व त्यानें त्या वानरश्रेष्ठांना सांगून दिले. तो म्हणाला, "हजारों शिखरांनीं आणि नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं युक्त असलेला विंध्याद्रि, महोरगांनीं आश्रय केलेली रमणीय नर्मदा नदी, रम्य गोदावरी, महानदी, कृष्णवेणी, मेखल व उत्कल देश, दशार्ण देशांतील शहरें आब्रवंती आणि अवंती ही सर्व तुम्ही पहा. ऋष्टिक, रम्य माहिषक, मत्स्य, कलिंग आणि कौशिक हेही देश सर्व बाजूंनीं तुम्ही धुंडून काढा. पर्वत, नद्या व गुहा ह्यांसहवर्तमान दंडकारण्य व गोदावरी नदी शोधून तुम्ही सर्व कांहीं हुडका. त्याचप्रमाणें आंध्र, पुंड्र, चोल, पांड्य आणि केरल हे देश धुंडून काढा. धातूंनीं भूषित असलेल्या अयोमुख पर्वतावरही गेलें पाहिजे; आणि अद्भुत शिखरें,

मनोहर प्रफुल्लित वनें, आणि उत्कृष्ट चंदनवृक्षांच्या वनांनीं संपन्न असलेले प्रदेश ह्यांनीं युक्त असलेला तो भव्य महापर्वत शोधून काढिला पाहिजे. तदनंतर, निर्मल जलाशयांनीं जी युक्त आहे, आणि अप्सरांचे समुदाय जिचे ठिकाणीं क्रीडा करीत असतात, ती दिव्य कावेरी नदी तुम्ही अवलोकन कराल. त्या महातेजस्वी मलय पर्वताच्या अग्रभागीं सूर्यतुल्य ऋषिश्रेष्ठ अगस्त्य बसलेले तुम्ही पहा, आणि त्या सुप्रसन्न महात्म्यांची अनुज्ञा झाल्यावर, मकरांनीं युक्त असलेली महानदी ताम्रपर्णी तुम्ही तरून जा. जिच्यांतील बेटें व उदक ही अद्भुत चंदनवनांनीं आच्छादित झालेलीं आहेत, अशी ती ताम्रपर्णी नदी, वस्त्रादिकांनीं शरीर आच्छादिलेली तरुणी स्त्री ज्याप्रमाणें आपल्या प्रियपतीला आलिंगन देते त्याप्रमाणें, समुद्राला आलिंगन देत आहे. तदनंतर, मोत्यें व रत्नें ह्यांनीं भूषित केलेलें व किल्ल्याला जखडलेलें असें पांड्य देशाचें सुवर्णमय दिव्य द्वार तुम्ही अवलोकन करा. नंतर समुद्रापाशीं गेल्यावर तो तरून जाण्याविषयीं तुम्ही आपल्या सामर्थ्याचा विचार करून काय तें करा. त्या समुद्रामध्ये अगस्त्य मुनींनीं श्रेष्ठ पर्वत महेंद्र स्थापित केलेला आहे. अद्भुत शिखरें व वृक्ष ह्यांनीं युक्त असलेला तो सुंदर व भव्य पर्वत सुवर्णमय असून त्याची एक बाजू समुद्रांत गेलेली आहे. नानाप्रकारच्या प्रफुल्लित वृक्षांनीं व लतांनी आणि श्रेष्ठ श्रेष्ठ देव, ऋषि आणि यक्ष व अप्सरा ह्यांच्या योगानें सुशोभित, आणि सिद्ध व चारण ह्यांच्या समुदायांनीं गजबजलेला असा जो अत्यंत मनोहर महेंद्र पर्वत, त्यावर नेहमीं प्रत्येक पर्वदिवशीं इंद्र येत असतो. त्याच्या पश्चिम तीराला मनुष्यांनीं जाण्यास अशक्य असें एक उज्ज्वल बेट शंभर योजनें विस्तृत आहे, तें सर्व बाजूंनीं शोधून काढा. तेथें सर्व प्रकारानें विशेषेंकरून तुम्ही सीतेचा शोध लाविला पाहिजे. कारण, तो प्रदेश म्हणजे तेजानें इंद्रतुल्य असलेला जो दुरात्मा राक्षसाधिपति वध्य रावण, त्याचें निवासस्थान आहे. दक्षिण समुद्रामध्यें त्या रावणाची एक राक्षसी आहे. ती अंगारका ह्या नांवानें विख्यात असून, वरून जाणाऱ्या प्राण्यांना खालीं पडलेल्या त्यांच्या छायेच्या योगानें ओढून धेऊन खात असते. ह्याप्रमाणें, जेथें जेथें म्हणून सीता असण्याचा संशय आहे, ते सर्व देश धुंडाळून निःसंशय केल्यावर, ती आहे किंवा नाहीं ह्याचा काय तो तुम्ही निश्चय करा, आणि तेथें नाहीं असें ठरल्यानंतर तें लंका बेट ओलांडून तुम्ही त्या महातेजस्वी राजपत्नीचा शोध लावा. त्या बेटाच्या पलीकडे शंभर योजनें समुद्रप्रदेश आक्रमण केल्यावर, सिद्ध व चारण ह्यांनीं आश्रय केलेला असा एक पुष्पितक नांवाचा सुंदर पर्वत तुम्हांला लागेल. त्याची प्रभा चंद्रसूर्यांच्या किरणांप्रमाणे असून, त्याला समुद्राच्या उदकाचा आश्रय आहे; आणि आपल्या विपुल शिखरांच्या योगानें आकाश विदीर्ण करीतच की काय तो झळकत राहिलेला आहे. त्या पर्वताच्या ज्या एका सुवर्णशिखरासमीप सूर्य नेहमीं असतो, ते शिखर कृतघ्न, दुष्ट व नास्तिक ह्यांच्या दृष्टीसही पडत नाहीं. तेव्हां त्या पर्वताला मस्तकानें प्रणाम करून तुम्ही तो शोधून काढा. जेथें कोणाचेंही चालावयाचें नाहीं, असा तो पर्वत ओलांडून गेल्यावर सूर्यवान म्हणून दुसरा एक पर्वत तुम्हांला लागेल. त्याचा मार्ग फारच कठिण आहे, व तो पर्वत चौदा योजनें आहे. तो पर्वत ओलांडल्यानंतर, सर्वकाल मनोहर अशा कल्पवृक्षांनीं युक्त असलेला एक वैद्युत नामक पर्वत तुम्हांला लागेल. त्या ठिकाणीं उत्कृष्ट मुळें व फळे भक्षण करून, आणि तेथें असलेले मध पिऊन तुम्ही पुढें चालते व्हा. तेथें नेत्रांना व मनाला सुंदर दिसणारा असा एक कुंजर नामक पर्वत आहे, व त्या पर्वतावर विश्वकर्म्यानें अगस्त्य मुनींचे गृह निर्माण केलेलें आहे. त्या घराची

लांबीरुंदी चार कोस असून उंची चाळीस कोस आहे, व ते सुवर्णमय दिव्य गृह नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषित केलेले आहे. तेथे सर्पांचें निवासस्थान अशी एक भोगवती नामक नगरी आहे; तिच्यातील रस्ते रुंद आहेत, आणि सर्व बाजूंनी ती सुरक्षित असल्यामुळें तिच्यावर शत्रूचा हल्ला होणें अशक्य आहे. तीक्ष्ण दंष्ट्रा आणि प्रचंड विष ह्यांनी युक्त असलेल्या भयंकर भुजगानी तिचे संरक्षण केलेले असून, महाभयंकर सर्पराज वासुकी तिच्यामध्ये वास्तव्य करीत आहे. त्या नगरीमध्ये तुम्ही जा, आणि ती नगरी व तिच्या आसपास असलेले जे कांहीं इतर सुरक्षित प्रदेश, तेही सर्व तुम्ही शोधून काढा. तो प्रदेश ओलांडल्यानंतर, मोठ्या बैलाप्रमाणे ज्याचा आकार आहे असा एक ऋषभ नामक भव्य आणि सर्व रत्नांनी परिपूर्ण असलेला पर्वत तुम्हाला लागेल. त्या पर्वतावर गोशीर्षक, पद्मक व हरिश्याम असा तिन्ही प्रकारचा दिव्य चंदन उत्पन्न होत असतो, व त्याचे तेज अग्नीसारखे असते. तुम्ही त्या चंदनाला स्पर्श करू नका; कारण, रोहित नामक गंधर्व त्या घोर वनाचे रक्षण करीत असतात. शैलूष, ग्रामणी, शिक्ष, शुक व बभ्रु असे पांच सूर्यासारखे तेजस्वी गंधर्वाधिपति तेथे असतात. ऋषभ पर्वताच्या पलीकडे-पृथ्वीचे शेवटी पुण्यवान लोकांचे निवासस्थान आहे. त्यांच्या शरिराची कांति सूर्य, चंद्र व अग्नि ह्याप्रमाणे आहे. स्वर्गप्राप्ति झालेले लोकच त्या ठिकाणीं वास्तव्य करीत असतात; त्यांच्या समीप जाणे शक्य नाहीं; व म्हणूनच, त्याच्यापुढें असलेला जो अतिभयंकर पितृलोक, तिकडेही तुम्हाला जाण्याचे प्रयोजन नाहीं; कारण, तो दुःसह अंधकाराने व्याप्त झालेली यमाची राजधानी आहे. वानरश्रेष्ठहो, येथपर्यंतच तुमचे जाणे व तुमच्या हातून शोध लागणे शक्य आहे. भूतलावर गमन करण्यास समर्थ असलेल्या प्राण्यांचें ह्याच्या पुढे गमन हो[णें] शक्य नाहीं. तेव्हां हे सर्व पाहून, दुसरें जें का[हीं] दृश्य आहे तेही तुम्ही धुंडाळा; आणि सीते[चा] पत्ता लागल्यावर परत फिरा. जो एक महिन्या[च्या] आत पुढे येऊन " सीता दृष्टीस पडली" असें स[ांगे]ल, त्याचे वैभव माझ्यासारखे होईल, आणि [तो] सुखाने विषयांचा उपभोग घेईल. त्यापेक्षां अ[धि]क प्रिय असा मला कोणीही नाहीं; प्राणापेक्षां [तो] मला विशेष होईल, आणि त्याच्या हात[ून] जरी वारंवार अपराध झालेले असले तरी [तो] माझा बंधु होईल. वास्तव, अपरिमित बल [व] पराक्रम ह्यांनी युक्त असलेले तुम्ही ज्या अ[नेक] बहुगुणसंपन्न कुलामध्ये जन्मास आलेले आ[हां], या अर्थी राजकन्या सीता प्राप्त होईल अ[सा] प्रकारचा उत्कृष्ट प्रयत्न सुरू करा.''

## सर्ग बेचाळिसावा.

— o —

### सीताशुध्यर्थ वानरांना पश्चिम दिशेस पाठविणें.

ह्याप्रमाणे दक्षिण दिशेस वानरांना पाठ[वि]ल्यानंतर, तारेचा पिता आणि आपला श्वशुर [जो] भयंकर पराक्रमी सुषेण, त्याच्याकडे जाऊन वान[र]राज सुग्रीवाने त्याला प्रणाम केला, आ[णि] हात जोडून त्याच्याशी संभाषण केले. नंतर, [इ]तर वानरश्रेष्ठांनी परिवेष्टित, इंद्रासारखा तेजस्वी, ग[रु]डासारखा कांतिमान आणि बुद्धि व पराक्र[म] ह्यांनी संपन्न असा जो मरीचि महर्षीचा पु[त्र] महाकपि अर्चिष्मान, त्याला, इतरही अर्चिष्माल्[य]संज्ञक महाबलाढ्य मरीच ऋषीच्या पुत्रांना, आ[णि] त्याचप्रमाणे इतर सर्व ऋषिपुत्रांना त्याने पश्चि[म] दिशेस जाण्यास सांगितले. तो म्हणाला, "हे सु[षे]णप्रभृति वानरहो, तुम्ही दोन लक्ष वानर बरो[ब]र घेऊन सीतेचा शोध लावा. बाल्हीकामहवर्[त]मान सौराष्ट्र देश [...] व रमणीय असा चं[...]

चित्र देश, मोठमोठीं नगरें, पुन्नाग वृक्षांनीं भरलेला आणि बकुळाच्या व भोंकरीच्या झाडांनीं गजबजलेला कुक्षि नामक प्रदेश, आणि त्याचप्रमाणें केतक वृक्षांचीं वनें तुम्ही धुंडाळा. हे वानरश्रेष्ठहो, पश्चिमाभिमुख वाहणाऱ्या व शीत जलानें युक्त असलेल्या पवित्र नद्या, तपस्व्यांचीं अरण्यें, गहनप्रदेशयुक्त पर्वत, व त्या पर्वतावर जवळ जवळ निर्जल असलेलीं ठिकाणें आणि अतिशय उंच व शीतल शिला हीही सर्व तुम्ही शोधून काढा. ह्याप्रमाणें पर्वतसमूहानें परिवेष्टित असलेली दुर्गम पश्चिम दिशा शोधून काढल्यावर, तुम्ही किंचित् पश्चिमेस गेलां असतां समुद्र तुमच्या दृष्टीस पडेल. वानरहो, जरा पश्चिमेला गेल्यावर, तिमिसंज्ञक मत्स्य व मगर ह्यांनीं ज्याचें उदक व्याप्त झालेलें आहे असा समुद्र तुमच्या दृष्टीस पडणारच. नंतर केतक वृक्षांचीं वनें, तमालवृक्षांचीं अरण्यें, आणि नारिकेलवृक्षांचीं वनें ह्यांतून तुमच्या सैन्यांतील वानरांना विहार करूं द्या. तेथें सीतेच्या व रावणाच्या निवासस्थानाचा तुम्ही शोध करा. समुद्राचे कांठीं असलेले पर्वत व वनें ह्यांतूनही तुम्ही शोध करा. आणि मुरचीपत्तन, रम्य जटापुर, अवंती आणि अंगलेपा ह्या नगऱ्या, आलक्षित वन व त्याचप्रमाणें ठिकठिकाणीं असलेलीं विशाल राष्ट्रें व नगरें हीं सर्व तुम्ही धुंडून काढा. सिंधु व सागर ह्यांच्या संगमाचे ठिकाणीं असलेल्या सोमगिरि नांवाच्या पर्वतावर शतशृंग म्हणून एक मोठा वृक्ष आहे. त्या पर्वताचा आश्रय केलेले सिंह तेथील रम्य अशा कड्यांवर असलेल्या गुहांमध्यें तिमिसंज्ञक मासे व गज ह्यांना नेऊन ठेवीत असतात. पर्वतशिखरावर वास्तव्य करणारे जे सिंह आहेत, त्यांचींही निवासस्थानें त्या रमणीय शिखरावरूनच आहेत. मदमत्त व तृप्त असून मेघाप्रमाणें गर्जना करणारे गज ह्या जलपरिपूर्ण विशाल शिखरावर संचार करीत असतात. त्या सोमगिरीला अद्भुत वृक्षांनीं युक्त असें एक आकाशांत गेलेलें सुवर्णशिखर आहे. तें सर्व, यथेष्ट रूप धारण करणाऱ्या वानरांनीं सत्वर शोधून काढिलें पाहिजे. त्या ठिकाणीं, समुद्रामध्यें एक शंभर योजनें उंचीचें—दृष्टीस पडण्यालाही अशक्य असलेलें—पारियात्र पर्वताचें शिखर आहे. तें तुम्ही तेथें जाऊन अवलोकन करा. त्या शिखरावर अग्नितुल्य तेजस्वी, भयंकर, व संहार करणारे चोवीस कोट तपस्वी गंधर्व आहेत. ते गंधर्व अग्नीच्या ज्वालेप्रमाणें कडक असून, तपश्चर्या करण्याकरितां चोहोंकडून तेथें जुळलेले आहेत. भयंकर पराक्रमी वानरांनीं त्यांचें अतिक्रमण करितां उपयोगी नाहीं, आणि त्या प्रदेशापासून कोणतेंही फल वानरांनीं घेतां उपयोगीं नाहीं; कारण, त्या धैर्यवान, भयंकर, पराक्रमी व बलाढ्य वीर गंधर्वांचा पराजय होणें अशक्य आहे; ते त्या शिखरावरील फलांचें व मुळांचें रक्षण करीत असतात. त्या ठिकाणीं यत्न करून जानकीचा शोध लाविला पाहिजे. त्या गंधर्वांपासून वानरांना यत्किंचितही भय नाहीं. तेथें एक वज्र नामक महापर्वत आहे. त्याची कांति वैदूर्य मण्यासारखी असून वज्रासारख्या दृढ आकृतीनें तो युक्त आहे, आणि नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं तो व्याप्त झालेला आहे. इतकेंच नव्हे, परंतु शंभर योजनें पर्यंत तो भव्य पर्वत एकसारखा पसरलेला आहे. त्या पर्वताच्या गुहा प्रयत्नपूर्वक शोधून काढिल्या पाहिजेत. समुद्राच्या एका चतुर्थांशावर चक्रवान ह्या नांवाचा पर्वत आहे, व त्या पर्वतावर विश्वकर्म्यानें एक हजार पाकळ्यांचें चक्र निर्माण केलें आहे. त्या पर्वतावर, पंचजन नामक हयग्रीव दानवाचा वध करून पुरुषोत्तमानें शंख व चक्र हीं घेतलीं. त्या पर्वतावरील रमणीय शिखरांवरून आणि विशाल गुहांतून सीतेसहवर्तमान रावणाचा ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे. त्या अगाध समुद्रामध्येंच, सुवर्णशृंगांनीं

युक्त असा एक फारच मोठा वराह नामक पर्वत आहे, व तो चौसष्ट योजनें आहे. त्या पर्वतावर प्राग्ज्योतिषपुर नामक सुवर्णमय नगर असून, त्या नगरामध्यें दुरात्मा नरक नामक दानव वास्तव्य करीत आहे. त्याही पर्वतावरील रमणीय शिखरांवरून, आणि विशाल गुहांतून, सीतेसहवर्तमान रावणाचा ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे. त्या महापर्वताच्या पलीकडे गेल्यानंतर दुसरा एक सुवर्णपर्वत तुमच्या दृष्टीस पडेल. कारण, त्या महापर्वताच्या पलीकडे, सर्व बाजूंनीं सुवर्णाचा आणि धबधब्यांनीं व जलप्रवाहांनीं युक्त असा एक पर्वत आहे. त्या पर्वतावरील शब्दानें मदमत्त झालेले गज, वराह, सिंह आणि व्याघ्र हे सर्व बाजूंनीं नेहमीं त्याच्या संमुख गर्जना करीत असतात. त्या पर्वतावर हरिसंज्ञक अश्वांनीं युक्त असलेल्या वैभवशाली पाकशासन इंद्राला देवांनीं राज्याभिषेक केला होता. तो पर्वत मेघ ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. त्या इंद्ररक्षित महापर्वताला ओलांडून गेल्यानंतर साठ हजार पर्वतांकडे तुम्ही जाल. ते सर्व पर्वत कांतीनें बालसूर्याप्रमाणें असून सर्व बाजूंनीं झळकणारे आहेत, आणि सुवर्णमय प्रफुल्लित वृक्षांनीं सुशोभित झालेले आहेत. त्या पर्वतांच्या मध्यभागीं मेरु म्हणून एक श्रेष्ठ पर्वत त्यांचा राजा आहे, व त्या पर्वताला सूर्यानें प्रसन्न होऊन पूर्वी वर दिलेला आहे. सूर्य त्या पर्वतराजाला असें म्हणाला कीं, "तुझ्या आश्रयाला राहणार सर्व, रात्रंदिवस माझ्या प्रसादामुळें सुवर्णमय होतील; आणि तुझ्यावर जे देव, गंधर्व आणि दानव वास्तव्य करतील, तेही माझे भक्त होतील व त्यांची कांति सुवर्णासारखी होईल." विश्वेदेव, वसु आणि मरुद्गण हे त्या उत्कृष्ट मेरु पर्वतावर संध्याकाळीं येऊन सूर्याची उपासना करीत असतात, व त्यांनीं पूजन केलें असतां सर्व प्राण्यांना अदृश्य असलेला सूर्य अस्ताचलास जातो. दहा हजार योजनें असलेल्या त्या पर्वताचें उल्लंघन एका अर्ध्या मुहूर्तांत करून सूर्य सत्वर चालता होतो. त्या पर्वताच्या शिखरावर सूर्यासारखें तेजस्वी असें एक मोठें दिव्य मंदिर विश्वकर्म्यानें निर्माण केलेलें आहे. तें मोठमोठ्या वाड्यांच्या समुदायांनीं गजबजून गेलेलें आहे; नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं व्याप्त झालेल्या अद्भुत वृक्षांनीं तें सुशोभित झालेलें आहे; आणि पाश धारण करणाऱ्या महात्म्या वरुणाचें तें निवासस्थान आहे. मेरु आणि अस्ताचल ह्यांच्यामध्यें दहा स्कंधांनीं युक्त असा एक मोठा सुवर्णमय तालवृक्ष आहे, व तो सौंदर्यसंपन्न वृक्ष अद्भुत पारानें युक्त असून झळकत राहिलेला आहे. असो. ते सर्व दुर्गम प्रदेश, सरोवरें आणि नद्या ह्या ठिकाणीं सीतेसहवर्तमान रावणाचा जेथें तेथें शोध केला पाहिजे. त्या मेरुपर्वतावर, स्वतःच्या तपःसामर्थ्यानें सुरक्षित असलेला व मेरुसावर्णि म्हणून प्रसिद्ध असलेला एक धर्मवेत्ता आहे; तो योग्यतेनें ब्रह्मदेवाची बरोबरी करणारा आहे. त्या सूर्यतुल्य मेरुसावर्णि महर्षीला साष्टांग प्रणिपात करून सीतेसंबंधी वार्ता विचारावी. येथपर्यंत हा जीवलोकावरील सर्व प्रदेश, रात्र समाप्त झाल्यावर प्रकाशित करून सूर्य अस्ताचलाला जात असतो; आणि येथपर्यंतच वानरांचें गमन होणें शक्य आहे. सूर्यरहित आणि मर्यादारहित असा ह्याच्या पुढला प्रदेश आम्हांला माहीत नाहीं. रावणाच्या निवासस्थानामध्यें व सीतेसमीप जाऊन, आणि अस्ताचल पर्वताकडे गमन करून एका पूर्ण महिन्यांत तुम्ही परता. एक महिन्याच्या मुदतीपेक्षां अधिक कालपर्यंत बाहेर रहातां उपयोगी नाहीं; जो राहील तो माझ्या हातून वध पावण्यास पात्र होईल. तुमच्याबरोबरच माझा शूर श्वशुरही जाईल. आज्ञेप्रमाणें वागणारे तुम्ही ह्याचें सर्व काहीं ऐका. हा महापराक्रमी व महाबलाढ्य श्वशुर मला पितृस्थानीं आहे. तुम्हीही सर्व परा-

युक्त असलेलीं कमलपुष्पें, आणि मोठमोठीं मूल्यवान रत्नें व माणकें यांच्या योगानें तेथील वापी, तडाग वगैरे जलाशय बालसूर्यासारखे तेजस्वी दिसत असतात. अद्भुत नीलकमलांचीं वनें, वर्तुल मोत्यें, आणि मोठमोठीं मूल्यवान माणकें ह्यांच्या योगानें तो प्रदेश सर्व बाजूंनीं व्याप्त झालेला आहे. सर्व रत्नें व सुवर्ण ह्यांनीं परिपूर्ण, अग्नितुल्य तेजस्वी, आणि म्हणूनच आश्चर्यकारक अशा उत्कृष्ट पर्वतांनीं तेथील नद्या व्याप्त झालेल्या आहेत, आणि त्यांचीं वाळवंटें सुवर्णयुक्त झालेलीं आहेत. नित्य येणारीं पुष्पें व फलें ह्यांनीं युक्त असलेले तेथील वृक्ष पक्ष्यांनीं गजबजून गेलेले असतात, आणि दिव्य गंध, रस व स्पर्श ह्यांनीं युक्त असून सर्व भोग्य वस्तु ते देत असतात. दुसरे कांहीं उत्कृष्ट वृक्ष. नानाप्रकारचीं वस्त्रेंच फलें म्हणून देत असतात. मोत्यें आणि वैडूर्य मणि यांनीं युक्त असल्यामुळें मनोहर स्त्रियांना व पुरुषांना अनुरूप आणि कोणत्याही ऋतूमध्यें धारण केलीं असतां सुखावह अशीं भूषणें तेथील कांहीं वृक्षांपासून प्राप्त होत असतात. मोठमोठ्या मूल्यवान रत्नांनीं चित्रविचित्र, आणि मनोहर आस्तरणांनीं युक्त अशा शय्या दुसऱ्या कांहीं उत्कृष्ट वृक्षांपासून प्राप्त होत असतात. दुसरे कांहीं वृक्ष मनोहर पुष्पें धारण करीत असतात, आणि कांहीं वृक्ष उत्कृष्ट पेयें, नानाप्रकारचीं भक्ष्यें, आणि सौंदर्य व यौवन ह्यांनीं युक्त असून गुणांनीं संपन्न असलेल्या स्त्रिया देत असतात. तेजानें झळकत असलेले गंधर्व, किन्नर, सिद्ध, नाग आणि विद्याधर नेहमीं स्त्रियांसहवर्तमान तेथें रममाण होत असतात. ते सर्व पुण्यकर्मी असून रतिक्रीडाविषयीं तत्पर असतात, आणि द्रव्य व भोग्य वस्तु ह्यांनीं संपन्न असून स्त्रियांसहवर्तमान वास्तव्य करीत असतात. उत्कृष्ट हास्यध्वनीसहवर्तमान प्राणिमात्रांचें मन रमविणारा असा गायनाचा व वाद्यांचा घोष तेथें सतत कानावर येत असतो. त्या ठिकाणीं आनंदरहित अथवा प्रिय वस्तु जवळ नसलेला असा कोणीही नाहीं. तेथें चित्तवेधक गोष्टींची प्रत्येक दिवशीं वृद्धिच होत असते. तो महापर्वत ओलांडून गेल्यावर उत्तर समुद्र लागेल. त्या समुद्रामध्यें सोमगिरि म्हणून एक सुवर्णमय प्रचंड पर्वत आहे. तो प्रदेश जरी सूर्यरहित आहे, तरी तो त्या पर्वताच्या प्रभेमुळें सूर्यप्रभेप्रमाणेंच प्रकाशित झालेला असतो; आणि सूर्याच्या प्रभेनें युक्त असलेल्या देशाला जशी शोभा आलेली असते, तशी त्याला आलेली असते. एकादश मूर्तींनीं युक्त व ब्रम्हर्षींनीं परिवेष्टित असलेला जगदात्मा, जगत्स्रष्टा आणि षड्गुणैश्वर्यसंपन्न असा देवाधिदेव शंकर त्या सोमगिरीवर वास्तव्य करीत असतो. कुरु देशाच्या उत्तरेस तुम्ही कांहीं झालें तरी जाऊं नका. इतर प्राण्यांचीही गति तेथें कुंठितच होत असते. तो सोमगिरि देवांनाही दुर्गम आहे. ह्यास्तव, तो दृष्टीस पडतांक्षणीं तेथून सत्वर परत फिरा. हे वानरश्रेष्ठहो, येथपर्यंत वानरांनीं जाणें शक्य आहे. मर्यादा आणि सूर्य ह्यांनीं रहित असलेलें त्याच्या पलीकडील स्थल आम्ही जाणीत नाहीं. मीं जें हें सांगितलें तें सर्व शोधून काढा, आणि मीं न सांगितलेलेंही जें कांहीं राहिलें असेल तेथेंही सीतेला शोधण्याचा विचार करा. वानरहो, तुम्ही वायु आणि अग्नि ह्यांच्या उपमेला पात्र आहां. सीता दृष्टीस पडण्याकरितां केलेला प्रयत्न सफल झाला असतां दशरथपुत्र रामाचा मोठा मनोरथ सिद्धीस नेल्यासारखें होईल; आणि त्याचा मोठा मनोरथ सिद्धीस गेल्यामुळें माझाही मनोरथ सिद्धीस गेल्यासारखें होईल. सीतेचा शोध लागला असतां सर्व प्रकारच्या मनोहर योग्य वस्तूंनीं तुमच्या बांधवांसहवर्तमान मी तुम्हां सर्वांचें पूजन करणार असल्यामुळें, तुम्ही कृतकृत्य व्हाल, आणि

शत्रुरहित होऊन आपआपल्या प्रिय स्त्रियांसहवर्तमान पृथ्वीर संचार करूं लागाल."

## सर्ग चवेचाळिसावा.

—:o:—

### हनुमंताला अंगठी देणें.

सुग्रीवानें, विशेषत: जो कांहीं आपला उद्देश सांगावयाचा होता, तो हनुमानाजवळ सांगितला. कारण, कार्यसिद्धीविषयीं सुग्रीवाला त्या वानरश्रेष्ठासंबंधानें फारच खात्री होती. ह्यास्तव, तो अत्यंत संतुष्ट होऊन त्या महापराक्रमी वायुपुत्राला म्हणाला, "हे वानरश्रेष्ठा, पृथ्वी, अंतरिक्ष, मेघमार्ग, स्वर्ग आणि उदक ह्यांपैकीं कोठेंही तुझी गति कुंठित होत असल्याचें माझ्या कधीं दृष्टोत्पत्तीस आलेलें नाहीं. असुर, गंधर्व, नाग, मनुष्य, देवता, सागर आणि पर्वत ह्यांसहवर्तमान सर्व लोक तुला विदित आहेत. हे महावानरा, हे वीरा, महाबलाढ्य वायु जो तुझा पिता, त्याच्याचप्रमाणें तुझी गति, वेग, तेज आणि त्वरा आहे. तेजानें तर तुझी बरोबरी करणारा प्राणी ह्या भूतलावर कोणीही नाहीं. तस्मात्, सीता कशी प्राप्त होईल ह्याचा विचार तूंच कर. हे नीतिनिपुणा, बल, बुद्धि, पराक्रम, युक्ति आणि देशकालानुरूप वर्तन हें सर्व तुझ्याच ठिकाणीं आहे."

ह्याप्रमाणें सुग्रीवानें हनुमानाला सांगितल्यावर, सुग्रीवाच्या सांगण्यावरून, हनुमानाच्या हातून सीतेचा शोध लावण्याचें कार्य शेवटास जाईल असें रघुवंशज रामांना समजून आल्यावर, त्याच्या हातून कार्य शेवटास जाईल अशी खात्री बाळगून राम आपल्याशीं विचार करूं लागले कीं, "सुग्रीवाला तर हनुमानाच्या हातून कार्यसिद्धि होण्याची सर्वस्वी खात्री आहे, आणि आपल्या हातून कार्य शेवटास जाईल ह्याविषयीं स्वत: हनुमानाला तर त्याच्याहीपेक्षां जास्त खात्री वाटत आहे. तेव्हां, हातून कार्य झाल्यामुळें परीक्षेस उतरलेला, आणि धन्याकडून श्रेष्ठ म्हणून समजला गेलेला हा वीर सीतेच्या शोधाकरितां गेला असतां ह्याच्या हातून कार्यसिद्धि होणार हें निश्चित ठरलेलेंच आहे."

असा विचार मनांत आणून, कार्यसिद्धि करण्याविषयीं अतिशय उद्युक्त झालेल्या त्या हनुमानाकडे पाहून महातेजस्वी रामचंद्र कृतार्थ झाल्यासारखे आनंदित झाले, त्यांची इंद्रियवृत्ति व मनोवृत्ति प्रफुल्लित झाली, आणि संतुष्ट होऊन, त्यांनीं आपल्या नांवानें सुशोभित झालेली एक अंगठी राजकन्या सीतेच्या खुणेकरितां त्या हनुमानाच्या स्वाधीन केली, व ते म्हणाले, "हे वानरश्रेष्ठा, ह्या चिन्हाच्या योगानें ती जनककन्या सीता—तूं माझ्याकडून आला आहेस असें समजून कांहींएक भीति मनामध्यें न धरितां—तुझ्याकडे पाहील. हे वीरा, तुझी ही उद्युक्तता, धैर्ययुक्त पराक्रम, आणि मनांत खात्री बाळगून सुग्रीवानें तुला केलेली आज्ञा, ह्यांवरून तुझ्या हातून कार्यसिद्धि होणार असें मला वाटत आहे."

ह्याप्रमाणें रामचंद्रांनीं सांगितल्यावर वानरश्रेष्ठ हनुमानानें त्या अंगठीचा स्वीकार केला, आणि मस्तकीं हात जोडून व रामचंद्रांच्या चरणांना वंदन करून तो वानरश्रेष्ठ चालता झाला.

ह्याप्रमाणें तें वानरांचें प्रचंड सैन्य बरोबर घेऊन निघालेला तो वायुपुत्र वीर, नक्षत्रगणांनीं सुशोभित आणि आकाश मेघनिर्मुक्त झाल्यामुळें शुद्ध मंडलानें युक्त असलेल्या चंद्राप्रमाणें शोभूं लागला; व तो जातां जातां राम आणि सुग्रीव हे उभयतां त्याला म्हणाले, "हे अतिबलाढ्य, हे वानरश्रेष्ठ, हे पराक्रमी वायुपुत्रा, तुझ्याच सामर्थ्यावर सर्व अवलंबून आहे. ह्यास्तव, मोठमोठे पराक्रम करून त्या जनककन्येचा शोध लागेल अशा रीतीनें व्यवस्था कर."

## सर्ग पंचेचाळिसावा.

—:०:—

### वानरांचें प्रयाण.

नंतर, वानरश्रेष्ठ सुग्रीव रामकार्य सिद्धीस जाण्याकरितां सर्व वानरांना बोलावून आणून म्हणाला, 'तुम्हीं सर्व वानरश्रेष्ठांनीं ह्याप्रमाणें हें जगत् शोधून काढिलें पाहिजे.'

ही धन्याची कडकडीत आज्ञा समजून घेतांक्षणीं, ते वानर टोळांप्रमाणें पृथ्वी आच्छादित करून जाऊं लागले. इकडे, सीतेचा शोध लावण्याविषयीं जो महिना मुदत म्हणून ठरविलेला होता, त्या महिन्यामध्यें सुग्रीवाची प्रतीक्षा करीत करीत लक्ष्मणासहवर्तमान रामचंद्र त्या प्रस्रवण पर्वतावरच राहिले होते. हिमालय पर्वतानें व्यापून टाकलेल्या रमणीय उत्तर दिशेस शतबलि नामक वीर वानर एकदम चालता झाला; वानरसेनाधिपति विनत पूर्व दिशेस निघून गेला; तार, अंगद इत्यादिकांसहवर्तमान वानरसेनाधिपति वायुपुत्र हनुमान वानर अगस्त्य मुनींनीं आश्रय केलेल्या दक्षिण दिशेस गेला; आणि वानरश्रेष्ठ व वानरराज सुषेण, वरुणानें संरक्षण केलेल्या घोर पश्चिम दिशेस निघून गेला. ह्याप्रमाणें सर्व दिशांस योग्य रीतीनें वानर पाठविल्यानंतर, वानरसेनाधिपति वीर सुग्रीव सुखी होऊन आनंदानें क्रीडा करूं लागला; व ह्याप्रमाणें राजा सुग्रीवाची आज्ञा झालेले ते सर्व वानरसेनाधिपति त्वरेचें अवलंबन करून आपआपल्या दिशेकडे चालते झाले. कोणी सामान्य शब्द करूं लागले, कोणी उच्चस्वरानें ओरडूं लागले, कोणी गर्जना करूं लागले, आणि कोणी महाबलाढ्य वानर गर्जना व माकडचेष्टा करीत करीत इकडे तिकडे धावूं लागले. ह्याप्रमाणें सर्व वानरसेनाधिपतींना राजा सुग्रीवाची आज्ञा झाली असतां, "आम्ही सीतेला आणूं व रावणाला मारून टाकूं" असे उद्गार त्यांनीं काढिले. एक म्हणाला, "समरांगणामध्यें प्राप्त झालेल्या रावणाचा मी एकटाच वध करीन, आणि एकाएकीं त्याचा वध केल्यावर सीतेला घेऊन येईन." ह्यावर दुसरा म्हणाला, "तुम्ही स्वस्थ रहा; तुमच्या श्रमाची आज जरूर नाहीं. भीतीनें थरथर कांपत असलेली जानकी पातालांतून सुद्धां मी एकटाच घेऊन येईन." हें ऐकून आणखी एकजण म्हणाला, "मी वृक्ष उडवून देईन; पर्वताचे तुकडे तुकडे करून टाकीन; पृथ्वी विदीर्ण करीन; सागर क्षुब्ध करीन." ह्यावर दुसरा एकजण म्हणाला, "मी योजनेंच्या योजनें उड्या टाकीत जाईन ह्याविषयीं मुळींच संशय नाहीं." हें ऐकून दुसरा म्हणाला, "अरे जा! शंभर योजनेंच नव्हे, परंतु शंभरांपेक्षांही जास्त योजनें मी उडी मारीन." हें ऐकून दुसरा म्हणाला, "पुरे! पुरे! पृथ्वी, सागर, पर्वत, वनें आणि पाताळ ह्यांमध्यें माझी गति कोठेंही कुंठित होत नाहीं." ह्याप्रमाणें स्वसामर्थ्याचा गर्व वाहणारे वानर राजा सुग्रीवाचे समीप एकएकटे बोलूं लागले.

## सर्ग शेहेचाळिसावा.

—:०:—

### सुग्रीवाचें भूमंडलपर्यटनवृत्त.

वानरश्रेष्ठ गेल्यावर रामचंद्र सुग्रीवाला म्हणाले, "सर्व भूमंडल तुला कसें माहीत आहे?"

ह्यावर विनयसंपन्न सुग्रीव त्यांना म्हणाला, "माझें म्हणणें ऐका; मी सर्व सविस्तर सांगतों. जेव्हां महिषरूप धारण करणाऱ्या दुंदुभि नामक दानवाकडे वाली मलय पर्वतावर धावून गेला, तेव्हां तो महिषरूपी दानव मलय पर्वताच्या गुहेमध्यें शिरला असतां वालीही त्याचा वध करण्याच्या उद्देशानें त्या मलय पर्वतामध्येंच प्रविष्ट झाला. आंत जातांना वालीनें मला गुहेच्या द्वाराजवळ गोडीगुलाबीनें ठेविलें. परंतु आंत जाऊन एक संवत्सर लोटला तरी वाली बाहेर

येईना. एक वर्ष झाल्यानंतर रक्ताच्या प्रवाहानें तें बीळ अगदीं भरून गेलें; तेव्हां तें अवलोकन करून मी विस्मित झालों, आणि भ्रात्याकरितां अतिशय शोकाकुल झालों. नंतर पितृसमान असलेला ज्येष्ठ भ्राता वाली निःसंशय वध पावला असें समजून, महिषरूप धारण करणाऱ्या त्या दानवाला बाहेर येण्याची अडचण पडून तो आंतल्या आंतच मरून जावा ह्या उद्देशानें एक पर्वतप्राय शिला गुहेच्या द्वाराशीं मीं लावून ठेविली. नंतर त्या वालीच्या जीविताविषयीं मी निराश होऊन किष्किंधा नगरीला परत आलों, आणि अतिशय मोठें वानरराज्य व रुमेसहवर्तमान तारा प्राप्त झाल्यावर त्या वालीच्या मित्रांसहवर्तमान मी निर्भय होऊन तेथें राहूं लागलों. पुढें त्या दानवाचा वध करून वानरश्रेष्ठ वाली परत आला असतां गुरुबुद्धीमुळें मी भयभीत झालों, आणि राज्य त्याच्या स्वाधीन केलें. परंतु अंतःकरणामध्यें क्षुब्ध झालेल्या दुरात्म्या वालीनें माझा वध करण्याचें मनांत आणिलें, आणि सचिवांसहवर्तमान मी धावूं लागलों असतां तो माझा पाठलाग करूं लागला. तेव्हां तो वाली पाठलाग करीत असतांना नानाप्रकारच्या नद्या, वनें व नगरें अवलोकन करीत करीत मी पुढें चाललों. ह्याप्रमाणें हिंडतां हिंडतां, गाईचें पाऊल ओलांडून जाण्याप्रमाणें कांहींएक आयास न पडतां मीं सर्व पृथ्वीभर पर्यटन केलें. मी फार वेगानें जात असल्यामुळें पृथ्वी मला वेगानें फिरत असलेल्या अलातचक्रासारखी भासली; आणि प्राण्यांमध्यें असलेल्या सर्व कांहीं गोष्टी माझ्या प्रत्यक्ष अनुभवाला आल्यामुळें पृथ्वी हा एक सर्व वस्तूंचें प्रतिबिंब दर्शविणारा आरसा आहे कीं काय असें मला वाटूं लागलें. प्रथमतः पूर्व दिशेला गेल्यावर नानाप्रकारचे वृक्ष, नानाप्रकारचीं सरोवरें, आणि दऱ्यांसहवर्तमान रम्य पर्वत मीं अवलोकन केले. धातूंनीं भूषित असलेला उदयाचल, आणि अप्सरांचें नेहमींचें निवासस्थान असलेला क्षीरसागर हे मीं त्या दिशेसच पाहिले. परंतु वाली पाठलाग करीत असतांना, मी पळतां पळतां एकदम वळून जाऊं लागलों, आणि ती दिशा सोडून देऊन विंध्याचलावरील वृक्षांनीं व्याप्त आणि चंदनवृक्षांनीं सुशोभित अशा दक्षिण दिशेकडे चालता झालों. नंतर, वृक्षांच्या अथवा पर्वतांच्या पलीकडे वालीला पहात पहात मी दक्षिण दिशा सोडून वाली तसाच पाठलाग करीत असतांना पश्चिम दिशेकडे धावूं लागलों. तेव्हां नानाप्रकारचे देश आणि श्रेष्ठ अस्ताचल पर्वत पहातां पहातां शेवटीं मी त्या श्रेष्ठ अस्ताचलावर आलों, आणि तेथून उत्तरेकडे पळालों. हिमालय पर्वत, मेरु पर्वत आणि उत्तर समुद्र जरी मी हिंडलों, तरी वाली मागोमाग धावत येत असल्यामुळें, आपणांला कोठेंही आश्रय मिळत नाहीं असें जेव्हां माझ्या लक्षांत आलें, तेव्हां बुद्धिमान हनुमंत मला म्हणाला, 'हे राजा, आतां मला स्मरण झालें." ह्या आश्रमामध्यें जर वाली प्रवेश करील, तर त्याच्या मस्तकाचे शेंकडों तुकडे होतील," असा मतंग ऋषींनीं वानरराज वालीला त्या वेळीं शाप दिलेला आहे. ह्यास्तव, त्या मतंगाश्रमामध्यें आपलें वास्तव्य निर्भय व सुखावह होईल.' "

सुग्रीव पुढें सांगतोः—रामचंद्रा, असें हनूमानानें सांगितल्यावर ऋष्यमूक पर्वतावर जाऊन मी राहिला असतां, मतंग मुनींच्या भयामुळें वाली माझ्यासमीप येण्यास समर्थ झाला नाहीं. सारांश, राजा, ह्याप्रमाणें त्या वेळीं सर्व भूमंडल मीं प्रत्यक्ष अवलोकन केलें, आणि शेवटीं ऋष्यमूक पर्वताच्या गुहेचा आश्रय करून राहिलों.

## सर्ग सत्तेचाळिसावा.

—:०:—

### सीताशुद्धीस गेलेल्या वानरांचें पुनरागमन.

सीतेच्या शोधाकरितां वानरराज सुग्रीवानें चोहोंकडे जाण्यास आज्ञा केलेले ते वानरश्रेष्ठ आज्ञेप्रमाणें लगेच चालते झाले; आणि सरोवरें, नद्यांचीं तीरें, मैदानें, नगरें, आणि नद्यांच्या प्रवाहामुळें जाण्यास दुर्गम झालेले प्रदेश चोहोंकडे शोधूं लागले. सारांश, सुग्रीवाची आज्ञा झालेले ते सर्व वानरसेनाधिपति पर्वत, वनें आणि अरण्यें ह्यांसहवर्तमान तिकडील देश शोधूं लागले. ते सर्वजण वानर दिवसां शोधीत असत, आणि रात्रीं निद्रा घेण्याकरितां पृथ्वीवर पडत असत. ज्या ज्या देशांत वानर सीतेचा शोध लावण्याकरितां गेले, त्या त्या देशांत जिकडे तिकडे त्यांना प्रत्यहीं सर्व ऋतूंतील फळें धारण करणारे वृक्ष आढळूं लागले, आणि ते वानर रात्रीं निद्रा घेऊं लागले. तो निघण्याचा दिवस पहिला धरून प्रस्रवण पर्वतावर सीतेला शोधण्याकरितां गेलेले वानर एक महिन्याची मुदत भरूं लागतांक्षणीं निराश होऊन परत फिरले, आणि वानरराज सुग्रीवासमीप येऊन राहिले. सुग्रीवानें आज्ञा केल्याप्रमाणें सचिवांसहवर्तमान पूर्व दिशेस गेलेला महाबलाढ्य विनत सर्व पूर्व दिशा शोधल्यावरही सीतेचा शोध लागत नाहीं असें पाहून परत आला. सर्व उत्तर दिशा धुंडाळून महाकपि शतबलिही मुदतीला भिऊन सैन्यासहवर्तमान परत आला. वानरांसहवर्तमान गेलेला सुषेणही पश्चिम दिशा धुंडाळून महिना पूर्ण होतांक्षणीं सुग्रीवाकडे परत आला; आणि रामासहवर्तमान प्रस्रवण पर्वतावर बसलेल्या सुग्रीवाकडे येऊन अभिवंदनपूर्वक त्याला म्हणाला, " सर्व पर्वत, गहन वनें, नद्या, समुद्रांतील बेटें आणि सर्व प्रदेश धुंडाळून काढिले; आपण सांगितल्याप्रमाणें सर्व गुहा शोधून काढिल्या, लतांच्या वेलांनीं सर्व बाजूंनीं व्याप्त झालेलीं लतागृहें हुडकिलीं, गहन प्रदेशांमध्यें आणि दुर्गम असलेल्या अवघड ठिकाणींही जाऊन अत्यंत बलाढ्य प्राण्यांचीं स्थलें धुंडाळून त्यांचा वधही केला, आणि जे म्हणून कांहीं गहन प्रदेश, तेही आम्ही फिरून फिरून शोधून काढिले. आतां, हे वानरराज, मनानें उदार आणि महाकुलीन असा जो हनूमान, तोच सीतेचा पत्ता लावील; कारण, ज्या दिशेला सीता गेली आहे, त्याच दिशेला तो वायुपुत्र हनुमान गेला आहे. "

## सर्ग अठ्ठेचाळिसावा.

—:०:—

### हनुमत्प्रभृतींचा शोध.

तार आणि अंगद ह्यांसहवर्तमान हनुमान सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणें उद्दिष्ट प्रदेशाकडे एकदम जाण्यास निघाला. त्या वानरश्रेष्ठांसह दूर जाऊन विंध्य पर्वताच्या गुहा आणि वनें व त्याचप्रमाणें पर्वतांवरील नद्यांमुळें दुर्गम झालेले प्रदेश, मोठमोठ्या वृक्षांनीं भरलेलीं वनें, नानाप्रकारचे पर्वत आणि अरण्यांतील वृक्षही त्यानें धुंडाळून काढिले. सारांश, हनुमान आणि त्याच्या बरोबर गेलेले ते सर्व वानर नानाप्रकारचीं मुळें व फळें यांवर उपजीविका करून सर्व दक्षिण दिशा शोधीत होते; तथापि त्या वीरांना जनककन्या सीतेचा शोध लागला नाहीं. निर्जल, निर्जन आणि म्हणूनच शून्य व दिसण्यांतही भयंकर असें वन, आणि त्याच्याच सारखीं निर्जल व निर्जन असलेलीं शून्य अरण्येंही त्यांनीं शोधून काढलीं. गुहा आणि अरण्यें ह्यांनीं युक्त असलेला जो जो मोठा प्रदेश शोधून काढण्याला कठिण असे, तो तोही त्यांनीं शोधून काढिला; आणि शोधून काढल्यानंतर, त्या देशाचा त्याग करून ते सर्व

वानरसेनाधिपति कसल्याही प्रकारची भीति न बाळगितां प्रवेश होण्यास कठिण अशा दुसऱ्याच एका प्रदेशामध्यें गेले. त्या ठिकाणचे वृक्ष हे फळें, पुष्पें व पानें ह्यांनीं रहित असून नद्याही निर्जल झालेल्या होत्या, व मुळें-पाळेंही अत्यंत दुर्लभ होतीं. महिष, मृग, गज, व्याघ्र, पक्षी अथवा दुसरेही वनामध्यें रहाणारे प्राणी तेथें नव्हते; वृक्ष, ओषधि, वृक्षाच्या आश्रयानें राहणाऱ्या वेली, आणि स्निग्ध पर्णांनीं युक्त अशा भूमीवरही पसरलेल्या वेली तेथें मुळींच नसून, कमळें प्रफुल्लित झाल्यामुळें प्रेक्षणीय, सुगंधयुक्त, आणि भ्रमरांनीं व्याप्त झालेलीं सरोवरेंही तेथें नव्हतीं. अशा त्या वनप्रदेशामध्यें कंडु म्हणून एक महाभाग्यवान सत्यवादी तपोधन महर्षि रहात होते; ते फारच रागीट होते, आणि तपश्चर्येसंबंधी नियमांमुळें त्यांच्यासमोर दुसऱ्यांनीं जाणेंही अशक्य झालें होतें. त्या वनामध्यें त्यांचा एक दहा वर्षांचा मुलगा मृत्यु पावला होता, आणि त्यामुळें ते महर्षि क्रुद्ध झाले होते; इतकेंच नव्हे, तर त्या धर्मात्म्या महर्षींनीं, हें प्रचंड वन मृगरहित व पक्षिरहित होऊन कोणालाही आश्रय करण्याला उपयोगी पडणार नाहीं, व ह्यांत प्रवेश करणेंही अत्यंत कठिण होईल, असा शापही देऊन टाकिला होता. त्या प्रदेशांतीलही वनें, पर्वतांच्या गुहा आणि नद्यांचे उगम त्यांनीं लक्ष्य लावून शोधिले. तथापि सुग्रीवाच्या मर्जीप्रमाणें वागणाऱ्या त्या महात्म्यांना तेथें सीतेचा अथवा तिचा अपहार करणाऱ्या रावणाचाही पत्ता लागला नाहीं.

नंतर, लता व झांकरें ह्यांनीं व्याप्त झालेल्या त्या भयंकर प्रदेशामध्यें प्रवेश केल्यावर, उग्र कर्म करणाऱ्या आणि देवांची मुळींच भीति नसलेल्या एका असुराला त्यांनीं तेथें अवलोकन केलें. इतकेंच नव्हे, परंतु त्या पर्वतप्राय असुराला अवलोकन करितांक्षणीं ते सर्व वानरसेनाधिपति चांगल्या तयारीनें राहिले, आणि तो बलाढ्य असुरही "मेलांत" असें त्या सर्व वानरांना म्हणाला, व क्रुद्ध होऊन व मूठ वळलेला एक हात उगारून त्यांच्या अंगावर धावला. परंतु तो एकाएकीं धावून येत असतांना, हा रावण आहे असें समजून वालिपुत्र अंगदानें त्याला एक चपराक लगावली. चपराक बसतांक्षणीं तोंडांतून रक्ताच्या गुळण्या टाकीत टाकीत तो असुर फेंकून दिलेल्या पर्वताप्रमाणें भूमीवर पडला. ह्याप्रमाणें तो निश्चेष्ट पडला असतां ते सर्व विजयी वानर त्या देशांतील बहुतेक पर्वत व गुहा शोधूं लागले. तो सर्व प्रदेश शोधून निघाला असें समजून आल्यानंतर, ते सर्व वनवासी वानर दुसऱ्याच एका पर्वतावरील घोर अरण्यामध्यें शिरले, आणि तें शोधून काढल्यावर पुनरपि सीतेचा शोध लागत नाहीं म्हणून ते खिन्न झाले, आणि उड्या टाकीत टाकीत एकांत प्रदेशामध्यें सर्व एकत्र जुळून एका वृक्षाखालीं खिन्न होऊन बसले.

## सर्ग एकुणपन्नासावा.

—:०:—

### पुनः शोध.

नंतर शोधून शोधून थकून गेलेला महाबुद्धिमान अंगद सर्व वानरांना धीर देऊन हलके हलके म्हणाला, "वनें, पर्वत, नद्या, दुर्गम प्रदेश, अरण्यें, दऱ्या आणि पर्वतांवरील गुहा हें सर्व आपण चोहोंकडून शोधिलें; परंतु ठिकठिकाणीं आपण एकत्र जुळून शोध केला तरी जानकीचा शोध लागत नाहीं, आणि त्याचप्रमाणें त्या सीतेचा अपहार करणारा पापी राक्षसही दृष्टीस पडत नाहीं. काळ तर आपला पुष्कळ गेला, आणि सुग्रीवाची आज्ञा तर फारच कडक पडली; तेव्हां तुम्ही आतां एका जुटीनें चोहोंकडे शोध करा. आळस, प्रवासामुळें होणारें दुःख, आणि निद्रा ह्यांची पर्वा न करितां जनककन्या सीता दृष्टीस पडेल अशा रीतीनें आतां आपण शोध

करूं. खेदराहित्य, दक्षता आणि मनाच्या उत्साहाचा भंग न होऊं देणें हीं कार्यसिद्धि करणारीं आहेत, आणि म्हणूनच मी तुम्हांला हें सांगत आहें. हें दुर्गम वन वानरांनीं अद्यापि शोधून काढिलें पाहिजे. सारांश, मनामध्यें खेद न बाळगितां सर्व वन तुम्ही शोधून काढा. वानर प्रयत्न करूं लागले असतां त्या प्रयत्नकर्माचें फल अवश्य दृष्टीस पडणारच. ह्याकरितां, मनामध्यें खिन्न होऊन उद्योग सोडून देणें योग्य नाहीं. शिवाय, वानरहो, राजा सुग्रीव रागीट असून त्याचें शासन फार कडक आहे; तेव्हां त्याची व त्याचप्रमाणें महात्म्या रामाची आपणांला नेहमीं भीति बाळगिली पाहिजे. मी हें हिताकरितां तुम्हांला सांगितलें आहे. तुम्हांला रुचल्यास ह्याप्रमाणें करा; अथवा हें माझें सांगणें जर रुचत नसेल, तर, वानरहो, ह्या प्रसंगीं सर्वांना काय योग्य आहे तें तरी एकदा कळूं द्या."

हें अंगदाचें भाषण ऐकून, तृषा व श्रम ह्यांच्यामुळें स्वरानें हळू पण स्पष्ट अशा वाणीनें गंधमादन म्हणाला, "अंगदानें सांगितलेलें करणें तुम्हांला योग्य आहे, तें हितकारक आहे, आणि अनुकूल आहे. ह्यास्तव ह्याचें ऐकिलें पाहिजे. महात्म्या सुग्रीवानें सांगितल्याप्रमाणें पुनरपि पर्वत, गुहा, टेंकड्या, शून्य वनें आणि पर्वतावरील जलप्रवाह आपणांला शोधिले पाहिजेत. ह्याकरितां एकजूट होऊन सर्वांनीं वन आणि पर्वतसंबंधी दुर्गम प्रदेश धुंडाळिले पाहिजेत."

असें गंधमादनानें सांगितल्यानंतर ते महाबलाढ्य वानर तेथून उठले, आणि विंध्यपर्वतासंबंधी वनांनीं व्याप्त झालेल्या दक्षिण दिशेमध्यें हिंडूं लागले. प्रथमतः शिखरें आणि दऱ्या ह्यांनीं युक्त आणि शरत्काळच्या मेघाप्रमाणें भासणाऱ्या भव्य रजतपर्वतावर ते गेले, आणि सीतेचा शोध लावण्याची इच्छा धरणारे ते वानरश्रेष्ठ, त्या पर्वतावरील रमणीय लोध्रवन व संतपर्ण वृक्षांचीं वनें शोधूं लागले. त्या पर्वताच्या माथ्यावर चढलेले ते महापराक्रमी वानर शोधून शोधून जरी थकले, तरी सुद्धां रामाची प्रिय पट्टराणी सीता त्यांच्या दृष्टीस पडली नाहीं. अनेक गुहांनीं युक्त असलेला तो पर्वत जितका म्हणून त्यांना दृग्गोचर होता, तितक्यावर आरूढ होऊन ते वानर चोहोंकडे शोधूं लागले; आणि नंतर खालीं उतरल्यावर, भांबावून गेलेले व कांहींएक सुचेनासें झालेले ते एका वृक्षाजवळ येऊन मुहूर्तभर तेथें बसले. एक मुहूर्त विश्रांति घेतल्यानंतर किंचित् श्रमपरिहार झाला. तेव्हां पुनरपि ते सर्व दक्षिण दिशा शोधून काढण्यास तयार झाले; आणि हनूमान आदिकरून शोध करण्याकरितां निघालेले ते सर्व वानरश्रेष्ठ, विंध्यपर्वतच शोधून काढण्याचें प्रथम मनामध्यें योजून त्या पर्वतावर चोहोंकडे संचार करूं लागले.

## सर्ग पन्नासावा.

—:०:—

### ऋक्षबिलदर्शन.

तार व अंगद ह्यांच्याशीं मिळून हनूमान वानर विंध्यपर्वताच्या गुहा व वनें धुंडाळूं लागला. सिंहव्याघ्रांनीं भरलेल्या अशाही त्या श्रेष्ठ पर्वतावरील गुहा तो शोधूं लागला, आणि क्लेशदायक असलेल्या मोठमोठ्या ओढ्यांतूनही तो शोध करूं लागला. शेवटीं त्या पर्वताच्या नैर्ऋत्य भागाला ते वानर गेले, आणि तेथेंच वास्तव्य करीत असतांना त्यांची परत येण्याची मुदत भरून गेली. तो प्रचंड प्रदेश गुहा व अरण्यें ह्यांनीं युक्त असल्यामुळें, जरी धुंडाळण्यास फारच अशक्य होता तरी वायुपुत्र हनुमानानें तो सर्व पर्वत शोधून काढण्याचा क्रम सुरू ठेविलाच होता. एकमेकांपासून विशेष दूर न रहातां वेगळे वेगळे होऊन गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैंद, द्विविद, हनूमान्, जांबवान्, युवराज अंगद आणि वनामध्यें हिंडणारा तार हे, पर्वत-

समुदायांनीं युक्त असलेले प्रदेश शोधून काढून दक्षिण दिशा ठिकठिकाणीं हुडकूं लागले असतां एक आच्छादित विवर त्यांनीं अवलोकन केलें. तें विवर आंत प्रवेश करण्याला कठिण असून ऋक्षबिल असें त्याचें नांव होतें, आणि एका दानवानें त्याचें रक्षण केलेलें होतें.

असो; क्षुधा व तृषा ह्यांनीं व्याप्त होऊन श्रांत झालेल्या त्या उदकार्थी वानरांनीं लता व वृक्ष ह्यांनीं गजबजून गेलेलें तें मोठें बीळ अवलोकन केलें. त्या बिळांतून क्रौंच, हंस, सारस आणि कमलपुष्पांच्या परागामुळें शरीर रंगून गेलेले व उदकानें आर्द्र झालेले चक्रवाक पक्षी बाहेर पडत होते. अशा प्रकारें, ओलांडून जाण्यास अशक्य असलेल्या त्या सुगंधि बिळाजवळ येऊन वानरश्रेष्ठ मनामध्यें विस्मयचकित झाले; आणि येथें उदक असेल अशी त्यांची अटकळ झाल्यामुळें ते आनंदित होऊन अगदीं त्या बिळाजवळ गेले. दैत्यराज बलीच्या निवासस्थानासारखें (पातालासारखें) असलेलें ते विवर नानाप्रकारच्या प्राण्यांनीं भरलेलें होतें. त्या घोर विवराकडे पहाण्याची सोय नव्हती, आणि त्यांत प्रवेश करणें तर फार अशक्यच होतें. तदनंतर, आकृतीनें पर्वतशिखराप्रमाणें असलेला आणि अरण्यें व वनें ह्यांच्याविषयीं माहितगार असलेला वायुपुत्र हनूमान घोर वानरांना म्हणाला, "पर्वतसमुदायांनीं व्याप्त झालेले देश धुंडाळितां धुंडाळितां सर्व दक्षिणा दिशा हुडकून आपण सर्व अगदीं थकून गेलों; तथापि सीतेचा आपल्याला पत्ता लागत नाहीं. ह्या विवरांतून हंस, सारस पक्ष्यांसहवर्तमान क्रौंच, आणि चक्रवाक असे पक्षी उदकानें आर्द्र होऊन सर्व बाजूंनीं बाहेर पडत आहेत. ह्यावरून येथें उदकयुक्त कूप अथवा सरोवर हें खास असलेंच पाहिजे. शिवाय, ह्या विवराच्या द्वाराशीं असलेले हे वृक्षही टवटवीत दिसत आहेत."

## ऋक्षबिलप्रवेश.

ह्याप्रमाणें हनूमानानें सांगितलें असतां ते सर्व वानर त्या अंधकारानें व्याप्त झालेल्या विवरामध्यें प्रविष्ट झाले, आणि चंद्रसूर्यप्रकाशरहित व म्हणूनच अंगावर कांटा आणणारें असें तें विवर पाहूं लागले. असो. त्या विवरांतून सिंह आणि नानाप्रकारचे पशुपक्षी बाहेर पडत असलेले अवलोकन केल्यावर, अंधकारानें व्याप्त अशा त्या विवरामध्यें ते श्रेष्ठ श्रेष्ठ वानर प्रविष्ट झाले असतां त्यांची दृष्टि, प्रभाव आणि पराक्रम ह्यांचें तेथें कांहीही चालेना. ह्यामुळें, त्यांची गति वायूप्रमाणें होती तरी, दृष्टिच अंधकारामध्यें कुंठित झाल्याकारणानें एकमेकांचे हात धरूनच त्या वानरश्रेष्ठांना वेगावेगानें त्या विवरामध्यें प्रवेश करणें भाग पडलें. अशा प्रकारें नानाप्रकारच्या वृक्षांनीं व्याप्त झालेल्या त्या भयंकर विवरामध्यें एकमेकाचे हात वगैरे घट्ट धरून सुमारें एक योजनभर ते गेले असतां, तृषाक्रांत आणि म्हणूनच उदकार्थी बनलेले ते वानर अतिशय गोंधळून गेले, आणि त्यांना कांहींएक सुचेनासें झालें. सारांश, कांहीं वेळपर्यंत ते सावध राहून त्या विवरामध्यें चालत राहिले; परंतु शेवटीं चालतां चालतां अतिशय थकून जाऊन दीनवदन व कृश झालेले ते वीर जीविताविषयीं निराश झाले असतां त्यांना प्रकाश दिसूं लागला.

## ऋक्षबिलशोभा.

तदनंतर, जेथें अंधकाररहित वन आहे अशा त्या प्रदेशाला आल्यावर, प्रदीप्त अग्नीसारखे तेजस्वी असे सुवर्णवृक्ष त्या विनयसंपन्न वानरांनीं अवलोकन केले. साल, ताल, तमाल, पुन्नाग, वंजुल, धव, चंपक, नागवृक्ष आणि प्रफुल्लित कर्णिकार वृक्ष त्यांनीं अवलोकन केले; सुवर्णमय आणि आश्चर्यकारक अशा झुबक्यांनीं, आरक्तवर्ण नूतन पल्लवांनीं, पुष्पगुच्छरूप गजऱ्यांनीं

आणि लतांनीं युक्त, सुवर्णालंकारांनीं भूषित, बालसूर्याप्रमाणें तेजस्वी, वैदूर्यरत्नमय आधारप्रदेशांनीं युक्त, व आकृतीनें देदीप्यमान असे सुवर्णमय वृक्ष त्यांनीं पाहिले. नील आणि वैदूर्य ह्या रत्नांप्रमाणें ज्यांचा वर्ण आहे, पक्षी आणि बालसूर्याप्रमाणें तेजस्वी असे मोठमोठे सुवर्णवृक्ष ह्यांनीं जीं व्याप्त आहेत, सुवर्णमय मत्स्यांनीं आणि त्याचप्रमाणें मोठमोठ्या कमलपुष्पांनीं जीं भरलेलीं आहेत, आणि निर्मल उदकानें जीं युक्त आहेत, अशीं कमलयुक्त सरोवरें त्यांनीं अवलोकन केलीं. सुवर्णाच्या खिडक्यांनीं युक्त आणि मोत्यांच्या सरांनीं व्याप्त अशीं सोन्याचीं व रुप्याचीं विमानें त्यांच्या दृष्टीस पडलीं. सुवर्ण, रजत आणि मृतिका ह्यांच्या योगानें तयार करून वैदूर्य मण्यांनीं भूषित केलेलीं श्रेष्ठ गृहें सर्व बाजूंनीं त्या वानरांच्या अवलोकनांत येऊं लागलीं. फलांनीं व पुष्पांनीं भरलेले, सुवर्णवर्ण भ्रमरांनीं गजबजलेले, आणि कांतीनें पोवळ्याप्रमाणें असलेले वृक्ष, मध, रत्नें व सुवर्ण ह्यांच्या योगानें आश्चर्यकारक झालेलीं नानाप्रकारचीं मोठमोठीं आसनें, आणि शय्या हीं त्यांनीं चोहोंकडे अवलोकन केलीं. सुवर्ण, रौप्य व कांस्य ह्या धातूंच्या भांड्यांच्या राशी, दिव्य अगुरु आणि चंदन ह्यांचे पवित्र ढीग, पवित्र व भक्षण करण्यास योग्य अशीं मुळें व फळें, पालखी वगैरे मोठीं मूल्यवान यानें, माधुर्ययुक्त मध, मोठमोठ्या मूल्यवान् दिव्य वस्त्रांचे ढीग, व अद्भुत ऊर्णावस्त्रांच्या अजिनांच्या राशी हीं त्यांनीं पाहिलीं.

### स्वयंप्रभादर्शन.

पुढें ठिकठिकाणीं धुंडाळितां धुंडाळितां त्या महातेजस्वी शूर वानरांनीं विवरामध्यें जवळच कोणी एक स्त्री अवलोकन केली, आणि वल्कल व कृष्णाजिन परिधान केलेली व शुद्ध आहार करून तेजानें झळकत असलेली ती तपस्विनी अवलोकन करितांक्षणीं ते वानर अगदीं विस्मयचकित झाले. नंतर, शरिरानें पर्वतप्राय असलेल्या हनुमानानें हात जोडिले, आणि अभिवंदन करून तिला विचारिलें, "तूं कोण? व हें गृह, हीं रत्नें आणि हें विवर कोणाचें?"

## सर्ग एकावन्नावा.

—:०:—

### ऋक्षबिलवृत्त.

वल्कल व कृष्णाजिन परिधान केलेल्या त्या महाभाग्यवती धर्मचारिणी तपस्वी स्त्रीला ह्याप्रमाणें विचारल्यानंतर हनुमान तिला म्हणाला, "अंधकारानें व्याप्त झालेल्या विवरामध्यें आम्ही विचार न करितां प्रविष्ट झालों असून क्षुधेनें व्याकुल झाल्यामुळें सर्व प्रकारें खिन्न झालों आहों; आणि अशा रीतीनें ह्या नानाप्रकारच्या अद्भुत गोष्टी पाहून आम्ही अगदीं गोंधळून गेलों आहों, व व्याकुल झाल्यामुळें आम्हांला भानही राहिलें नाहीं. तेव्हां बालसूर्याप्रमाणें तेजस्वी असलेले हे सुवर्णवृक्ष, पवित्र व भक्षण करण्यास योग्य अशीं मुळें व फळें, सोन्याचीं विमानें, सुवर्णाच्या खिडक्यांनीं युक्त व रत्नसमुदायांनीं व्याप्त असलेलीं रुप्याचीं घरें, आणि पुष्पें, फलें व सुगंध ह्यांनीं युक्त असलेले हे सुवर्णमय वृक्ष कोणाचे आहेत, निर्मल उदकामध्यें सुवर्णकमलें कोणाच्या प्रभावानें उत्पन्न झालीं आहेत, आणि सुवर्णमय कूर्म व मत्स्य कसे दृष्टीस पडत आहेत, हें तूं आम्हांला सांग. तात्पर्य, हें तुझ्या स्वतःच्याच प्रभावामुळें झालेलें आहे, किंवा हें दुसऱ्या कोणाच्या तपाचें बल आहे, हें कांहींच माहीत नसलेल्या आम्हां सर्वांना तूं सर्व कथन कर."

ह्याप्रमाणें हनूमान तिला म्हणाला असतां, प्राणिमात्रांच्या हिताविषयीं तत्पर असलेली ती धर्मचारिणी तपस्विनी स्त्री त्याला म्हणाली, "हे वानरश्रेष्ठा, मय म्हणून एक महातेजस्वी मायावी आहे, आणि त्यानें मायेच्या योगानें हें सर्व सौ-

वर्ण वन निर्माण केलें आहे. पूर्वी श्रेष्ठ श्रेष्ठ दानवांचा तो शिल्पी होता हें प्रसिद्ध आहे, आणि त्यानेंच दिव्य व सर्वोत्कृष्ट असें हें वसतिस्थान तयार केलें आहे. मोठ्या अरण्यामध्यें हजारो वर्षे तपश्चर्या केल्यावर ब्रह्मदेवापासून त्याला वर प्राप्त झाला, आणि त्यामुळे उशन महर्षींनीं ग्रथित केलेलें सर्व शिल्पशास्त्र त्याला मिळालें. हवा तो भोग्य पदार्थ उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असलेला तो बलाढ्य मय हें सर्व निर्माण करून त्या महावनामध्यें कांहीं वेळपर्यंत सुखानें राहिला होता. तो दानवश्रेष्ठ हेमा नामक अप्सरेचे ठिकाणीं लंपट झाला असल्यामुळें, देवराज इंद्रानें वज्र हातांत घेऊन युद्धामध्येंच त्याचा वध केला; आणि ह्याप्रमाणें त्याचा वध झाल्यावर, ब्रह्मदेवानें हें उत्कृष्ट वन, अक्षय्य भोग्य पदार्थ, आणि हें सुवर्णमय वसतिस्थान त्या हेमा नामक अप्सरेला दिलें. असो. हे वानरश्रेष्ठा, मी मेरुसावर्णीची स्वयंप्रभा कन्या आहें, आणि हें त्या हेमा अप्सरेचें वसतिस्थान संभाळीत आहें. नृत्य आणि गायन ह्यांमध्यें निष्णात असलेली ती हेमा माझी प्रिय सखी आहे, आणि रक्षणसामर्थ्याविषयीं तिनें मला वर दिला असल्यामुळें मी ह्या प्रचंड गृहाचें रक्षण करीत आहें.

" असो; भक्षण करण्यास योग्य अशीं पवित्र मुळें व फळें भक्षण करून जलप्राशन केल्यावर, तुमचें काय कार्य आहे, तुम्ही कशाकरितां अरण्यांतून हिंडत आहां. आणि हें दुर्गम वन तुमच्या कसें दृष्टीस पडलें हे सर्व तुम्ही मला कथन करा."

## सर्ग बावन्नावा.

—:०:—

### हनुमान व स्वयंप्रभा यांचें संभाषण.

फळें व मुळें भक्षण केल्यानंतर श्रमपरिहार झालेल्या त्या सर्व वानरश्रेष्ठांना ती स्वकार्यदक्ष धर्मचारिणी तपस्विनी म्हणाली, "हे वानरहो, फलभक्षणानें तुमचा थकवा जर गेला असेल, आणि हें जर मीं तुम्हांला विचारलेलें ऐकण्यासारखें असेल, तर तुमची सर्व हकीकत श्रवण करण्याची माझी इच्छा आहे."

हें तिचें भाषण श्रवण करून, वायुपुत्र हनुमान सरळपणानें तिला इत्थंभूत वर्तमान सांगूं लागला: तो म्हणाला, "इंद्र व वरुण ह्यांच्याच उपमेस पात्र असलेला सर्व लोकांचा राजा दशरथपुत्र वैभवशाली राम, भार्या सीता आणि भ्राता लक्ष्मण ह्यांसहवर्तमान दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झाला असतां त्याची भार्या रावणानें जनस्थानांतून बलात्कारानें हरण करून नेली. वानरश्रेष्ठांचा राजा जो सुग्रीव नामक वीर, तो त्या राजाचा सखा असून त्यानें आम्हांला पाठविलें आहे; आणि म्हणूनच, अगस्त्य मुनींनीं स्वीकारलेल्या व यमानें रक्षण केलेल्या दक्षिण दिशेस ह्या अंगदप्रभृति श्रेष्ठ वानरांसहवर्तमान आम्ही आलों आहों. सारांश, यथेष्ट रूप धारण करणाऱ्या रावण राक्षसाचा आणि विदेहराजकन्या सीतेचा तुम्ही सर्वजण मिळून शोध लावा, अशी त्याची आम्हांला आज्ञा झाली आहे. त्याप्रमाणें, सर्व वनें व समुद्र ह्यांसहवर्तमान दक्षिण दिशा धुंडाळल्यावर आम्ही सर्व बुभुक्षित होऊन एका वृक्षाखालीं बसलों होतों. आम्हां सर्वांचीं मुखें निस्तेज झालीं होतीं; आणि चिंतारूप महासागरामध्यें आम्ही मग्न झालों असून, ह्या महासागरांतून कसें पार पडावें हें कांहीं सुचत नसल्यामुळें आम्ही सर्वजण विचार करीत बसलों होतों; तों इतक्यांत इकडे तिकडे दृष्टि फेंकितां फेंकितां अंधकारानें व्याप्त आणि लतावृक्षांनीं गजबजलेलें मोठें विवर आम्ही अवलोकन केलें. ह्या विवरांतून, जलबिंदूंनीं युक्त असे ज्यांचे पंख झालेले आहेत, आणि ज्यांचीं शरीरेंही जलानें आर्द्र झालेलीं आहेत असे हंस, कुरर व सारस पक्षी बाहेर पडले. तेव्हां " येथें आपण खुशाल प्रवेश क-

रावा" असें मीं वानरांना सांगितलें असतां, उदकाच्या संभवाविषयीं हें माझें अनुमान त्यांही सर्वांना पटलें, आणि कार्याची त्वरा असल्यामुळें ह्याविषयीं सर्वांचें एकमत झालें. नंतर एकमेकांचे हात घट्ट धरून गुहेमध्यें अंधकार, अंधकारानें व्याप्त झालेल्या त्या विवरामध्यें आम्ही एकदम प्रविष्ट झालों. सारांश, सीतेचा शोध लावणें हें आमचें कार्य आहे, आणि ह्याच कार्याकरितां आम्ही अरण्यामध्यें आलों आहों. आम्ही सर्वजण बुभुक्षित व खिन्न होऊन तुझ्या समीप आलों आहों ह्याचें खरें कारण हेंच. आम्ही अतिथि असें समजून तूं आम्हांस दिलेलीं मुळें व फळें क्षुधेनें व्याकुळ झाल्यामुळें आम्ही भक्षण केलीं खरीं. क्षुधेनें आम्ही मृत्युपंथास लागलों असतांना ज्या अर्थी तूं सर्व वानरांचें रक्षण केलें आहेस, त्या अर्थी ह्या उपकाराची फेड होण्याकरितां वानरांनीं तुझें काय काम करावें हें तूं सांग.

ह्याप्रमाणें, हनुमानाला पुढें करून त्या सर्व वानरांनीं तिला सांगितलें असतां ती सर्वज्ञ स्वयंप्रभा त्या सर्व वानरसेनाधिपतींना म्हणाली, "सर्व बलाढ्य वानरांवर मी प्रसन्न झालें आहें. धर्मानें वागत असलेल्या मला कोणाच्याही हातून करण्यासारखें कार्य करून घेण्याचें उरलें नाहीं."

## ऋक्षबिलांतून बाहेर येणें.

हें त्या तपस्विनीनें धर्माला अनुसरून असें शुभ भाषण हनुमानाशीं केलें असतां, मनोहर नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या तपस्विनीला हनुमान म्हणाला, "आम्ही सर्व तुज धर्मचारिणीला शरण आलों आहों. महात्म्या सुग्रीवानें जी आम्हांला मुदत दिली होती, ती विवरामध्यें असतांनाच संपून गेली. ह्यास्तव, तूं ह्या विवरांतून आम्हांला सुखरूप पार पाड. सुग्रीवाच्या आज्ञेबाहेर गेलेल्या, आणि म्हणूनच आयुष्याचे दिवस भरलेल्या आम्हा सर्वांचें तूं रक्षण कर. सुग्रीवाची आम्हांला भीति वाटत आहे. हे धर्मचारिणि, आम्हांला मोठें कार्य कर्तव्य आहे. परंतु ह्या विवरामध्यें वास्तव्य झाल्यामुळें आमचे हातून तें कार्य झालें नाहीं."

ह्याप्रमाणें हनुमानानें प्रार्थना केली असतां ती तपस्विनी म्हणाली, "ह्या विवरामध्यें प्रविष्ट झालेला प्राणी जिवंत बाहेर पडणें फार कठिण आहे असें मला वाटतें. तथापि, नियमांच्या योगानें संपादन केलेला जो तपाचा महाप्रभाव, त्याच्या योगानें मी तुम्हां सर्व वानरांना ह्या विवरांतून पार पाडून नेईन. हे वानरश्रेष्ठहो, तुम्ही सर्वजण डोळे मिटा. कारण, डोळे मिटल्यावांचून ह्या विवरांतून पार पडणें शक्य नाहीं."

ह्याप्रमाणें तिनें सांगितल्यावर, बाहेर जाण्याची उत्कंठा असल्यामुळें त्या सर्व वानरांनीं आनंदित होऊन डोळे मिटले, आणि हातांनीं ते भरभर गच्च आवळूनही धरिले. ह्याप्रमाणें त्या महात्म्या वानरांनीं डोळे झांकिले असतां त्या तपस्विनीनें त्यांनीं डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच त्या विवरांतून त्यांना पार पाडिलें; आणि विवराच्या बाहेर आल्यावर ती धर्मचारिणी त्या भयंकर विवरांतून पार पडलेल्या त्या सर्व वानरांना धीर देऊन म्हणाली, "नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं सुशोभित व सौंदर्यानें युक्त असा हा विंध्य पर्वत आहे, हा प्रस्रवण पर्वत आहे. आणि विपुल उदकाचें भांडार असलेला हा सागर आहे. हे वानरश्रेष्ठहो, तुमचें कल्याण असो; मी आतां स्वस्थानीं परत जातें.' असें म्हणून ती स्वयंप्रभा त्या भव्य विवरामध्यें प्रविष्ट झाली.

## सर्ग त्रेपन्नावा.

—:०:—

### वानरांच्या मनाचा खेद

तदनंतर, भयंकर लाटांनीं व्याप्त होऊन गर्जना करीत असलेला असा जो अपार व

घोर वरुणनिवासस्थानरूप सागर, तो त्यांनीं अवलोकन केला. मयासुरानें मायेच्या योगानें निर्माण केलेलें तें ऋक्षबिलसंज्ञक पर्वतसंबंधीं गहन स्थान धुंडाळण्यामध्येंच राजा सुग्रीवानें नेमून दिलेला त्यांचा महिना निघून गेला. तेव्हां प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेल्या विंध्याद्रीच्या पायथ्याशीं बसून ते महात्मे चिंताक्रांत झाले. नंतर, पुष्पांच्या अतिशय भारांनीं युक्त अशीं ज्यांचीं अग्रें झालेलीं आहेत, आणि शेंकडों लतांनीं जे व्याप्त झालेले आहेत, असे वसंत ऋतूच्या सुमाराला प्रफुल्लित होणारे वृक्ष अवलोकन केल्यावर तर ते भयभीत झाले; आणि वसंतसमय जवळ आला असें एकमेकाला सांगून, वेळेवर होण्याला योग्य असलेलें राजकार्य शेवटास न गेल्यामुळें ते भूतलावर निश्चेष्ट पडले. तेव्हां त्यांतील वृद्ध वानरांना आणि इतरांनाही मधुर वाणीनें मानमान्यतापूर्वक हांक मारून, सिंह अथवा वृषभ ह्यांच्यासारख्या स्कंधांनीं आणि पुष्ट व दीर्घ बाहूंनीं युक्त असलेला महाबुद्धिमान युवराज अंगद म्हणाला, "वानरराजाच्या आज्ञेवरून आपण सर्व बाहेर पडलों; परंतु आपण विवरामध्यें असतांनाच मुदतीचा महिना पूर्ण होऊन गेला, हें तुमच्या गांवीं देखील नाहीं कीं काय? आश्विन महिना संपल्यावर जी मुदत ठरवून आपण बाहेर पडलों, ती ही मुदत निघून गेली. ह्यास्तव आतां पुढें काय करावें? राजाची आज्ञा समजून घेऊन, नीतिमार्गामध्यें निष्णात व स्वामीला हितावह असें कोणतेंही कृत्य करण्याविषयीं दक्ष असलेल्या तुम्हांला राजानें पाठविलें, व चोहोंकडे पराक्रमासंबंधानें प्रख्यात आणि अप्रतिम कर्म करणारे असे तुम्ही सर्व सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणें मला पुढें घालून बाहेर निघालां. परंतु सांप्रत कार्यसिद्धि न झालेल्या आपणांला निःसंशय मरणेंच अवश्य आहे; कारण, वानरराजाच्या आज्ञेप्रमाणें न वागून कोणाला बरें सुख होणार आहे? सुग्रीवानें स्वतः ठरविलेली ही मुदत जर निघून गेली आहे, तर सर्व वानरांनीं अन्नपाणी न घेतां प्राणत्याग करणेंच योग्य आहे. सुग्रीव हा जातीचाच क्रूर आहे, व त्यांतूनही तो सांप्रत राजा झालेला आहे. ह्यास्तव, अपराध करून आपण त्याच्या पुढें गेलों असतां तो आपणांपैकीं कोणालाही क्षमा करणार नाहीं;—सीतेची बातमी न लागल्यामुळें तो आपला घातच करील. तस्मात् पुत्र, भार्या, द्रव्य आणि गृह ह्यांची आशा सोडून येथें आजच्या आजच प्राणत्यागाकरितां अन्नपाणी सोडून बसणें बरें. येथून आपण गेलों असतां राजा सुग्रीव अनुपम रीतीनें आपला निःसंशय वध करील. ह्यास्तव, येथेंच मृत्यु येणें आपणांला श्रेयस्कर आहे. सुग्रीवानें मला यौवराज्याचा अभिषेकही केला नाहीं;—महापराक्रमी राम राजानें मला अभिषेक केला आहे. तस्मात् पूर्वीपासूनच माझ्याशीं वैर बांधून असलेला सुग्रीव, आज्ञेचें उल्लंघन माझ्या हातून झालें आहे असें अवलोकन करितांक्षणीं मनाचा पक्का निश्चय करून भयंकर शासनानें माझा घात करील. ह्यास्तव राजाज्ञेमुळें जीव जाण्याचा प्रसंग येऊन ठपला असतां, माझे संकट अवलोकन करणाऱ्या सुहृदांशीं तरी मला काय कर्तव्य आहे? तस्मात्, येथेंच मी पवित्र अशा समुद्रतीरीं प्राणत्यागाकरितां अन्नपाणी सोडून बसतों."

हें युवराज अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर ते सर्व वानरश्रेष्ठ करुणस्वरानें त्याला म्हणाले, "सुग्रीव जातीचाच उग्र असून राम आपल्या प्रियेविषयीं अनुरक्त आहे. ह्यास्तव, ती मुदत टळून गेली असूनही सीतेचा पत्ता न लावितां परत गेलेल्या आपणांला अवलोकन करितांक्षणीं, आपल्या हातून कार्य झालें नाहीं हें लक्ष्यांत आणून रामाचें प्रिय करण्याकरितां तो निःसंशय आपला वध करील. तस्मात्, हातून अपराध झाल्यानंतर मालकाच्या सन्निध जाणें योग्य नव्हे,

आणि त्यांतूनही येथें आलेले आपण सुग्रीवाचे मुख्य सेवक पडलों. वास्तव, येथेंच सीतेला अवलोकन करून अथवा तिची बातमी तरी काढून आपण त्या वीराकडे जाऊं, आणि असें न झालें तर येथेंच यमसदनाच्या मार्गाला लागूं."

भयभीत झालेल्या त्या वानरांचें हें भाषण श्रवण करून तार वानर म्हणाला, "आतां खेद करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुम्हांला रुचत असेल तर स्वयंप्रभेच्या विवरामध्यें जाऊन आपण वास्तव्य करूं: कारण, मायेच्या योगानें निर्माण केलेल्या त्या विवरामध्यें पुष्पें, उदक आणि भोज्य व पेय पदार्थ ह्यांची समृद्धि आहे, आणि त्या विवरामध्यें दुसऱ्याचा प्रवेश होणेंही अत्यंत कठिण आहे. ह्याकरितां, आपण त्या विवरांत राहिलों म्हणजे आपणांला इंद्रापासून, रामापासून, अथवा वानरराज सुग्रीवापासून मुळींच भय नाहीं."

ह्याप्रमाणें अंगदाचें व विशेषतः ताराचें अनुकूल भाषण श्रवण केल्यावर सर्व वानरांना कांहींसा धीर आला, आणि ते सर्व त्याला म्हणाले, "ज्या रीतीनें आपला वध न होईल, अशी कांहीं तरी आपणांसंबंधानें तजवीज विलंब न होतां आजच्या आजच होऊं द्या."

## सर्ग चौपन्नावा.

—:०:—

### हनुमंताचें भाषण.

चंद्राप्रमाणें तेजस्वी असलेला तार त्याप्रमाणें बोलूं लागला असतां, अंगदाला राज्य प्राप्त झालें अशी हनुमानाला खात्रीच वाटूं लागली. वालिपुत्र अंगद हा शुश्रूषा, श्रवण, ग्रहण, धारण, ऊह† अपोह‡ अर्थज्ञान आणि तत्त्वज्ञान ह्या आठ गुणांनीं युक्त असलेल्या बुद्धीनें, साम, दान, भेद व दंड ह्या चार उपायांनीं प्राप्त होणाऱ्या बलानें, आणि देशकालज्ञता, दार्ढ्य, सर्वक्लेशसहिष्णुता, सर्वज्ञता, दक्षता, बल, गुप्त मसलत, मागल्या पुढल्या स्वतःच्या वर्तनाचा मेळ, शौर्य, भक्तिज्ञत्व, कृतज्ञता, शरण आलेल्याविषयीं दया, क्रोधराहित्य व स्थैर्य ह्या चौदा गुणांनीं युक्त आहे असें हनुमानाला वाटलें. नंतर, शुक्लपक्षाचे आरंभीं शोभेनें वृद्धिंगत होणाऱ्या चंद्राप्रमाणें तेज, बल व पराक्रम ह्यांच्या योगानें एकसारखा जो वृद्धिंगत होत आहे, बुद्धीनें बृहस्पतीची बरोबरी करणारा असून पराक्रमामध्यें जो पित्याची बरोबरी करणारा आहे, बृहस्पतीची शुश्रूषा करणाऱ्या इंद्राप्रमाणें जो ताराची शुश्रूषा करीत आहे, आणि स्वामिकार्याकरितां जो सर्व प्रकारें श्रांत झाला आहे, अशा त्या अंगदाला हनुमानानें तारप्रभृतींपासून वेगळा काढण्याचा उपक्रम केला. प्रथमतः साम, दान, भेद व दंड ह्या चार उपायांपैकीं भेदाची प्रशंसा करण्याकरितां त्या हनुमानानें आपल्या भाषणाच्या जोरावर त्या सर्व वानरांना विचारदृष्ट्या अंगदापासून फोडिलें; आणि ह्याप्रमाणें त्या सर्वांचें मत अंगदाहून भिन्न केल्यावर, चौथा उपाय जो दंड त्यानें युक्त अशा नानाप्रकारच्या भीतिजनक वाक्यांनीं अंगदाला तो भय उत्पन्न करूं लागला: तो म्हणाला, "हे तारापुत्रा अंगदा, तूं पित्याची बरोबरी करणारा असल्यामुळें युद्धामध्यें सुग्रीवापेक्षां निःसंशय जास्त आहेस; आणि म्हणूनच, सर्व वानर जर तुझ्या अनुरोधानें वागूं लागतील, तर पित्याप्रमाणें वानरांचें राज्य चांगल्या रीतीनें चालविण्यास तूं समर्थ आहेस. परंतु, हे वानरश्रेष्ठा, तूं स्वयंप्रभेच्या विवरांत राहूं लागलास, तर बायकामुलांचा अवश्य वियोग होणार असल्यामुळें नेहमीं अस्थिर मनाचे असलेले वानर तुझी आज्ञा मान्य करणार नाहींत. सारांश, बायकामुलांना सोडून

† तर्क करणें, तर्कप्रबंध ‡ निषेध करणें. ('ऊह' आणि 'अपोह' हेच शब्द मिळून 'ऊहापोह' हा शब्द झाला आहे, व त्याचा अर्थ — साधकबाधक प्रमाणांनीं एखाद्या गोष्टीचा विचार करणें— असा आहे.)

हे तुझ्या मर्जीप्रमाणें वागण्यास तयार होणार नाहींत हें मी तुला हवें तर अगदीं प्रत्यक्ष स्पष्ट करून सांगतों. उदाहरणार्थः—हा जांबवान्, नील, महाकपि सुहोत्र, व मी ह्या सर्वांना साम, दान, भेद आणि दंड ह्यांपैकीं कोणत्याही उपायानें सुग्रीवापासून परावृत्त करण्यास तूं समर्थ नाहींस. दुर्बलाशीं वाद उपस्थित करून बलाढ्य पुरुषानें रहाणें शक्य आहे; परंतु बलाढ्याशी स्पर्धा करून दुर्बलाला राहतां येणें शक्य नाहीं असें म्हणतात. ह्यास्तव, स्वतःच्या रक्षणाची इच्छा असणाऱ्या दुर्बल पुरुषानें बलाढ्याशीं स्पर्धा करूं नये. ह्या गुहेमध्यें रक्षण होईल असें जें तुझें म्हणणें आहे, तेही बरोबर नाही. कारण, जें हें ऋक्षबिल निर्भय म्हणून तूं तार वानरापासून ऐकिलें आहेस, त्याचें विदारण करणें हें कार्य लक्ष्मणाच्या बाणांसबंधानें पाहूं गेलें असतां अगदीं क्षुल्लक आहे. पूर्वी इंद्रानें वज्र फेकून त्या विवरामध्ये मयासुराचा वध केला त्यांत कांहींच नाहीं. लक्ष्मण आपल्या तीक्ष्ण बाणांच्या योगानें हें विवरच पानाच्या द्रोणामारखें फोडून टाकील. इंद्राच्या वज्रासारखे अथवा मेघांतील विद्युल्लते सारखे तीक्ष्ण व पर्वताचाही भेद करणारे नाराच बाण लक्ष्मणापाशीं पुष्कळ आहेत. तस्मात्, हे शत्रुतापना, ज्या वेळेला तूं विवरामध्यें राहूं लागशील, त्याच वेळेला सर्व वानर पक्का निश्चय करून तुला सोडून जातील. बायकामुलांचा वियोग होऊन दुःखामध्यें रात्रींच्या रात्री काढण्याचा प्रसंग आला म्हणजे ते त्रासून जातील; नेहमी उद्विग्न झालेल्या त्या वानरांना बायकामुलांचें स्मरण झालें असतां ते उत्सुक होऊन तुझा त्याग करतीलच; आणि ह्याप्रमाणे सुहृद् व हित इच्छिणारे बंधु ह्यांचा तुला वियोग झाला, म्हणजे जरा कोठें काडी हालली तरी सुद्धां राम आला कीं काय अशी शंका घेऊन तूं फारच भयभीत होशील. अत्यंत उग्र वेगानें व प्रचंड सामर्थ्यानें युक्त आणि सहन होण्यास अत्यंत अशक्य असे लक्ष्मणाचे घोर व तीक्ष्ण बाण रामकार्यापासून परावृत्त झालेल्या तुझा वध करतील. परंतु आम्हांबरोबर येऊन जर तूं नम्रपणाने सुग्रीवापाशीं उभा राहिलास, तर तुला तो रीतीप्रमाणें राज्यावर बसवील. तुझा चुलता तुझ्याशीं प्रेमाने वागण्याची इच्छा धरणारा आहे, स्वीकारलेलें व्रत नेटानें चालविणारा आहे, आचरणानें शुद्ध आहे, प्रतिज्ञा खरी करणारा आहे, आणि धर्मानें चालणारा राजा आहे; तो तुझा घात कधींही करणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर तुझ्या मातेच्या मर्जीप्रमाणे वागणारा असून त्याचें जीवितही तिची प्रीति संपादन करण्याकरितांच आहे, आणि त्याला स्वतःला दुसरें अपत्य नाहीं. तस्मात्, अंगदा, तूं आमच्याबरोबर तिकडे चल."

## सर्ग पंचावन्नावा.

—:o:—

### वानरांचें प्रायोपवेशन.

विनय, धर्म आणि राजाविषयीं आदरबुद्धि ह्यांनी युक्त असें हनुमानाचें भाषण श्रवण करून अंगद म्हणाला, "स्थैर्य, स्वतःच्या मनाची शुद्धता, सज्जनता, सरळपणा, पराक्रम आणि धैर्य हीं सुग्रीवाचे ठिकाणीं असण्याचा संभवच नाहीं. अहो, ज्येष्ठ भ्रात्याची प्रिय भार्या जी पट्टराणी, ती धर्मानें माता असूनही जो पापी तो जिवंत असतांनाच* ती स्वीकारतो, तो

* दैत्याचा वध करण्याकरितां वाली गुहेंत गेला असतां त्याची वाट पाहून कंटाळलेला सुग्रीव ते बिलद्वार बंद करून किष्किंधेत आला, तेव्हां मंत्र्यांनी त्याला आग्रहानें राज्यावर बसविलें असतां, रुमा व तार यांचा तो उपभोग घेऊं लागला त्या वेळच्या आचरणाला उद्देशून हें भाषण आहे.–मागें सर्ग शेहेचाळीसमधील 'सुग्रीवाचें भूमंडलपर्यटनवृत्त' या सदरांतील सुग्रीवाचें भाषण पहा.

धर्माची पर्वा कोठून करणार? युद्धाकरितां बिलामध्यें प्रवेश करणाऱ्या भ्रात्यानें बिलाच्या रक्षणार्थ नेमिलें असतांना ज्या दुष्टानें त्या विवराचें तोंड बंद केलें, इतकेंच नव्हे—पण हातावर हात मारून प्रतिज्ञापूर्वक ज्यानें ह्याला मित्र म्हटलें, व ज्यानें ह्याचें कार्य केलें, त्या महाकीर्तिमान राघवालाच जो विसरला, तो कोणाचा उपकार स्मरणार आहे? अधर्माचें भय यत्किंचितही न बाळगितां केवळ लक्ष्मणाच्या भीतीनेंच ज्यानें ह्या भूतलावर सीतेचा शोध लावण्याविषयीं आम्हांला आज्ञा केली, त्याचे ठिकाणीं धर्म असणार कसा? पापी, कृतघ्न, उपकाराचें स्मरणही नसलेला, आणि चंचल अशा त्या सुग्रीवावर कोण सज्जन पुरुष—आणि विशेषतः त्याच्या कुळांतील पुरुष—कधीं विश्वास ठेवण्यास तयार होणार आहे? सुग्रीव सद्गुणी असो अथवा दुर्गुणी असो; तो कसाही असला तरी शत्रुकुलामध्यें उत्पन्न झालेल्या मला पुत्र म्हणून राज्यावर बसवून तो कधींही जगविणार नाहीं. बिळामध्यें प्रवेश करण्यांत जर मीं त्याच्या आज्ञेचा भंग केला आहे, आणि म्हणूनच जर मी त्याचा अपराधी बनलों आहे, आणि हनूमानाच्या सांगण्याप्रमाणें सुग्रीवापेक्षा ज्याला वानरांचें साहाय्यही अगदीं कमी मिळणार आहे, असा मी अनाथ व दुर्बल किष्किंधा नगरीमध्यें गेलों असतां जगणार कसा? सारांश, सुग्रीव हा शठ, क्रूर आणि दुष्ट असल्यामुळें राज्याकरितां बंधनरूप गुप्त दंडानें माझी व्यवस्था लावून टाकील. तस्मात्, बंधनामुळें जें मला दुःख होणार, त्यापेक्षां अन्नपाणी सोडून देऊन येथें प्राणत्याग करणें फार चांगलें. ह्यास्तव, मला तसें करण्याची अनुज्ञा देऊन तुम्ही सर्व आपआपल्या घरीं जा. मी तुम्हांला प्रतिज्ञेनें सांगतों की, मी किष्किंधा नगरीला परत जाणार नाहीं; मी येथेंच उपवास करीत बसणार. कारण, मरणच मला श्रेयस्कर आहे. तुम्ही अभिवंदनपूर्वक राजाला माझें कुशल वर्तमान सांगा, आणि बलाढ्य रामलक्ष्मणांनाही अभिवंदनपूर्वक तसेंच कळवा. माझा धाकटा चुलता जो वानराधिपति सुग्रीव, त्याला तर विशेषतः आरोग्यपूर्वक माझें कुशल वर्तमान कळवून, मला मातेसमान असलेली जी रुमा तिलाही तुम्ही तसेंच कळवा, आणि माझी माता जी तारा तिचेंही तुम्ही सांत्वन करा. कारण, स्वभावतःच तिला मी प्रिय पुत्र असून ती बिचारी दयाळू असल्यामुळें माझा येथें नाश झाल्याचें ऐकतांक्षणीं निःसंशय जीविताचा त्याग करील.'

इतकें बोलून, आणि त्या वृद्ध कपींना अभिवंदन करून दुर्मुखलेला अंगद दर्भांमध्यें शिरून भूमीवर पडला. ह्याप्रमाणें तो तेथें पडला असतां श्रेष्ठ श्रेष्ठ वानर रडूं लागले, आणि दुःखित होऊन नेत्रांतून अश्रु ढाळूं लागले. सारांश, सर्व वानर सुग्रीवाची निंदा सुरू करून वालीची प्रशंसा करूं लागले, आणि अंगदाभोंवतीं जमून सर्वांनीं प्रायोपवेशनाविषयीं निश्चय केला. तात्पर्य, वालिपुत्र अंगदाचें तें भाषण श्रवण करितांक्षणीं त्या सर्वांनीं स्नान केलें, आणि ते पूर्वेकडे तोंड करून बसले; दक्षिणेकडे अग्र करून पसरलेल्या दर्भांवर उत्तर तीराचें अवलंबन करून व मरणाचा निश्चय करून बसलेले ते वानर 'हें अंगदाचें म्हणणें योग्य आहे' असें म्हणूं लागले; आणि रामाचा वनवास दशरथाचा मृत्यु, जनस्थानांतील राक्षसांचा वध, जटायूचा वध, सीतेचा अपहार, वालीचा वध, आणि रामाचा कोप ह्यांसबंधानें गोष्टी चालतां चालतां वानरांना दुसरेंच एक भय प्राप्त झालें.

असो; मोठमोठे व पर्वतशिखरांप्रमाणें धिप्पाड असलेले ते असंख्य वानर तेथें बसून अतिशय गर्जना करूं लागले असतां, मेघांच्या योगानें नादित होणाऱ्या आकाशाप्रमाणें त्या पर्वतावरील जलप्रवाहाचीं तीरें नादित होऊं लागलीं.

## सर्ग छपन्नावा.

—:०:—

### संपातीची भेट.

ज्या पर्वतप्रदेशावर ते सर्व वानर प्रायोपवेशन करण्याकरिता बसले होते, तिकडे गृध्रराज येऊं लागला. ता संपाति ह्या नावाचा एक चिरजीवी पक्षी असून जटायूचा भ्रात होता, आणि तो उदार असून बल व पराक्रम ह्यासबंधाने प्रख्यात होता. विंध्य नामक महापर्वताच्या गुहेतून निघाल्यानंतर बाहेरच्या बाजूला बसलेल्या वानरांना अवलोकन करितांक्षणी आनंदित होऊन तो म्हणाला " खरें खर. ह्या जगतामध्ये कर्माचे फळ पुरुषाला प्राक्तनानुसार येत असतें असं जे म्हणतात, तें अगदी खरें आहे. कारण, प्राक्तनानें ठरलेले हे भक्ष्य आज मला पुष्कळ दिवसांनीं आपोआप प्राप्त झाले आहे. प्रायोपवेशनाकरितां अर्थात बसलेल्या ह्या वानरांमध्ये जो जो मरेल तो तो मी भक्षण करून टाकीन. "

ह्याप्रमाणे तो संपाति त्या वानरांना अवलोकन करून आपल्याशीं बोलू लागला असतां, त्या भक्ष्यलुब्ध पक्ष्याचे ते भाषण श्रवण करून अंगद अतिशय खिन्न झाला, आणि हनुमानाला म्हणाला, ' पहा—गृध्ररूपाने हा प्रत्यक्ष यमच वानरांच्या नाशाकरितां येथे प्राप्त झाला आहे. रामाचे ही कार्य आमच्या हातून झाले नाही, आणि राजा सुग्रीवाची आज्ञाही आमच्या हातून शेवटास गेली नाही. अशा प्रकारें, कोणतीही गोष्ट सिद्धीस न जाता वानरांच्या कधी मनातही नसलेली ही विपत्ति एकाएकी प्राप्त झाली आहे. असो; विदेहराजकन्या सीतेचे प्रिय करण्याची इच्छा धरून गृध्रराज जटायूने जे कर्म तिकडे मार्गामध्ये केले, ते सर्व तुम्ही ऐकलेच आहे. मागे आमच्याप्रमाणेच सर्व तिर्यग्योनीतील प्राणी सुद्धा प्राणत्याग करून रामाचे प्रिय करीत असतात. प्रेम आणि दया ह्यांना व्याप्त झालेले प्राणी एकमेकांवर उपकार करीत असतात. ह्यास्तव, त्या रामावर उपकार करण्याकरितां ज्या अर्थी आपण प्रवृत्त झालो आहो, त्या अर्थी आता मनापासून जिवाची आशा सोडा. पूर्वी गृध्रराज जटायूनें जर रामावर उपकार करण्याकरिता आपले प्राण खर्ची घालण्यास मागेपुढे पाहिले नाही, तर ह्या प्रसंगी आपणांला ह्या पक्ष्याच्या हातून मरण येत आहे हेही योग्यच आहे. धर्मवेत्त्या जटायूने प्राणत्याग करून रामाचें प्रिय केले, आणि आपणही त्या रामाकरितां सर्वस्वी थकून जाऊन प्राणत्याग करण्यास उद्युक्त झालो आहों. आपण अरण्ये हिंडलो, परंतु मिथिलराजकन्या सीता आपल्या दृष्टीस पडली नाही; तेव्हां सीतेला अवलोकन करून संग्रामामध्यें रावणाच्या हातून वध पावलेला तो गृध्रराज जटायु सुखी खरा. कारण, तो सुग्रीवाच्या भयांतून मुक्त होऊन रामाच्या अनुग्रहामुळे उत्तम गतीला तरी गेला असेल. जटायूला व त्याचप्रमाणे दशरथ राजाला मृत्यु आल्यामुळे, आणि वैदेहीचा अपहार झाल्यामुळे वानरांवर आज संकट आलें आहे. ह्यांपैकी एखादी गोष्ट जर न होती, तर आपणांवर हे संकट येण्याचें कारणच नव्हतें. सीतेसहवर्तमान रामलक्ष्मणाचें अरण्यामध्यें वास्तव्य, त्याचप्रमाणे रामाच्या बाणाने वालीचा वध, आणि तसाच रामाच्या कोपामुळे सर्व राक्षसांचा वध हा सर्व अनर्थ कैकेयीला दशरथ राजाने वर दिल्यामुळे झाला आहे. "

अंगदाच्या कळले ते दुःखकारक भाषण श्रवण करून, आणि भूमीवर पडलेले ते वानर अवलोकन करून, महाबुद्धिमान गृध्रराज संपाति मनामध्ये एकदम चकित झाला आणि दीन वाणीनें बोलू लागला, माझे मन कंपित करीत करीत, प्राणांपेक्षाही प्रिय असलेल्या त्या माझ्या भ्रात्या जटायूच्या वधाची वार्ता कोण बरें कथन करीत

आहे ? अरे, जनस्थानामध्यें राक्षस रावण आणि गृध्र जटायु ह्यांचें युद्ध झालें तरी कसें! आज बऱ्याच दिवसांनीं हें भ्रात्याचें नांव माझ्या कानीं आलें आहे. पर्वतावरील ह्या दुर्गम प्रदेशापासून तुम्हीं मला खालीं उतरावें अशी माझी इच्छा आहे. गुणग्राही व पराक्रमामुळें प्रशंसेस पात्र असा जो माझा भ्राता, त्याचा वृत्तांत पुष्कळ दिवसांनीं ऐकावयाला सांपडल्यामुळें मी संतुष्ट झालों आहें. तस्मात्, हे वानरश्रेष्ठहो, त्या जनस्थानानवासी भ्रात्या जटायूचा नाश कसा झाला हें ऐकण्याची माझी इच्छा आहे; व त्याचप्रमाणें, गुरुजनांना प्रिय असलेला श्रेष्ठ राम ज्याचा प्रिय पुत्र, तो दशरथ त्या माझ्या भ्रात्याचा सखा कसा हेंही समजून घेण्याची माझी मनीषा आहे. वानरहो, सूर्यकिरणांनीं माझे पंख दग्ध होऊन गेले असल्यामुळें मला उड्डाण करितां येत नाहीं; ह्यास्तव, ह्या पर्वतापासून तुम्हीं मला खालीं उतरावें अशी माझी इच्छा आहे."

## सर्ग सत्तावन्नावा

—:०:—

### अंगदाचें संपातीशीं भाषण.

शोकाच्या योगानें त्या गृध्रराज संपातीचा शब्द जरी खोल गेला होता, तरी, आयास न पडतां वानरमांस भक्षण करितां यावें एतदर्थ हा शोकाकुल झाल्याचें कांहीं ढोंग करीत आहे, अशी शंका येऊन वानरसेनाधिपतींचा त्याच्या भाषणावर विश्वास बसेना. प्रायोपवेशनानें प्राणत्यागाचा निश्चय करून ते वानर बसले असतांना गृध्र दृष्टीस पडतांक्षणीं, "हा आम्हां सर्वांना भक्षण करून टाकील" असा भयंकर विचार त्यांच्या मनामध्यें आला. तथापि. "प्रायोपवेशनाचा निश्चय करून बसलेल्या आम्हांला जर हा भक्षण करून टाकील, तर आमचा मनोरथ लवकरच सिद्धीस जाणार असल्यामुळें आम्ही सर्वस्वी कृतकृत्य होऊं" असा विचार त्यांनीं मनामध्यें आणिला, आणि पर्वताच्या शिखरापासून त्या गृध्राला खालीं उतरवून अंगद त्याला म्हणाला, "हे पक्ष्या, ऋक्षरज म्हणून एक प्रतापी वानराधिपति राजा माझा आजा होता. सुग्रीव आणि वाली हे त्याचे दोन महाबलाढ्य पुत्र होत. माझा पिता वाली पराक्रमानें जगतामध्यें प्रख्यात असा वानरांचा राजा होऊन गेला. पित्याची आज्ञा पाळण्याविषयीं तत्पर असून, धर्ममार्गाचें अवलंबन करणारा जो संपूर्ण जगताचा व इक्ष्वाकुवंशजांचा राजा दशरथपुत्र वैभवशाली राम, तो, भ्राता लक्ष्मण आणि भार्या वैदेही ह्यांसहवर्तमान दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झाला असतां रावणानें त्याची भार्या जनस्थानापासून बलात्कारानें हरण करून नेली. विदेहराजकन्या सीतेला रावण आकाशमार्गानें घेऊन जात आहे असें रामाच्या पित्याचा मित्र जो गृध्रराज जटायु त्यानें अवलोकन केलें. तेव्हां रावणाला विरथ करून त्या गृध्रराजानें मैथिलीलाही भूमीवर ठेवविलें; परंतु युद्ध करितां करितां श्रांत झाल्यामुळें त्या वृद्धाचा संग्रामामध्यें रावणानें वध केला. ह्याप्रमाणें त्या बलाढ्य रावणानें गृध्राचा वध केला असतां रामानें त्याचा और्ध्वदेहिक संस्कारही केला, व त्यामुळें तो गृध्र उत्तम गतीला गेला. तदनंतर, माझ्या सुग्रीव नामक पितृव्यानें रामाशीं सख्य केलें असतां, माझ्या पित्यानें सचिवांसहवर्तमान सुग्रीवाला राज्यांत येण्याची बंदी केली होती ह्यामुळें रामानें त्याचा वध करून सुग्रीवाला राज्याभिषेक केला. ह्याप्रमाणें सुग्रीवाला सर्व वानरश्रेष्ठांचा राजा बनविल्यावर त्यानें आम्हांला सीतेचा शोध लावण्याकरितां बाहेर पाठविलें. ह्याप्रमाणें रामाची आज्ञा आम्हांला झाली असतां आम्ही ठिकठिकाणीं विदेहराजकन्या सीतेचा शोध करूं लागलों; परंतु रात्रौ ज्याप्रमाणें कितीही शोध केला असतां सूर्याची प्रभा सांपडत नाहीं, त्याचप्रमाणें विदेहराजकन्या सी-

तेचा आम्हांला शोध लागत नाहीं. प्रथमतः मोठ्या दक्षतेनें राहून आम्हीं दंडकारण्य शोधिलें, आणि गैरमाहितीमुळें आम्ही पृथ्वीच्या एका आच्छादित असलेल्या विवरामध्यें प्रविष्ट झालों. मायेच्या योगानें निर्माण केलेलें तें मयासुराचें विवर होतें, आणि तें शोधितां शोधितांच राजानें आम्हांला दिलेली महिन्याची मुदत तेथें संपून गेली. तात्पर्य, वानरराज सुग्रीवाच्या वचनाप्रमाणें वागणाऱ्या आमच्या हातून त्यानें केलेली मुदत टळून गेल्याकारणानें, आम्ही सर्व त्याच्या भीतीमुळें प्रायोपवेशन करण्याचा निश्चय करून येथें बसलों आहों. कारण, तो सुग्रीव आणि लक्ष्मणासहवर्तमान ककुत्स्थकुलोत्पन्न राम मुदत टळल्यामुळे क्रुद्ध झाले असतां, तेथें जरी आम्ही गेलों तरी आमच्यापैकीं कोणीही जिवंत राहणार नाहीं."

## सर्ग अठ्ठावन्नावा.

—:०:—

### संपातीचें भाषण.

ह्याप्रमाणें जीविताची आशा सोडून वानरांनीं दीन वाणीनें भाषण केलें असतां, प्रचंड स्वरानें युक्त असलेला तो गृध्र डोळ्यांत अश्रु आणून म्हणाला, "वानरहो, बलाढ्य रावणानें युद्धामध्यें ज्याचा वध केला म्हणून तुम्ही सांगत आहां, तो जटायु माझा कनिष्ठ भ्राता होय. मी वृद्ध व पक्षहीन झालों असल्यामुळें, हें दुःसह वृत्त कानावर येत असूनही मला तें सहन करणें भाग पडत आहे; कारण, भ्रात्याच्या वैराची फेड करण्याला आज माझी शक्ति नाहीं. पूर्वीं वृत्रासुराचा इंद्रानें वध केला असतां आम्ही उभयतां त्याला जिंकण्याची इच्छा धरून किरणसमुदायांनीं युक्त असलेल्या सूर्याचे समीप गेलों. आकाशमार्गानें वेगावेगानें आम्ही वर जाऊन इंद्राला अगदीं घेरून टाकिलें. परंतु उड्डाण करितां करितां, सूर्य मध्याह्नीं आल्यामुळें जटायूचा धीर सुटूं लागला. तेव्हां सूर्यकिरणांनीं दग्ध होऊन जाण्याची पाळी आल्यामुळें अत्यंत विव्हल झालेल्या त्या भ्रात्याला अवलोकन करून मी आपल्या पक्षांनीं त्याच्यावर छाया केली. ह्यामुळें माझे पंख जळून जाऊन मीं विंध्यपर्वतावर पडलों; तेव्हांपासून मी ह्या पर्वतावर वास्तव्य करीत आहें, आणि तेव्हांपासून माझ्या जटायु भ्रात्याची हकीकत कांहींएक मला समजली नाहीं."

ह्याप्रमाणें संपातीनें सांगितलें असतां महाबुद्धिमान युवराज अंगद त्याला म्हणाला, "तूं जर जटायूचा भ्राता आहेस, तर मी जें कांहीं बोललों हें तूं ऐकिलेंच आहेस. तेव्हां त्या राक्षसाचें वसतिस्थान तुला विदित असेल तर तूं आम्हांला सांग. अदूरदर्शी राक्षसाधम रावण जवळ अथवा दूर असल्याचें जर तूं जाणीत असशील, तर आम्हांला सांग."

तो जटायूचा महातेजस्वी ज्येष्ठ भ्राता अंगदाचें हें भाषण श्रवण करून, वानरांना आनंदित करीत करीत स्वतःला योग्य असें भाषण त्यांच्याशीं करूं लागला; तो म्हणाला, "वानरहो, माझे पंख जळून गेल्याकारणानें मी आतां वीर्यहीन झालों आहें. तथापि वाणीनेंही मी रामाला उत्कृष्ट साहाय्य करीन. वारुणलोक, विष्णूनें त्रिविक्रमावतारीं व्याप्त केलेले पृथ्वीप्रभृति लोक, देवदैत्यांचीं युद्धें आणि अमृताकरितां झालेलें समुद्रमंथन हें सर्व मी जाणीत आहें. रामाचें जर हें कार्य असेल, तर तें मी प्रथमच करणें अवश्य आहे; परंतु जरेच्या योगानें माझें तेज नाहींसें झालें असून सांप्रत माझे प्राणही व्याकुल झाले आहेत. सर्व अलंकारांनीं भूषित व सौंदर्यसंपन्न अशी एक तरुण स्त्री दुरात्मा रावण घेऊन जात असतांना मीं पाहिली आहे. ती स्त्री "रामा, रामा, लक्ष्मणा" असा आक्रोश करीत होती, आणि सुटण्याकरितां तडफड करीत असून आ-

पत्न्या शरीरावरील भूषणें खालीं टाकीत होती. पर्वताच्या शिखरावर ज्याप्रमाणें सूर्याची प्रभा दिसत असते, अथवा आकाशामध्यें मेघपटलाचे ठिकाणीं ज्याप्रमाणें विद्युल्लता झळकत असते, त्याप्रमाणें त्या उत्कृष्ट राक्षसाचे ठिकाणीं तिची पिंवळी पैठणी झळकत होती. रामनामाचा उच्चार तिच्या मुखांतून चालला असल्यामुळें तीच जनककन्या असावी असें मला वाटतें. असो. आतां त्या राक्षसाचें वसतिस्थान मी सांगतों तें श्रवण करा. विश्रवस् मुनींचा प्रत्यक्ष पुत्र आणि कुबेराचा भ्राता रावण नामक राक्षस लंका नगरीमध्यें रहात आहे. येथून तब्बल शंभर योजनांवर समुद्रांतील बेटामध्यें विश्वकर्म्यानें निर्माण केलेली ती लंका नामक रम्य नगरी आहे. सुवर्णाचीं द्वारें, आणि सुवर्णाच्या जोत्यांनी युक्त असलेले मोठमोठे सुवर्णाचे अद्भुत वाडे ह्यांच्या योगानें तिला चांगली शोभा आणिलेली आहे, आणि सूर्यासारख्या तेजस्वी प्रचंड कोटानें ती युक्त आहे. त्या लंकेमध्यें पैठणी नेसलेली विदेहराजकन्या सीता दीन होऊन वास्तव्य करीत आहे. रावणाच्या अंतःपुरामध्यें तिला अडकवून ठेविली असून राक्षसींनीं तिचें चांगल्या प्रकारें रक्षण केलें आहे. तस्मात्, राजा जनकाची कन्या जी मैथिली, ती त्या लंका नगरीमध्यें तुमच्या दृष्टीस पडेल. ज्ञानाच्याच योगानें मी तिला अवलोकन करीत आहें, व तुम्हीही तिला पाहून परत या. असो. आकाशामध्यें, चिमण्या व इतरही जे कांहीं धान्यावर उपजीविका करणारे पक्षी आहेत, ते पहिल्या मार्गांत संचार करीत असतात; कावळे आणि वृक्षांच्या फलांवर उपजीविका करणारे पक्षी दुसऱ्या मार्गामध्यें हिंडत असतात; क्रौंच, कुरर आणि भास हे पक्षी तिसऱ्या मार्गामध्यें उड्डाण करीत असतात; श्येन पक्षी चौथ्या मार्गाचें अवलंबन करीत असतात; गृध्र पक्षी पांचव्या मार्गामध्यें गमन करीत असतात; बल, वीर्य, रूप आणि यौवन ह्यांनीं संपन्न असलेल्या हंसांचा सहावा मार्ग होय; विनतापुत्र गरुडाची गति त्यांच्याहीपेक्षां पलीकडे आहे; आणि, वानरश्रेष्ठहो, विनतापुत्र अरुणापासूनच आम्हां सर्वांची उत्पत्ति झाली आहे. असो. ज्या रावणानें हें निंद्य कर्म करून माझ्या भ्रात्याचा वध केला, त्या राक्षसाचा भ्रात्याकरितां मी आपला सूड तुमच्या द्वारानें लवकरच उगवून घेईन. मला येथून रावण व जनककन्या सीता दिसत आहे. आम्हांला चक्षुष्मती विद्येनें प्राप्त होणारें दिव्य दृष्टिसामर्थ्य आहे, आणि त्यामुळें आहाराच्या सामर्थ्यानें व जातिधर्मानें आम्हांला नेहमीं शंभर योजनांपेक्षाही लांबची वस्तु दृष्टीस पडत असते. जातिधर्मानेंच आमची उपजीविका लांब दिसणाऱ्या भक्ष्यावर ठरलेली आहे, आणि कुक्कुटादिकांची उपजीविका वसतिस्थानभूत वृक्षांचे समीपच विधात्यानें ठरवून टाकिलेली आहे. असो; क्षारजलानें युक्त असलेल्या समुद्राच्या उल्लंघनाविषयीं कांहीं उपाय शोधून काढा, आणि सीतेची भेट झाल्यावर कृतकृत्य होऊन तुम्ही परत चालते व्हा. तुम्हीं मला वरुणालय समुद्राकडे घेऊन जावें अशी माझी इच्छा आहे. कारण स्वर्गाला गेलेल्या महात्म्या भ्रात्याला उद्देशून तर्पण करण्याचा माझा विचार आहे."

ह्याप्रमाणें संपातीनें सांगितलें असतां, त्या महाबलाढ्य वानरांनीं पंख जळून गेलेल्या त्या संपातीला समुद्रतीरीं त्यानें सांगितलेल्या प्रदेशावर नेऊन ठेविलें; आणि सीतेची बातमी लागल्यामुळें ते वानर आनंदित झाले.

## सर्ग एकुणसाठावा.

—:०:—

### सीताहरणवृत्तकथन.

तदनंतर, अमृताप्रमाणें मधुर असलेलें तें गृध्रराजाचें भाषण श्रवण करून ते वानरश्रेष्ठ आनं-

दित झाले, आणि तेच बोलूं लागले: वानरश्रेष्ठ जांबवान् इतर सर्व वानरांसहवर्तमान भूतलावरून एकदम उडी मारून गृध्रराज संपातीला म्हणाला, " सीता कोठें आहे, तिला कोणीं पाहिलें आहे, व तिला कोण हरण करून नेत आहे, हें सर्व तूं आम्हांला सांग आणि आम्हां वानरांना जीवदान दे. अरे, वज्राप्रमाणें वेगावेगानें पडणाऱ्या दशरथपुत्र रामाच्या बाणांचें आणि त्याचप्रमाणें स्वतः लक्ष्मणानें सोडलेल्या बाणांचें सामर्थ्य कोण बरें लक्ष्यांत आणीत नाहीं ?"

ह्यानंतर, प्रायोपवेशनाचा बेत रहित केलेल्या, आणि सीतेची वार्ता कानीं पडल्यामुळें मनामध्यें स्वस्थ झालेल्या वानरांना पुनरपि धीर देण्याकरितां तो गृध्रराज संतुष्ट होऊन म्हणाला, " विदेहराजकन्या सीता रावणानें हरण करून नेल्याचें मीं कसें ऐकिलें, मला तें कोणीं सांगितलें, आणि दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेली ती सीता कोठें आहे हें तुम्ही श्रवण करा. अनेक योजनें लांब असलेल्या ह्या दुर्गम पर्वतावर शक्तीचा व पराक्रमाचा ऱ्हास होऊन मी वृद्ध पडल्याला पुष्कळ दिवस झाले. ह्याप्रमाणें अवस्था मला प्राप्त झाली असतांना, सुपार्श्व म्हणून प्रसिद्ध असलेला एक श्रेष्ठ पक्षी वेळोवेळीं आहाराच्या योगानें माझें पोषण करीत असे. गंधर्वांची कामवासना, सर्पांचा कोप, आणि मृगांचें भय ज्याप्रमाणें तीक्ष्ण असतें, त्याचप्रमाणें आम्हां गृध्र पक्ष्यांची क्षुधा तीक्ष्ण असते. एकदा क्षुधेनें व्याकुल होऊन मी आहाराची वाट पहात असतां, सूर्योदयसमयीं भक्ष्य आणण्याकरितां गेलेला तो माझा पुत्र सायंकाळीं मांस न आणितां रिकाम्या हातींच परत आला. तेव्हां भक्ष्य न मिळाल्यामुळें मीं त्याला बोलून बोलून बरेंच दुःख दिलें. त्या वेळीं तो आनंदवर्धक माझी क्षमा मागून खरें खरें माझ्याशी बोलूं लागला: तो म्हणाला, ' संपाते, मांसाकरितां मी वेळेवर आकाशामध्यें उड्डाण केलें होतें, आणि महेंद्र पर्वताचें द्वार रोखून मी स्वस्थ राहिलों होतों. सागरासमीप संचार करणाऱ्या हजारों प्राण्यांचा मार्ग रोखण्याचा निश्चय करून मी एकटा अधोमुख होऊन बसलों होतों; इतक्यांत, उदयकालच्या सूर्याप्रमाणें जिची प्रभा आहे, अशी एक स्त्री घेऊन कज्जलपर्वताप्रमाणें दिसणारा कोणी एक पुरुष जातांना माझ्या दृष्टीस पडला. तेव्हां त्या उभयतांना अवलोकन करितांक्षणीं, ह्यांनाच तियाच्या आहाराकरितां घेऊन जावें असा मीं निश्चय केला; परंतु त्यानें नम्र होऊन दीन वाणीनें 'मार्ग दे' म्हणून माझी प्रार्थना केल्यामुळें मीं त्याला सोडून दिलें. कारण, गरिबीनें वागणाऱ्यांचा घात करणारा नीचांमध्येंही कोणी ह्या जगतांत सांपडणार नाहीं; मग माझ्यासारख्याची गोष्ट कशाला पाहिजे ? असो. मीं सोडून दिल्यावर, तेजानें आकाश व्याप्त करीतच कीं काय तो पुरुष सत्वर चालता झाला. तो गेल्यानंतर, आकाशामध्यें संचार करणाऱ्या सिद्धचारणादिकांनीं माझ्यासमीप येऊन त्या उभयतांना जीवदान दिल्याबद्दल माझी प्रशंसा केली: ते म्हणाले, "सीता तुझ्या हातून जिवंत राहिली हें फारच चांगलें झालें, व कसा तरी रावण रामभार्येसहवर्तमान जिवंत निघून गेला ह्याबद्दल तुझें निःसंशय कल्याण होईल." ह्याप्रमाणें त्या परमश्रेष्ठ सिद्धांनीं मला सांगितलें, आणि स्त्रीला घेऊन जाणारा तो राक्षसांचा राजा रावण होता असें मला कळविलें. त्या वेळीं दशरथपुत्र रामाची भार्या सीता शोकावेगानें व्याकुल झालेली होती, तिच्या शरिरावरील भूषणें वस्त्रांसहवर्तमान अस्ताव्यस्त झालेलीं होतीं, आणि तिचे केंस मोकळे सुटले असून रामलक्ष्मणांच्या नांवानें ती आक्रोश करीत चालली होती. हें पहाण्यांत गुंतल्यामुळें मला येण्याला इतका उशीर झाला, आणि रिकाम्या हातीं परत येण्याचें कारण तरी हेंच.' "

गृध्रराज संपाति पुढें सांगतो:—ह्याप्रमाणें, वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या सुपार्श्वानें हा सर्व वृत्तांत मला निवेदन केला; परंतु तो ऐकूनही पराक्रम गाजविण्याविषयीं माझ्या मनांत कांहीं-एक विचार आला नाहीं. कारण, पंख नाहीतसे झालेला पक्षी कांहीं पराक्रमाचें कृत्य करण्यास प्रवृत्त होणार कसा? वाणी आणि बुद्धि ह्यांच्या गुणांवर अवलंबून असलेल्या माझ्या हातून जें होणें शक्य आहे, तें तुम्ही श्रवण करा. तें होणें तुमच्या पराक्रमावर अवलंबून आहे. मी फक्त वाणी व मति ह्यांच्या योगानें तुम्हां सर्वांचें प्रिय करीन. दशरथपुत्र रामाचें जें कार्य आहे, ते माझेंच आहे ह्याबद्दल संशय नाहीं. शिवाय, वानरराज सुग्रीवानें पाठविलेले तुम्ही बुद्धीनें श्रेष्ठ, बलाढ्य व विचारी असून देवांनाही अजिंक्य आहां, आणि कंक पक्ष्यांच्या पंखांनीं युक्त असलेले रामलक्ष्मणांचे धनुष्यापासून सुटलेले बाण त्रैलोक्याचें रक्षण व निग्रह करण्यास समर्थ आहेत. तेव्हां दशकंठ रावण जरी तेजस्वी व बलाढ्य आहे, तरी तुम्हां समर्थांना कांहींच कठिण नाहीं. तस्मात्, आतां कालविलंब पुरे; सीतेचा शोध लावण्याविषयी तुम्ही आपल्या मनाचा निश्चय करा. अरे, तुमच्यासारखे बुद्धिमान पुरुष योग्य कृत्यांना आळस करीत नाहींत.

## सर्ग साठावा.

—:०:—

### संपातीचें पूर्ववृत्त.

तदनंतर, स्नान करून व भ्रात्याच्या नांवानें पाणी सोडून, तो संपाति गृध्र रमणीय पर्वतावर बसला असतां वानरसेनाधिपति त्याच्या सभोंवतीं गराडा देऊन बसले. तेव्हां त्या सर्व वानरांनी परिवेष्टित असलेला अंगद तेथें बसला असतांना, विश्वास आल्यामुळें संपाति आनंदानें पुनरपि त्याला म्हणाला:—कांहींएक गडबड न करितां वानरांनीं माझें म्हणणें ऐकून घ्यावें. मिथिलराजकन्या सीतेचा पत्ता मला कसा लागला हें मी खरें खरें सांगतों: हे निष्पापा अंगदा, सूर्याच्या तापानें व्याकुल होऊन सूर्यकिरणांनीं दग्ध झाल्यामुळें पूर्वी मी ह्या विंध्यपर्वताच्या शिखरावर पडलों. अगदीं मूर्च्छित होऊन मी विवळत पडलों असतां सहा दिवसांनंतर मी शुद्धीवर आलों, आणि चोहोंकडे पाहूं लागलों तों माझ्या कांहींच ओळखीचें दिसेना. तदनंतर सागर, पर्वत, सर्व नद्या, सरोवरें, वनें आणि प्रदेश अवलोकन केल्यावर माझी मति चालूं लागली, आणि आनंदित पक्षिसमुदायांनीं व्याप्त, गुहा व शिखरें ह्यांनीं युक्त, आणि दक्षिण समुद्राच्या तीरीं असलेला हा विंध्याद्रि अशी माझी खात्री झाली. ह्या ठिकाणीं, देवांनाही अत्यंत पूज्य असा एक पवित्र आश्रम होता, व त्या आश्रमामध्यें उग्र तपश्चर्या करणारा एक निशाकर नामक ऋषि रहात असे. तो धर्मज्ञ निशाकर स्वर्गाला गेल्यानंतर, त्या ऋषीवाचून ह्या पर्वतावर वास्तव्य करीत असतांना माझीं आठ हजार वर्षे लोटलीं. मी येथें येऊन पडल्यानंतर मोठ्या सकष्टानें व दुःखानें हळू हळू विंध्यशिखरापासून खालीं उतरून तीक्ष्णाग्र दर्भांनीं युक्त असलेल्या पृथ्वीवर पुनरपि येऊन पोहोंचलों. अत्यंत दुःखित झालेल्या मला त्या ऋषींचें दर्शन घेण्याची इच्छा प्राप्त झाली होती. कारण, जटायूनें व मी त्याची पुष्कळ वेळां सेवा केलेली होती. त्यांच्या आश्रमस्थानासमीप सुगंधि वायु वहात असत, आणि पुष्परहित अथवा फलरहित असा एकही वृक्ष तेथें दृष्टीस पडत नसे. असो. त्या पवित्र आश्रमासमीप मी एका वृक्षाखालीं भगवान निशाकर मुनींच्या दर्शनाची वाट पहात बसलों. तेव्हां उज्ज्वल तेजानें युक्त असे ते ऋषि स्नान करून व उत्तरेकडे तोंड करून वळलेले मी दूर अवलोकन केले. ते ऋषि फारच तेजस्वी असल्यामुळें अनोळखी प्राण्यानें

त्यांच्यासमोर जाणेंही अशक्य होतें. तथापि, उदार पुरुषाचे भोंवतीं गराडा देऊन ज्याप्रमाणे याचक लोक जात असतात, त्याचप्रमाणे ऋक्ष, सूमर, व्याघ्र, सिंह आणि नानाप्रकारचे सर्प त्याला गराडा देऊन चालले होते. तदनंतर, राजा राजवाड्यामध्यें प्रविष्ट झाला असतां ज्याप्रमाणें अमात्यांसहवर्तमान सर्व सैन्य परत फिरतें, त्याप्रमाणें ते निशाकर ऋषि आश्रमांत प्रविष्ट होताच सर्व प्राणी परत गेले. येतां येतां मला अवलोकन करितांक्षणीं ते ऋषि संतुष्ट होऊन आश्रमामध्यें गेले; परंतु एका क्षणांत पुनरपि बाहेर येऊन मला त्यांनीं कार्याविषयीं प्रश्न केला. ते म्हणाले, "हे विनयसंपन्न गृध्रा, केंस विकल झालेले पाहिल्यावर तुझी एकाएकीं ओळख पटत नाहीं. तुझे पंख अग्नीनें दग्ध झालेले असून तुझे प्राणही दग्ध झाल्यासारखेच झाले आहेत. वेगामध्यें वायूची बरोबरी करणारे असे दोन सामान्य गृध्रच नव्हत—परंतु यथेष्ट रूप धारण करणारे व उभयतां भ्राते असलेले गृध्रांचे राजे पूर्वी माझ्या अवलोकनांत होते. संपाते, त्यांतील तूं ज्येष्ठ आहेस हें मीं ओळखिलें. जटायु हा तुझा कनिष्ठ भ्राता होय. तुम्ही मनुष्यरूप धारण करून माझे पाय धरीत होतां. तुला काय व्याधि उत्पन्न झाली आहे, तुझे पंख कशानें झडले आहेत, अथवा हा कोणीं प्रहारच तुझ्यावर केला आहे कीं काय, हे सर्व तूं मला कथन कर."

## सर्ग एकसष्टावा.

—:०:—

### संपातीचें पूर्ववृत्त. (पुढें चालू.)

तदनंतर, इंद्रासहवर्तमान युद्ध करणें हें जें दुष्कर व भयंकर कर्म अविचारामुळे झालें होतें तें, आणि त्याचप्रमाणें सूर्यासमीप जाणें, हें सर्व कृत्य मी त्या मुनींना कथन केलें. मीं म्हटलें, "भगवन्, इंद्राशीं झालेल्या युद्धामध्यें वज्रप्रहारानें मला जखमा लागल्यामुळें मी थकून गेलों आहें; आणि पंख नाहींतसे होण्यासारखें अनुचित कर्म केल्याची लाज वाटत असल्यामुळें माझ्या मनाला कांहीं सुचेनासें झालें आहे. ह्या कारणामुळें, जरी मी कांहीं भाषण करण्यास समर्थ नाहीं, तरी कांहीं कांहीं सांगतों. मी व जटायु गर्वानें मोहित होऊन स्पर्धेनें आकाशामध्यें गेलों, आणि 'जो लांब उडून जाईल तो श्रेष्ठ' असा पण लावून आपलें सामर्थ्य किती आहे हें पाहूं लागलों. कैलास पर्वताच्या शिखरावर, सूर्य अस्ताचलाला जाण्याचे पूर्वीच त्याला गाठावयाचें, असा मुनींच्या समक्ष पण करून आम्हीं एकदम आकाशामध्यें उड्डाण केलें असतां, भूतलावरील वेगवेगळीं नगरें रथाच्या चाकांप्रमाणें आम्हांला दिसूं लागलीं; आणि वर वर जातांना कोठें वाद्यांचा घोष, व कोठें भूषणाचा ध्वनि कानीं पडूं लागला असून, कोठें कोठें रक्त वस्त्र परिधान केलेल्या पुष्कळ स्त्रिया गात असतांना आम्हीं अवलोकन केल्या. एकदम आकाशामध्यें उडून सूर्यमंडलासमीप आम्ही जाऊं लागलों असतां, गवतानें भरलेलें वन जसें दिसतें, तसें देशांनीं भरलेलें भूतल आम्हांला दिसूं लागलें. सारांश, भूतलावरील प्रदेश तृणासारखे आम्हांला सूक्ष्म दिसूं लागले. पर्वतांनीं आच्छादित असलेली ही भूमि लहान लहान धोंड्यांनीं आच्छादित झाल्यासारखी दिसूं लागली, आणि त्याचप्रमाणें पृथ्वी वास्तविक नद्यांनीं व्याप्त झाली असतांना ती सुतांनीं व्याप्त झाल्यासारखी दिसूं लागली. हिमालय, विंध्य आणि सर्वांत मोठा असा मेरु पर्वत हे सर्व, जलाशयामध्यें क्रीडा करीत असलेल्या गजांप्रमाणें दिसूं लागले. वर जातां जातां, मध्याह्नसमय आला असतां आम्हांला फारच उष्मा भासूं लागला, आम्हीं अतिशय थकून गेलों, भयही अतिच वाटूं लागलें, पूर्व कोणती व पश्चिम कोणती हें

कांहींएक समजेनासें झालें, आणि नंतर मूर्च्छाही आली. दक्षिण दिशा कोणती तें समजेना, आग्नेय कोणती हें ओळखू येईना, आणि पश्चिम कोणती ह्याचीही अटकळ होईना; सारांश, जगताचा दाह प्रलयकालीं व्हावयाचा हें जरी ठरलेलें आहे, तरी जगत् अग्नीनें दग्ध झाल्याचा आम्हांला तेव्हां अनुभव येऊं लागला. माझ्या मनाला तर कांहींच सुचेनासें झालें, आणि मनाचाच आधार असा डळमळीत झाल्यावर दृष्टीचीही गति खुंटली; तथापि मोठ्या यत्नानें ह्या सूर्यसंबंधानें मन व दृष्टि स्थिर करण्याचा आम्हीं यत्न केला, व आणखी एकदा पाहिलें, तों सूर्य आम्हांला पृथ्वीएवढा मोठा दिसूं लागला. जटायु मला कांहींएक न सांगतां भूमीवर पडला, आणि तो पडल्याचें अवलोकन करितांक्षणीं मींही त्याच्या रक्षणाकरितां पंख पसरून आपलें अंग सोडून दिलें. जटायूचें मीं पंखांनीं रक्षण केलें असल्यामुळें तो दग्ध झाला नाहीं; परंतु आकाशांतून पडतां पडतां निष्काळजीपणामुळें मी मात्र दग्ध होऊन गेलों. जटायु जनस्थानामध्यें पडला असावा असा माझा अदमास आहे. मी तर पंख जळून गेल्यामुळें ह्या विंध्यपर्वतावर जड गोळा होऊन पडलों. सांप्रत मी राज्यापासून भ्रष्ट झालों असून भ्रात्याचा मला वियोग झाला आहे, आणि पंख नाहींतसे झाले असून माझे ठिकाणीं पराक्रमही राहिलेला नाहीं. ह्यास्तव, सर्वथा मरणाचीच इच्छा धरून मी ह्या पर्वतशिखरावरून खालीं उडी घेतों."

## सर्ग बासष्टावा.

—:०:—

### संपातीचें पूर्ववृत्त.

( पुराणकथा. )

संपाति पुढें सांगतो:—ह्याप्रमाणें, अत्यंत दुःखित होऊन मी त्या मुनिश्रेष्ठांना सांगितलें, व मी रोदन करूं लागलों. तेव्हां क्षणभर विचार करून भगवान निशाकर मुनि मला म्हणाले, "तुला मुख्य पक्ष व उपपक्ष पुनरपि दुसरे फुटतील, आणि त्याचप्रमाणें चक्षु, प्राण, पराक्रम व बल हीं ही तुझीं उत्कृष्ट होतील. पुराणामध्यें पुढें होणारें एक फारच मोठें कार्य मीं श्रवण केलें आहे; आणि ज्याप्रमाणें पुराणांत श्रवण करून तें कार्य मला विदित झालें आहे, त्याप्रमाणें तपश्चर्येच्या योगानेंही तें मीं अवलोकन केलें आहे. इक्ष्वाकुकुलाची कीर्ति वृद्धिंगत करणारा कोणी दशरथ म्हणून राजा होईल, आणि त्याला राम ह्या नांवाचा महातेजस्वी पुत्र होईल. तो अमोघपराक्रमी राम पित्याची आज्ञा झाल्यावरून भार्या सीता व भ्राता लक्ष्मण यांसहवर्तमान अरण्यामध्यें जाईल.देवदानवांना अवध्य आणि राक्षसांचा अधिपति असा रावण नामक राक्षस त्याची भार्या जनस्थानांतून हरण करून नेईल, आणि घरीं नेल्यानंतर भोग्य वस्तु, भक्ष्य आणि भोज्य पदार्थ ह्यांच्या योगानें तो तिचें मन वळविण्याचाही प्रयत्न करील. तथापि, दुःखामध्यें मग्न झालेली ती महाभाग्यवती यशस्विनी रामपत्नी कांहींएक खाणार नाहीं. तदनंतर, विदेहराजकन्या सीता क्षुधित आहे असें जाणून अमृततुल्य आणि देवांनाही दुर्लभ असें परमान्नसंज्ञक अन्न इंद्र तिला देईल. इंद्रापासून हें प्राप्त झालें असें समजून सीता तें अन्न स्वीकारील, आणि प्रथमतः त्यांतील कांहीं अंश काढून रामाच्या उद्देशानें ती भूतलावर अर्पण करील; व तें भूतलावर अर्पण करितांना, 'माझा भर्ता आणि देवर लक्ष्मण जर जिवंत असतील, किंवा देवत्व पावले असतील, तर त्यांना हें अन्न प्राप्त होवो' असें ती म्हणेल. येथें सीतेच्या शोधाकरितां पाठविलेले रामदूत वानर येतील. त्यांना रामपत्नी सीता कोठें आहे तें तूं निवेदन कर. सारांश, कांहीं जरी झालें, तरी तुला येथून जातां

उपयोगीं नाहीं. तूं अशा प्रकारचा असतांना कोठें जाशील? देश आणि काल ह्यांची तूं वाट पहा, म्हणजे आपोआप तुला पंख प्राप्त होतील. तुला आजच्या आजच पक्षयुक्त करण्याचा माझा उद्देश आहे; परंतु पक्ष प्राप्त झाल्यावर तूं हें स्थान सोडून जाण्याचा संभव असल्यामुळें, कदाचित् देवकार्य तुझ्या हातून होणार नाहीं. ह्यास्तव, सांप्रत मी तसें करीत नाहीं. तूं येथें राहूनच लोकांना हितावह असें कृत्य करशील. तें कार्य साधारण लोकांचेंच नसून श्रेष्ठ ब्राम्हण, मुनि, इंद्र आणि ते राजकुमार रामलक्ष्मण ह्यांचेही आहे, आणि तें तुझ्या हातून होण्यास योग्य आहे. त्या रामलक्ष्मणांना अवलोकन करण्याची माझीही इच्छा आहे; परंतु इतका दीर्घ काल लोटेपर्यंत प्राण धारण करून राहण्याची माझी इच्छा नाहीं; म्हणून मी आतां लवकरच ह्या देहाचा त्याग करीन."

## सर्ग त्रेसष्टावा.

—:०:—

### वानरांचें समुद्रतीरीं गमन.

संपाति सांगतो:—वानरहो, ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या पुष्कळ वाक्यांनीं माझी प्रशंसा करून, आणि मला निरोप देऊन, भगवान निशाकर मुनि आपल्या निवासस्थानामध्यें प्रविष्ट झाले. नंतर मी हळू हळू पर्वताच्या गुहेपासून बाहेर निघालों, आणि विंध्याचलाच्या शिखरावर आरूढ होऊन तुमची वाट पहात बसलों. आज त्या गोष्टीला शेंकडों वर्षें लोटून गेलीं आहेत; आणि तेव्हांपासून मी त्या मुनींचें वचन मनांत धरून तुम्ही केव्हां व कोठें दृष्टीस पडतां ह्याची वाट पहात बसलों आहें. महाप्रस्थानाचें अवलंबन करून निशाकर मुनि स्वर्गाला चालते झाल्यानंतर, अनेक विचारांनीं व्याप्त झालेल्या माझ्या अंगाचा एकसारखा संतापामुळें दाह होत आहे; आणि प्राण देण्याचा जो विचार माझ्या मनांत आला होता, तो त्या मुनींच्या शब्दावरून मी रहित करून बसलों आहें. अग्नीची उज्ज्वल ज्वाला ज्याप्रमाणें अंधकाराचा नाश करिते, त्याप्रमाणें माझ्या प्राणरक्षणाकरितां त्या महर्षींनीं जी मला बुद्धि दिली ती माझ्या दुःखाचा परिहार करीत आहे. दुरात्म्या रावणाचें सामर्थ्य माझ्या पुत्राच्या सामर्थ्यापेक्षां कमी आहे हें मला ठाऊक असल्यामुळें, 'तूं मैथिलीचें रक्षण कसें केलें नाहींस?' म्हणून मी पुत्राची चांगलीच खरडपट्टी काढिली तथापि "रामा, रामा, लक्ष्मणा," अशा प्रकारचा तिचा विलाप श्रवण करून, आणि अर्थातच सीतेचा त्यांना वियोग झाला आहे असें ऐकून, दशरथाचे ठिकाणीं असलेल्या प्रेमामुळें मला प्रिय अशी जी अवश्य कर्तव्य गोष्ट ती माझ्या पुत्रानें केली नाहीं.

ह्याप्रमाणें एकत्र जमलेल्या वानरांसहवर्तमान तो संपाति भाषण करीत असतांना त्या वानरांसमक्ष त्याला पंख फुटले. तेव्हां आपलें शरीर नूतन फुटलेल्या अरुणवर्ण पक्षांनीं युक्त झालें आहे असें अवलोकन करून त्या संपातीला अनुपम हर्ष झाला, आणि तो वानरांना म्हणाला, "अपरिमित सामर्थ्यवान निशाकर ऋषींच्या प्रसादानें, सूर्यकिरणांनीं दग्ध झालेले पंख मला पुनरपि फुटले. त्यामुळें. यौवनावस्थेमध्यें असतांना माझ्या ठिकाणीं जो पराक्रम वसत होता, तोच पराक्रम व सामर्थ्य आज मला प्राप्त झालें आहे असें मला वाटतें; ह्यास्तव, तुम्ही सर्व प्रकारें यत्न करा, म्हणजे सीतेचा शोध लागेल. कारण, ज्या गोष्टी निशाकर महर्षींनीं सांगितल्या, त्यांपैकीं, मला पंखांचा लाभ झाला ही गोष्ट, तुमचा प्रयत्न सिद्धीस जाईल असा विश्वास तुमचे ठिकाणीं उत्पन्न करण्यासारखी झाली आहे."

ह्याप्रमाणें त्या सर्व वानरांना सांगून, आकाशामध्यें संचार करणारा तो पक्षिश्रेष्ठ संपाति,

आपणाला पूर्वीप्रमाणें गति प्राप्त झाली आहे किंवा नाहीं हे पाहण्याकरितां विंध्याचलाच्या शिखरापसून उडून गेला. तेव्हां त्याचे भाषण श्रवण करून मनामध्यें संतुष्ट झालेले ते वानरश्रेष्ठ, प्रयत्नसाध्य जो सीताप्राप्तिरूप अभ्युदय तो करून घेण्याविषयीं उद्युक्त झाले. सारांश, संपातीचें भाषण श्रवण केल्यानंतर, गतीनें वायूची बरोबरी करणारे आणि त्याच्या भाषणामुळें धैर्य आलेले ते वानरश्रेष्ठ जनककन्येचा शोध लावण्याविषयीं उत्सुक होऊन अभिजित् नक्षत्राचे संमुख असलेल्या दक्षिण दिशेकडे चालते झाले.

## सर्ग चौसष्टावा.

—:०:—

### समुद्रोल्लंघनाविषयीं चिंता.

गृध्रराज संपातीनें सीतेचा वृत्तांत सांगितला असतां आनंदित झालेले ते सिंहासारखे पराक्रमी वानर उड्या मारून एकत्र जुळले, आणि गर्जना करूं लागले; संपातीचें भाषण श्रवण करितांक्षणीं रावणक्षयाचा उद्देश मनांत धरून सीतेच्या दर्शनाची इच्छा करणारे ते वानर आनंदित होऊन समुद्राकडे गेले; आणि त्या सागरतीररूप प्रदेशाला जाऊन पोहोंचल्यानंतर, ज्या ठिकाणीं चंद्रसूर्यप्रभृति ग्रहांसहवर्तमान सर्व द्युलोकाचें[1] पूर्णपणे प्रतिबिंब पडललें असतें, तो समुद्र त्या भयंकर पराक्रमी वानरांनीं अवलोकन केला. नंतर त्या महाबलाढ्य वानरवीरांनीं दाक्षिण समुद्राच्या उत्तर तीरावर तळ दिला. कोठें कोठें लाटा मुळींच नसल्यामुळें तो समुद्र गाढ निद्रिस्थ झाल्यासारखा भासत होता, कोठें कोठें लाटा उसळत असल्यामुळें क्रीडा करीत आहे असा दिसत होता, कोठें कोठें पर्वतप्राय जलतरंगांनीं व्याप्त झालेला दिसत होता, आणि काठें कोठें पातालनिवासी दानवाधिपतींनीं तो गजबजून गेलेला होता. अशा प्रकारें, शरिरावर रोमांच उठविणारा तो समुद्र अवलोकन करितांक्षणीं ते वानरश्रेष्ठ मनामध्यें खिन्न झाले, आणि आकाशाप्रमाणें तो दुस्तर सागर अवलोकन करून खिन्न झालेले ते सर्व वानर एकत्र जुळले, व "पुढें काय करावें" म्हणून एकमेकाशीं बोलूं लागले. तेव्हां समुद्र अवलोकन करितांक्षणीं वानरसेना खिन्न झालेली पाहून, त्या भयभीत झालेल्या वानरांना वानरश्रेष्ठ अंगद धीर देऊं लागला: तो म्हणाला, "तुम्ही खेद करूं नका; खेद हा फार वाईट आहे. कारण, क्रुद्ध झालेला सर्प ज्याप्रमाणें बालकाचा घात करितो, त्याप्रमाणें खेद हा पुरुषाचा घात करितो. पराक्रम करण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां जो पुरुष विचार न करितां खिन्न होऊन बसतो, त्या तेजोहीन पुरुषाचा मनोरथ कधींही सिद्धीस जात नाहीं."

असो; ती रात्र निघून गेल्यानंतर वृद्ध वृद्ध वानरांसहवर्तमान अंगद पुनरपि मसलत करूं लागला. सारांश, मरुद्गणाच्या सैन्यामध्यें बसलेला इंद्रच कीं काय अशा रीतीनें शोभत असलेल्या अंगदाचे भोंवतीं गराडा देऊन वानरांची ती सर्व सेना बसली. कारण, वालिपुत्र अंगद आणि हनुमान ह्यांवाचून ती वानरांची सेना आवरून धरण्याला दुसरा कोण बरें समर्थ झाला असता? असो.

तदनंतर त्या वृद्ध वृद्ध कपींचें आणि त्या सैन्याचें अनुमोदन घेऊन, शत्रूला जेरीस आणणारा वैभवशाली अंगद मुद्देसूद भाषण करूं लागला: तो म्हणाला, "ह्या वेळेस कोण महातेजस्वी वानर समुद्राचे उल्लंघन करील? आणि शत्रुदमन करणाऱ्या सुग्रीवाला सत्यप्रतिज्ञ कोण करील? कोणता बरें वीर शंभर योजनें समुद्र ओलांडून जाईल? आणि ह्या सर्व वानरसेनाधिपतींना मोठ्या भयापासून कोण बरें मुक्त करील?

[1] स्वर्गाचें

येथून मनोरथ परिपूर्ण होऊन परत गेल्यावर कोणाच्या बरें प्रसादामुळें आपण भार्या, पुत्र व गृहें सुखानें अवलोकन करूं? कोणाच्या बरें प्रसादामुळें आम्हांला आनंदानें महाबलाढ्य राम, लक्ष्मण आणि वनचर सुग्रीव यांचे समीप जातां येईल? तुम्हांपैकीं जर कोणी समुद्राचें उल्लंघन करून जाण्याविषयीं समर्थ असेल, तर त्यानें येथल्या येथें आम्हांला सत्वरच पवित्र अशी अभयदक्षिणा द्यावी."

हें अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर कोणी कांहींएक बोलेना. ती सर्व वानरसेना तेथें जशी कांहीं स्तिमित होऊन राहिली. तेव्हां पुनरपि वानरश्रेष्ठ अंगद त्यांना म्हणाला, "तुम्ही सर्वजण बलवानांमध्यें श्रेष्ठ असून महापराक्रमी आहां. इतकेंच नव्हे, परंतु सर्वजण निष्कलंक कुलांमध्यें उत्पन्न झालेले असून पराक्रमासंबधानें तुम्ही सर्व वारंवार प्रशंसेसही पात्र झालां आहां. तात्पर्य, तुम्हांपैकीं कोणाचीही गति कधींही कुंठित होत नाहीं. ह्यास्तव, मार्ग उल्लंघन करून जाण्याविषयीं आपआपल्या सामर्थ्याला अनुसरून तुम्ही काय तें सांगा."

## सर्ग पासष्टावा.

—:०:—

### समुद्रोल्लंघनाविषयीं वाटाघाट.

(वानरसामर्थ्य.)

अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर, ते सर्व वानरश्रेष्ठ गतीसंबंधानें अनुक्रमें आपआपलें सामर्थ्य कथन करूं लागले. गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैंद, द्विविद, अंगद आणि जांबवान् ह्यांनीं आपआपलें सामर्थ्य कथन केलें. पैकीं गज म्हणाला, "मी दहा योजनें उडी मारीन." गवाक्ष म्हणाला, "मी वीस योजनें मारीन." हें ऐकून शरभ वानर तेथें जुळलेल्या वानरांना म्हणाला, "वानरहो, मी तीस योजनें उड्डाण करीन." तदनंतर ऋषभ वानर म्हणाला, "मी एका उडीसरसा चाळीस योजनें निःसंशय जाईन." नंतर महातेजस्वी गंधमादन म्हणाला, "मी पन्नास योजनें उडी मारीन ह्यांत संशय नाहीं." नंतर मैंद म्हणाला, "माझ्या अंगीं साठ योजनें उल्लंघून जाण्याचें सामर्थ्य आहे." तें ऐकून महातेजस्वी द्विविद म्हणाला, "मी सत्तर योजनें उडी मारीन ह्यांत संदेह नाहीं." तेव्हां महातेजस्वी व धैर्यवान वानरश्रेष्ठ सुषेण म्हणाला, "गमनाविषयीं ऐशीं योजनांची तर मी प्रतिज्ञाच करितों."

ह्याप्रमाणें ते वानर सांगत असतांना, त्या सर्वांना अनुमोदन देऊन त्यांतील सर्वांत श्रेष्ठ जांबवान् म्हणाला, "पूर्वी आमच्याही अंगांत बरीच लांब उडी मारण्याचा कांहीं पराक्रम होता; परंतु सांप्रत आमच्या वयाची अगदीं पराकाष्ठा झालेली आहे. असा जरी प्रकार आहे, तरी ज्या कार्याकरितां वानरराज सुग्रीव आणि राम ह्यांचा निश्चय झालेला आहे, त्या ह्या कार्याची उपेक्षा करणें योग्य नाहीं. तस्मात्, सांप्रतकालीं गमनाविषयीं आमचें काय सामर्थ्य आहे हें तुम्ही ऐकून घ्या. मी अद्यापिही नव्वद योजनें उडी मारीन ह्यांत संशय नाहीं."

ह्यानंतर त्या सर्व वानरश्रेष्ठांना जांबवान् पुनरपि म्हणाला, "गमनाविषयीं माझें सामर्थ्य कांहीं एवढेंच नव्हतें. विरोचनपुत्र बलि यज्ञ करण्यास उद्युक्त झाला असतांना, जयशील असा जो विष्णु तो पूर्वी जेव्हां तीन पायांनीं त्रैलोक्य व्याप्त करूं लागला, तेव्हां मीं त्याला प्रदक्षिणा केलेली आहे. परंतु सांप्रत मी वृद्ध झालों असल्यामुळें गमनाविषयीं माझें सामर्थ्य कमी झालें आहे. त्या वेळीं यौवनावस्थेमध्यें माझे ठिकाणीं मोठें अतिम सामर्थ्य होतें. सांप्रत एका उडीसरसा काय तें नव्वद योजनेंच उल्लंघून जाण्याचें

माझें सामर्थ्य आहे; परंतु एवढ्यानें ह्या कार्याची सिद्धि होणार नाहीं."

ह्यानंतर, ज्ञानी अंगद महाकपि जांबवानाचें म्हणणें मान्य करून म्हणाला, "मीही प्रचंड शंभर योजनें उड्डून जाईन; परंतु फिरून परत येण्याला माझे अंगीं सामर्थ्य राहील किंवा नाहीं ह्याची खात्री वाटत नाहीं."

ह्यावर, संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला जांबवान् वानरश्रेष्ठ अंगदाला म्हणाला "हे ऋक्ष-वानरश्रेष्ठा, गमनाविषयीं तुझें सामर्थ्य किती आहे हें मी जाणीत आहें. तूं शंभर अथवा हजार योजनेंही जाऊन परत येण्यास समर्थ आहेस; परंतु असें करणें योग्य नाहीं. कारण, बा अंगदा, दुसऱ्यांना पाठविणारा जो स्वामी, त्यालाच इतरांनीं पाठविणें योग्य नाहीं. हे वानरश्रेष्ठा, हा सर्व वानरसमुदाय तुझा सेवक आहे. स्वामी ह्या नात्यानें असलेला तूं आम्हांला भार्येच्या स्थानीं आहेस. अर्थात्, जिवंत जीव आहे तोंपर्यंत पतीनें ज्याप्रमाणें भार्येचें रक्षण करणें योग्य आहे, त्याप्रमाणें आम्ही सर्व वानरांनीं जिवंत जीव आहे तोंपर्यंत तुझें रक्षण करणें योग्य आहे. हे शत्रुदमना, स्वामी हाच सैन्याचा आधार आहे. तें कार्य सिद्धीस जाण्याला मुख्य आधार तूंच आहेस. तस्मात्, बा अंगदा, भार्येप्रमाणें आम्हांला तुझें सर्वदा रक्षण केलें पाहिजे. कोणत्याही गोष्टीचें मूळ रक्षण करून ठेविलें पाहिजे, असा कार्यवेत्त्या पुरुषांचा न्याय आहे. कारण, मूळ जर कायम असेल, तर इतर सर्व किरकोळ गोष्टी सिद्धीस जातात. तस्मात्, हे अमोघपराक्रमी अंगदा, बुद्धि आणि पराक्रम ह्यांनीं संपन्न असलेला तूंच ह्या कार्यसिद्धीचें साधन व मूळ आहेस. हे वानरश्रेष्ठा, तूं आमचा गुरु असून गुरुपुत्रही आहेस, आणि म्हणूनच तुझा आश्रय धरून आम्ही कोणतीही इष्ट सिद्धीस न्यास समर्थ आहों."

ह्याप्रमाणें महाबुद्धिमान जांबवान अंगदाशीं भाषण करून स्वस्थ बसला असतां, वालिपुत्र अंगदानें त्याला उत्तर केलें, "मी जर गेलों नाहीं, तर समुद्र उल्लंघून जाण्यास समर्थ असा दुसरा कोणीही वानरश्रेष्ठ नाहीं. तेव्हां पुनरपि हें प्रायोपवेशनच आम्हांला करणें भाग येईल. कारण, त्या विचारी वानरराज सुग्रीवाची आज्ञा आपल्या हातून शेवटास गेली नाहीं, तर प्राणांचें रक्षण होण्याचा संभव मला दिसत नाहीं, आणि लंकेमध्यें जरी मी गेलों, तरी पुनरपि परत येण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें प्राणरक्षण होईल असें मला वाटत नाहीं. सारांश, एखाद्यावर कृपा करण्याविषयीं आणि एखाद्यावर अत्यंत क्रुद्ध होण्याविषयीं तो सुग्रीव समर्थ आहे. तेव्हां त्याच्या आज्ञेचें उल्लंघन करून आपण किष्किंधा नगरींत गेलों असतां आपला घात हा होणारच. तात्पर्य, हें समुद्रलंघनरूप कार्य सिद्धीस जाईल अशा रीतीनें, तूंच अनुभवी असल्यामुळें कांहीं उपाय शोधून काढावास हें योग्य आहे."

ह्याप्रमाणें अंगदानें त्या वीर वानरश्रेष्ठ जांबवानाला सांगितलें असतां, जांबवानानें अंगदाशीं उत्कृष्ट भाषण केलें: तो म्हणाला, "हे वीरा, तुझ्या ह्या कार्यांत कांहीं कमी पडणार नाहीं. हें कार्य जो सिद्धीस नेणार आहे, तो हा मी आतांच सांगतों."

ह्याप्रमाणें अंगदाला सांगितल्यानंतर, जिच्यामध्यें अनेक लक्ष वीर आहेत अशी ती खिन्न झालेली वानरसेना अवलोकन करून, उडी मारणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ म्हणून कसोटीला उतरलेल्या, आणि एकांत स्थलाचा आश्रय करून स्वस्थ बसलेल्या वानरश्रेष्ठ हनुमानाशीं वानरवीर जांबवान् भाषण करूं लागला.

# सर्ग सहासष्टावा.

—:०:—

## हनुमंताला प्रेरणा.

( हनुमानाचे जन्मवृत्त. )

जांबवान म्हणाला:—वीरश्रेष्ठा हनुमंता, तूं सर्व शास्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असतांना एकांताचा आश्रय करून स्वस्थ बसला आहेस, आणि वानरांच्या कर्तव्यासबंधानें कांहींच भाषण करीत नाहींस हें काय? अरे, तेज आणि बल ह्यांच्या योगानें तूं वानरराज सुग्रीव आणि रामलक्ष्मण ह्यांची बरोबरी करणारा आहेस. काश्यपाचा पुत्र जो महाबलाढ्य वैतनेय गरुड सर्व पक्ष्यांमध्यें श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणें तू सर्वोत्तम म्हणून विख्यात आहेस. तो महापराक्रमी व महाबलाढ्य गरुड भुजंगांना उचलून सागर ओलांडून जात असतांना मी अनेक वेळां पाहिला आहे; आणि त्याच्या पक्षांचे ठिकाणी जें सामर्थ्य आहे, तेंच सामर्थ्य तुझ्या बाहूच्या ठिकाणीं आहे; तस्मात्, पराक्रम आणि तेज ह्यांसंबधानें तू त्या गरुडापेक्षां कमी नाहीस. हे वानरश्रेष्ठा बुद्धि, तेज आणि धैर्य ही तुझे असल्यामुळें, सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठ अस समुद्रलंघनाविषयीं कां बरें सज्ज अप्सरांमध्यें श्रेष्ठ आणि पुंजिकस्थ नें विख्यात अशी जी अप्सरा होत री वानराची अंजना ह्या नांवाची ती रूपानें सर्व पृथ्वींत अप्रतिम मध्यें विख्यात होती. बा हनुमाना, ळे तिला जरी वानरीचा जन्म त त्या वानरजन्मामध्येंही ति रूप ध करण्याचें सामर्थ्य कुंजर नामक वानराधिपतीची ती मनुष्यरूप धारण करून पर्जन्यकालच्या मेघांप्रमाणें दिसत असलेल्या पर्वतशिखरावर संचार करीत होती; रूप आणि यौवन ह्यांच्या योगानें ती झळकत होती; अद्भुत पुष्पें आणि भूषणें तिनें धारण केलीं होती, आणि ती पैठणी नेसली होती. ह्याप्रमाणे ती विशालनयना पर्वताशिखरावर असतांना, आरक्तवर्ण दिशांनीं युक्त व शुभ असें तिचें पीत वस्त्र हळू हळू वायूनें उडविले; आणि नंतर तिच्या चांगल्या घट्ट व गरगरीत मांड्या, पुष्ट आणि एकमेकाला लागलेले स्तन, व आकृतीनें उत्कृष्ट आणि दिसण्यांतही सुंदर असें मुख त्यानें अवलोकन केलें; जिचा जघनप्रदेश विस्तृत आहे, जिचा मध्यभाग कृश आहे, आणि जिचे सर्व अवयव उत्कृष्ट आहेत, अशा त्या स्त्रीला अवलोकन करितांक्षणी वायु मदनानें अतिशयच मोहित झाला; इतकेंच नव्हे, परतु आपल्या दीर्घ बाहूनीं त्यानें तिला आलिंगनही दिले; आणि मदनानें ज्याचें सर्व शरीर व्याप्त झाले आहे, अशा वायूनें त्या निर्दोष स्त्रीच्या ठिकाणीं आपले तेज स्थापन केलें. तेव्हां ती पतिव्रता स्त्री गोंधळून गेली, आणि म्हणाली, "माझें हें पातिव्रत्य भ्रष्ट करण्याची कोण इच्छा करीत आहे?" हें अजनेचें भाषण श्रवण करून वायु म्हणाला, "हे सुंदरि. मी तुझा घात करीत नाहीं; तू मनामध्यें भय बाळगू नको. हे यशस्विनि, तुला आलिंगन देऊन ज्या अर्थी मी मानसिक भोगाच्याच योगानें तुझ्या ठिकाणी आपलें तेज ठेविलें आहे, त्या अर्थी तुला वीर्यवान आणि बुद्धिमान पुत्र होईल. तो पुत्र महावीर्यवान, महातेजस्वी, महाबलाढ्य व महापराक्रमी होऊन मार्ग उल्लंघून जाण्यात आणि उडी म रण्यांत माझी बरोबरी करील."

जांबवान पुढे म्हणतो:—हे महा नरा, प्र- ग वायूनें तुझ्या मातला सांगितले असतां ती

संतुष्ट झाली, आणि गुहेमध्यें ती तुला प्रसवली. नंतर महावनामध्यें सूर्य उदयाचलास आलेला पाहतांक्षणीं, हें फळ आहे असें समजून तें तुज बालाला घेण्याची इच्छा झाली, आणि उडी मारून तूं तें घेण्याकरितां स्वर्गामध्यें गेलास. अरे, तीनशें योजनें जरी तूं उडी मारून अंतरिक्षांत गेला होतास, आणि रवीच्या तेजानें जरी ग्रस्त झाला होतास, तरी वायूच्या सामर्थ्यामुळें तुला ग्लानि आली नाहीं. तूं अंतरिक्षामध्यें प्राप्त झाला आहेस असें अवलोकन करून, तुझ्या तेजानें क्रुद्ध झालेल्या इंद्रानें तुझ्या शरिरावर वज्र फेंकिलें. तेव्हां पर्वताच्या उच्च शिखरावर तुझा डावा हनु म्हणजे गुडघा मोडला, आणि म्हणूनच तेव्हांपासून "हनुमान" असें तुझें नांव लोकांनीं ठेविलें. तदनंतर, तुला वज्रप्रहार झाल्याचें पाहून गंध वहाणारा वायु स्वतः अत्यंत क्रुद्ध झाला, आणि त्रैलोक्यामध्यें संचार करीनासा झाला. तेव्हां त्रैलोक्य क्षुब्ध झालें असतां भुवनाधिपति सर्व देव अगदीं घाबरून गेले, आणि क्रुद्ध झालेल्या वायूला शांत करून घेऊं लागले. बा अमोघपराक्रमी हनुमाना, ह्याप्रमाणें देवांनीं वायूला प्रसन्न करून घेतलें असतां, "समरांगणामध्यें शस्त्राच्या योगानें तुझा वध होणार नाहीं" असा ब्रह्मदेवानें तुला वर दिला. त्याचप्रमाणें, वज्रप्रहार झाला असतांही तुला कांहीएक इजा झाली नाहीं असें अवलोकन करून इंद्राचें मन प्रसन्न झालें, आणि "तूं इच्छामरणी होशील" असा त्यानें तुला उत्कृष्ट वर दिला. सारांश, भयंकर पराक्रम करणारा तूं केसरीचा क्षेत्रज पुत्र असून वायूचा औरस पुत्र आहेस, व तेजानेंही त्याची बरोबरी करणारा आहेस. वत्सा, आम्ही आज मेल्यासारखे आहों, आणि सांप्रत आम्हांमध्यें दक्षता व पराक्रम ह्यांनीं संपन्न असलेला दुसरा वानरराज सुग्रीवच काय असा तूं आहेस. बा हनुमाना, त्रिविक्रमावतारसमयीं मीं पर्वत, वनें व अरण्यें ह्यांसहवर्तमान पृथ्वीला एका सपाट्यासरशा एकवीस प्रदक्षिणा केल्या होत्या, व त्या वेळेला देवांच्या आज्ञेवरून आम्हीं पुष्कळ औषधि जमा केल्या होत्या; आणि त्यांच्याच योगानें समुद्रमंथन करून देवांना अमृत प्राप्त झालें. सारांश, त्या वेळीं आमचें सामर्थ्य मोठें होतें. परंतु आतां मी वृद्ध झालों असून माझ्या अंगीं पराक्रम मुळींच राहिला नाहीं. सांप्रत कालीं आम्हांमध्यें तूंच सर्वगुणसंपन्न आहेस. तस्मात्, हे पराक्रमी हनुमाना, स्वतःचे अंगीं जें काय बल असेल तें तूं प्रकट कर. उडी मारणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ तूंच आहेस, आणि सर्व वानरसेना तुझें सामर्थ्य अवलोकन करण्यास उत्सुक झाली आहे. तस्मात्, हे वानरश्रेष्ठा, ऊठ, आणि महासागर उल्लंघन कर. हनुमाना, सर्व प्राण्यांपेक्षां तुझी गति अधिक आहे. बाबारे, सर्व वानर खिन्न होऊन बसले आहेत. आतां तूं कां बरें यांचा अंत पहात आहेस? हे महावेगवान हनुमाना, विष्णूनें ज्याप्रमाणें तीन पावलें टाकिलीं, त्या [illegible] तूं आतां गतीचें अवलंबन कर.

[illegible]णे वानरश्रेष्ठ जांबवानानें हनुमानाला [illegible]शी असतां, स्वतःच्या वेगासंबंधानें [illegible] त्या वायुपुत्र कपीनें त्या वानर- वी[illegible] हर्ष उत्पन्न करीत करीत प्रचंड रू[illegible]

## सदुसष्टावा.

—:०:—

### [illegible]लंघनाची तयारी.

([illegible]नुमंताचें भाषण.)

[illegible]नें समुद्र उल्लंघून जाण्याकरितां

पाषाणसमुदाय अस्ताव्यस्त पडले, मृग व ज अगदी त्रस्त होऊन गेले, मोठमोठे वृक्ष पित होऊ लागले, आणि शेवटीं त्या पर्वता- सून जलप्रवाहही वाहू लागले. पान आणि षयोपभोग ह्यांविषयी अत्यत आसक्त असलेली धर्वांचीं अनेक जोडपी, उड्डाण करणारे पक्षी, णि विद्याधरांचेही समुदाय त्या पर्वतावरील मोठमोठीं शिखरे सोडून जाऊ लागले, मो- ठमोठे भुजग दडून बसू लागले, आणि त्या हापर्वतावरील शिखरे व शिला ह्यांचेही पतन होऊ लागलें. बिळातून अर्धवट बाहेर निघून सुस्कारे टाकू लागलेल्या भुजगांच्या योगाने तो पर्वत पताकांनी युक्त असल्यासारखा दिसू लागला; आणि त्रासाने गोंधळून गेलेले ऋषि त्या पर्व- ताला सोडून जाऊ लागले असता तो पर्वत प्रचड अरण्यात तांड्यातून चुकलेल्या मार्गस्थाप्र- माणे खिन्न दिसू लागला. असो. चलाख आकृतीनें युक्त आणि शत्रुपक्षीय वीरनाशक असा जो महा- पराक्रमी, विचारी, वेगवान आणि वानरश्रेष्ठ हनुमान, त्याने मन स्वस्थ ठेवून लंकेचे स्मरण केले.



असा शाप दिल्यानंतर, क्रोधामुळें ज्यांचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशा त्या भार्गव मुनींनीं "दंड राजाच्या प्रदेशाच्या सीमेबाहेर तुम्ही रहा" म्हणून त्या आश्रमनिवासी लोकांना सांगितलें. तेव्हां उशनस् मुनींचें भाषण श्रवण केल्यावर आश्रमामध्यें वास्तव्य करणारे ते लोक त्या देशांतून निघून बाहेर राहिले. ह्याप्रमाणें मुनिजनांना सांगितल्यानंतर ते ऋषि अरजेला म्हणाले, "हे अविचारी कन्ये, तूं सावधानपूर्वक येथेंच आश्रमामध्यें रहा. अरजे, तूं निर्भय होऊन औरस चौरस एक योजन असलेल्या ह्या सरोवराचा उपभोग घे; हें सरोवर दिसण्यांत फारच मनोहर आहे. तूं ह्या ठिकाणीं कालप्रतीक्षा करीत रहा. त्या रात्रीं जे प्राणी तुझ्यासमीप वास्तव्य करतील, त्यांचा त्या धूलिवृष्टीच्या योगानें कधीं वध होणार नाहीं."

ब्रह्मर्षींची ही आज्ञा श्रवण करून ती कन्या अतिशय दुःखित झाली, आणि त्या पित्याला "होय" असें म्हणाली. असो. ह्याप्रमाणें सांगितल्यानंतर भार्गव मुनींनींही दुसरीकडे वास्तव्य केलें, व दंड राजाचें तें राज्य, सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान ब्रह्मवेत्त्या मुनींच्या म्हणण्याप्रमाणें सात दिवसांनीं खाक होऊन गेलें!

अगस्त्य सांगतात:—रामा, धर्मयुक्त अशा कृतयुगामध्यें धर्मविरुद्ध आचरण त्या राजाच्या हातून घडल्यामुळें विंध्य व शैवल ह्यांचे मध्यभागीं असलेल्या त्याच्या प्रदेशाला त्या महर्षींनीं शाप दिला; आणि तेव्हांपासून त्या प्रदेशाला दंडकारण्य असें नांव पडलें. ह्या अरण्यामध्यें तपस्वी रहात असल्यामुळें पुढें जनस्थान म्हणून हें प्रसिद्धीस आलें. राघवा, तूं मला विचारल्याप्रमाणें हें सर्व कांहीं मीं तुला कथन केलें आहे. हे वीरा, आतां संध्यावंदनकालाचें अतिक्रमण होत आहे. हे सर्व महर्षि स्नान केले आहेत, आणि आपल्यासमीप जलपूर्ण कुंभ ठेऊन हे सूर्याची उपासना करीत आहेत. सर्व ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांनीं वेदमय उपस्थानही केलें आहे, आणि सूर्य अस्ताचलास गेला आहे; ह्यास्तव तूंही जा आणि स्नान कर.

## अगस्त्यमुखें रामप्रशंसा.

ऋषींचें हें भाषण श्रवण केल्यानंतर राम संध्यावंदन करण्याकरितां सरोवराकडे गेला. अप्सरोगणांनीं त्याचा आश्रय केलेला होता. तेथें स्नान व सायंसंध्या आटोल्यानंतर तो अगस्त्य मुनींच्या आश्रमामध्यें प्रविष्ट झाला. त्या ठिकाणीं मुनींनीं बहुगुणसंपन्न कंदमुळें, औषधि आणि शालिप्रभृति पवित्र धान्यें हीं रामाच्या भोजनाकरितां तयार करविलीं. तेव्हां तें अमृततुल्य अन्न त्या पुरुषश्रेष्ठ रामानें भक्षण केलें असतां तो प्रसन्न व संतुष्ट होऊन त्या रात्रीं तेथें राहिला. नंतर प्रभातकाळीं पहांटेस उठून शत्रुदमन रामानें स्नानसंध्या आटोपली; नंतर तो रघूत्तम जाण्याविषयीं अनुज्ञा घेण्याकरितां अगस्त्य मुनींकडे गेला, आणि अभिवंदन करून त्या महर्षींना म्हणाला, "आपल्या आश्रमाला जाण्याविषयीं मी विचारीत आहें, मला आपली अनुज्ञा व्हावी. महात्म्यांच्या दर्शनानें मी धन्य झालों असून माझ्यावर भगवानांचा अनुग्रह झाला आहे. आतां स्वतःला पावन करण्याकरितां महात्म्या भगवानांच्या दर्शनार्थ मी एखादे वेळेस येईन."

ह्याप्रमाणें राम सविनय भाषण करूं लागला असतां, योगधर्म हीच ज्यांची दृष्टि आहे व तप हेंच ज्यांचें धन आहे असे ते अगस्त्य मुनि अतिशय संतुष्ट होऊन म्हणाले, "रामा, शुभ शब्दांनीं युक्त असें हें तुझें भाषण अतिशय आश्चर्यकारक आहे. कारण, हे रघुनंदना, प्राणिमात्रांना पावन करणारा तूंच आहेस. रामा, क्षणभर कां होईना, जे कोणी तुला अवलोकन करितात, ते पावन झाल्यामुळें देवांनाही पूज्य होतात, व स्वर्गलोक त्यांना प्राप्त होतो. त्याचप्रमाणें, द्वेषदृष्टीनें जे भूतलावरील

प्राणी तुला अवलोकन करतात, ते यमदंडाच्या योगानें वध पावून तत्काळ नरकाला जातात. हे रघुवंशराजश्रेष्ठा, तूं अशा प्रकारच्या सर्व प्राण्यांना पावन करणारा आहेस. राघवा, तुझें कीर्तन करणारेही पुरुष मोक्षाला जातील. सर्वदा सावध असलेला तूं निर्विघ्नपणें आतां निर्भय मार्गानें जा आणि धर्मानें राज्य कर. कारण, तूंच जगताचा आश्रय आहेस."

### श्रीरामाचें अयोध्येप्रत परावर्तन.

अगस्त्य मुनींचें हें भाषण ऐकून जितेंद्रिय व प्राज्ञ रामराजानें हात जोडिले, व त्या सत्यनिष्ठ ऋषींना त्यानें अभिवंदन केलें. ऋषिश्रेष्ठ अगस्त्यांना अभिवंदन केल्यानंतर त्या सर्व तपोधनांनाही त्यानें अभिवंदन केलें, व तो कर्तव्यदक्ष राम सुवर्णभूषित पुष्पक विमानामध्यें आरूढ झाला. तो जाऊं लागला असतां, सहस्रनयन इंद्राचे सभोंवतीं जुळणाऱ्या देवांप्रमाणें मुनिगण त्याच्याभोंवतीं जुळले, व त्या महेंद्रतुल्य पराक्रमी रामाची त्यांनीं आशीर्वादपूर्वक स्तुति केली. तेव्हां, पर्जन्यसमयीं मेघासमीप असलेला चंद्र ज्याप्रमाणें शोभूं लागतो, त्याप्रमाणें तो आकाशांत असलेला राम त्या सुवर्णभूषित विमानामध्यें दिसूं लागला. तदनंतर, सूर्य मध्यान्हीं आला असतां, ठिकठिकाणीं ज्याची प्रशंसा चालली आहे असा तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम मधल्या चौकांत उतरला. नंतर, इच्छेप्रमाणें संचार करणाऱ्या मनोहर पुष्पक विमानांतून तो बाहेर पडला, आणि बाहेर पडल्यावर "तुझें कल्याण असो" असें त्या प्रभूनें त्या विमानाला सांगितलें. मग दुसऱ्या चौकांत उभ्या असलेल्या द्वारपालाला राम सत्वर म्हणाला, "शीघ्रगामी लक्ष्मणाकडे व भरताकडे जा, आणि मी आलों आहें असें सांगून तूं त्यांना बोलावून आण; विलंब करूं नको."

## सर्ग त्र्यायशींवा.

—:०:—

### यज्ञ करण्याविषयीं वाटाघाट.

पुण्य कर्म करणाऱ्या रामाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर, द्वारपालानें उभयतां राजकुमारांना बोलावून आणून सांगितलें. ते भरतलक्ष्मण प्राप्त झाल्याचें अवलोकन केल्यावर राम त्यांना आलिंगन देऊन म्हणाला, "मी प्रतिज्ञेप्रमाणें ब्राह्मणाचें उत्कृष्ट कार्य सत्य मार्गानें शेवटास नेलें. आतां पुनरपि धर्मसेतुरूप राजसूय क्रतु करण्याची माझी इच्छा आहे. कारण, धर्मसेतूच्या फलाचा कधींही क्षय होत नाहीं, व तें कधीं कमीही होत नाहीं. शिवाय, त्या धर्मसेतूचें कीर्तनही सर्व पापें नाहींसें करणारें आहे. सारांश, मत्स्वरूपच असलेल्या तुम्हां उभयतांसहवर्तमान अनुपम राजसूय क्रतु करण्याची माझी इच्छा आहे. कारण, तो क्रतु केल्यानें अक्षय्य पुण्य प्राप्त होतें. शत्रुनाशक मित्रानें योग्य हवनपूर्वक राजसूयसंज्ञक उत्कृष्ट यज्ञ केला, व त्यामुळें त्याला वरुणत्व प्राप्त झालें; आणि यथाविधि राजसूय याग केल्यामुळें धर्मवेत्त्या सोमालाही अक्षय्य स्थान प्राप्त झालें, व सर्व लोकांमध्यें त्याची कीर्ति झाली. तस्मात्, आज कोणतें श्रेयस्कर आहे ह्याचा आपण विचार करूं; आणि मग हितावह व योग्य असें जें असेल तें लक्ष्यपूर्वक विचार करून तुम्ही मला कळवा."

रामाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर वक्ता भरत हात जोडून म्हणाला, "हे सज्जन, हे महाबाहो, हे अनंतपराक्रमी, मुख्य धर्म आपणांवरच अवलंबून असून सर्व पृथ्वी आपल्याच आश्रयानें राहिली आहे. देव ज्याप्रमाणें ब्रह्मदेवाला लोकनाथ समजत असतात, त्याचप्रमाणें आम्हांसहवर्तमान सर्व भूपाल तुला महात्मा व लोकनाथ समजत असतात. हे महाबलाढ्य

राजा, सर्व प्रजाजन स्वतःला पुत्राप्रमाणें समजून तुला पित्याप्रमाणें मानीत आहेत; आणि, राघवा, पृथ्वीवरील प्राण्यांचा आश्रयही तूंच आहेस. तस्मात्, हे नृप, अशा प्रकारचा यज्ञ आपण कां करणार? हा क्रतु झाला असतां पृथ्वींतील राजवंशांचा नाश होत असतो. कारण, राजा, ह्या क्रतूनें सर्वांचे ठिकाणीं क्रोध उत्पन्न होत असतो, व त्यामुळें पृथ्वींतील सर्व वीर्यवान पुरुषांचा क्षय होत असतो. तस्मात्, हे अतुलपराक्रमी पुरुषश्रेष्ठा, ज्या अर्थीं सर्व जगत् आपल्या अधीन आहे, त्या अर्थीं आपल्या गुणांचा उपयोग आपण पृथ्वीच्या नाशाकडे करूं नये."

भरताचें हें अमृततुल्य भाषण श्रवण केल्यानंतर सत्यपराक्रमी रामाला अनुपम हर्ष झाला, आणि कैकेयीचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या भरताला सौम्य शब्दांनीं तो म्हणाला, "हे निष्पापा, तुझ्या भाषणामुळें मी आज प्रसन्न व अतिशय संतुष्ट झालों आहें. हे पुरुषश्रेष्ठा, पृथ्वीच्या परिपालनासंबंधानें तूं जें हें भाषण केलें आहेस, तें यथार्थ असून धर्माला अनुसरून आहे. ह्यास्तव, हे धर्मधैर्या, तुझ्या ह्या उत्कृष्ट भाषणामुळें मनांत आणिलेल्या राजसूयसंज्ञक श्रेष्ठ क्रतूपासून मी निवृत्त होतों. लोकांना ज्याच्या योगानें पीडा होईल असें कर्म समंजस पुरुषांनीं करूं नये. असो. भरता, बालांचेंही भाषण शुभ असल्यास ऐकून घेतलें पाहिजे. तस्मात्, हे महाबलाढ्य भरता, मी तुझ्या म्हणण्याप्रमाणें करितों."

## सर्ग चौऱ्यायशींवा.

—:०:—

### अश्वमेधमाहात्म्यकथन.

( वृत्रासुराची कथा. )

ह्याप्रमाणें राम व भरत ह्यांनीं भाषण केलें. असतां लक्ष्मणानें रघुनंदन रामाशीं शुभ भाषण केलें: तो म्हणाला, "हे रघुनंदना, सर्व पापांची निवृत्ति करणारा अश्वमेधसंज्ञक महायज्ञ पावन करणारा आहे. ह्यास्तव तो करण्याचें आपण मनांत आणा. महात्म्या इंद्रासंबंधानें पूर्वीचा वृत्तांत ऐकण्यांत आहे. ब्रह्महत्येचें पातक लागलेला इंद्र अश्वमेधानें शुद्ध झाला आहे. हे महापराक्रमी रामा, पूर्वी देवदैत्यांमध्यें प्रेम असतांना वृत्र म्हणून एक मोठा लोकमान्य दैत्य होता. तो शंभर योजनें विस्तीर्ण असून तीनशें योजनें उंच होता, आणि नैसर्गिक प्रेमामुळें सर्व लोकांवर त्याची कृपादृष्टि होती. तो धर्मज्ञ, कृतज्ञ, बुद्धिमान व अत्यंत दक्ष असून धनधान्यसंपन्न पृथ्वीचें धर्मानें रक्षण करीत असे. तो राज्य करीत असतांना पृथ्वीमध्यें हवा तो इष्ट पदार्थ प्राण्यांना प्राप्त होत असे. पुष्पें, मुळें व फळें सरस असत; आणि त्या महात्म्याच्या कारकीर्दींत पृथ्वी उत्कृष्ट रीतीनें संपन्न असे. इतकेंच नव्हे, तर नांगरणी वगैरे केल्यावांचून तिचे ठिकाणीं पिकें येत असत, आणि अशा प्रकारच्या आश्चर्यकारक व संपन्न राज्याचा तो वृत्रासुर उपभोग घेत असे. असें होतां होतां त्याला वाटलें कीं, "आपण उत्कृष्ट तप करावें. कारण, तप हेंच उत्कृष्ट कल्याणाचें साधन असून इतर विषयसुख मोह पाडणारें आहे." असें मनांत येऊन, प्रजाजनांचा आधिपति म्हणून त्यानें आपल्या मधुर नामक ज्येष्ठ पुत्राची राज्यावर स्थापना केली, आणि उग्र तपश्चर्येला आरंभ केला; परंतु त्यामुळें सर्व देवतांना ताप होऊं लागला. तेव्हां इंद्र अतिशय दुःखित होऊन विष्णूकडे गेला आणि म्हणाला, "हे महाबाहो, तपश्चर्या करीत असलेल्या वृत्रानें सर्व लोक स्वाधीन करून घेतले आहेत, व तो धर्मात्मा बलाढ्य असल्यामुळें त्याला शासन करण्यास मी समर्थ नाहीं. हे सुरेश्वर, हा जर अजूनही तपश्चर्या करीत राहील, तर जोंपर्यंत त्रैलोक्य विद्यमान आहे तोंपर्यंत तें ह्याच्याच अधीन राहील. ह्यास्तव, हे महाबलाढ्य,

ह्या अतिप्रचंड वृत्राची आपण उपेक्षा करूं नका. हे सुरेश्वर, आपण क्रुद्ध झाल्यास वृत्र क्षणभरही राहणार नाहीं. हे विष्णो, जेव्हांपासून तुमच्याशीं त्याचें प्रेम जडलें, तेव्हांपासून त्रैलोक्याचें आधिपत्य त्याला प्राप्त झालें! ह्यास्तव, आपण चांगले सावध राहून लोकांवर कृपा करा. आपण रक्षण केलें असतां सर्व जगत् शांत व आरोग्यसंपन्न होईल. विष्णो, हे सर्व देव रक्षणाकरितां आपल्यावर अवलंबून आहेत. ह्यास्तव, वृत्रघातरूप मोठें कृत्य करून आपण त्यांचें साहाय्य करा. ह्या महात्म्या देवांना आपण वारंवार साहाय्य केलें आहे. ह्यास्तव, असें करणें जरी इतर असुरांना सहन होणारें नाहीं, तरी तें आपण करा. कारण, आम्हां निराश्रित देवांचा आश्रय आपणच आहां."

## सर्ग पंचायशींवा.

—:०:—

### वृत्रवध.

( ब्रह्महत्यानिरसनोपायकथन. )

लक्ष्मणाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर राम म्हणाला:—हे सुव्रता, वृत्रवध मला सविस्तर कथन कर.

रामाचें हें भाषण ऐकून लक्ष्मण म्हणाला:— इंद्राचें व सर्व देवांचें भाषण श्रवण केल्यानंतर सर्व इंद्रप्रभृति देवांना विष्णु म्हणाले, "पूर्वी महात्म्या वृत्राशीं मी प्रेमपाशानें बद्ध झालों आहें. यास्तव, तुमचें प्रिय करण्याकरितां मी ह्या महादैत्याचा वध करणार नाहीं. तथापि, तुम्हांला उत्कृष्ट सुख ज्याच्या योगानें होईल असें कृत्य मला अवश्य केलें पाहिजे. तस्मात्, मी उपाय कथन करितों. इंद्र वृत्रासुराचा वध करील. हे श्रेष्ठ देवहो, मी आपले तीन विभाग करीन, व त्यांच्या योगानें सहस्रनयन इंद्र वृत्रासुराचा निःसंशय वध करील. माझा एक अंश इंद्राकडे जाईल; दुसरा वज्राचें अवलंबन करील; तिसरा भूतलाचा आश्रय करील; आणि असें झालें असतां इंद्राच्या हातून वृत्रासुराचा वध होईल!"

ह्याप्रमाणें देवाधिपति विष्णु सांगत असतांना देव म्हणाले, "हे दैत्यनाशक, आपण सांगत आहां हें निःसंशय घडून येईल. आपलें कल्याण असो; वृत्रासुराचा वध व्हावा ह्या उद्देशानें आतां आम्ही जातों. हे महाशय, आपल्या तेजानें इंद्राचा आश्रय करावा."

तदनंतर, इंद्रप्रभृति सर्व देव जेथें महादैत्य वृत्रासुर होता त्या अरण्यांत गेले, तों तेजानें व्याप्त असा तो असुर तपश्चर्या करीत असतांना त्यांच्या दृष्टीस पडला. तो त्रैलोक्यच प्राशीत आहे कीं काय, अथवा आकाशच दग्ध करून टाकीत आहे कीं काय असा भासत होता. त्या असुरश्रेष्ठाला अवलोकन करितांक्षणीं देव भयभीत झाले, आणि विचार करूं लागले कीं, "आपल्या हातून याचा वध होईल काय? आणि काय केलें असतां आपला पराजय होणार नाहीं?" परंतु ह्याप्रमाणें ते चिंताक्रांत झाले असतांना सयस्त्रनयन इंद्रानें दोन हातांनीं वज्र घेऊन वृत्राच्या मस्तकावर फेंकलें. तेव्हां प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें घोर, प्रदीप्त व प्रचंड तेजानें युक्त असें तें वज्र वृत्राच्या मस्तकासहवर्तमान पतन पावूं लागलें असतांना सर्व जगत् त्रस्त झालें; आणि त्या वृत्राचा वध अनुचित झाला असें चिंतन करीत करीत तो महायशस्वी देवराज त्वरेनें सर्व त्रैलोक्य हिंडला; परंतु जिकडे तो इंद्र जाऊं लागला, तिकडे ब्रह्महत्याही त्याच्या मागें सत्वर जाऊं लागली; आणि शेवटीं ती इंद्राच्या शरीरावर जाऊन आदळल्यामुळें त्याला दुःख झालें. तदनंतर, ज्यांच्या शत्रूचा वध झाला आहे परंतु ज्यांच्या इंद्राचा ठिकाण नाहीं असे ते अग्निप्रभृति देव त्रैलोक्याधिपति विष्णूचें

वारंवार स्तवन करूं लागले: ते म्हणाले, "हे महाराज, जगताचा आश्रय व पिता तूंच असून सर्व प्राण्यांच्या रक्षणाकरितां तूंच विष्णुरूप धारण केलें आहेस. हे सुरश्रेष्ठ, वस्तुत: पाहूं गेलें असतां तूंच वृत्राचा वध केला आहेस; परंतु ब्रह्महत्येची पीडा मात्र इंद्राला होत आहे. ह्यास्तव, त्याच्या सुटकेचा उपाय काय असेल तो तूं सांग."

देवांचें हें भाषण श्रवण करून विष्णु म्हणाला, "इंद्रानें माझाच याग करावा; म्हणजे मी त्या वज्रपाणि इंद्राला पावन करीन. पवित्र अश्वमेधानें माझें यजन केल्यानंतर पाकशासन निर्भय होईल व देवांचें आधिपत्य पुनरपि त्याला प्राप्त होईल."

ह्याप्रमाणें देवांना हा अमृततुल्य उपदेश करून, देव प्रशंसा करीत असतांना देवाधिपति विष्णु वैकुंठाला निघून गेला.

## सर्ग शहायशींवा.

—:०:—

### इंद्राची ब्रह्महत्येपासून मुक्तता.

ह्याप्रमाणें वृत्रवधसंबंधी सर्व वृत्तांत पूर्णपणें निवेदन केल्यावर तो पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण त्या वधासंबंधानेंच अवशिष्ट राहिलेला कथाभाग सांगूं लागला: तो म्हणाला, "देवांना भय उत्पन्न करणाऱ्या महावीर्यवान वृत्राचा ह्याप्रमाणें वध झाला असतां, ब्रह्महत्येनें ग्रस्त झालेल्या वृत्रनाशक इंद्राला कांहींएक सुचेनासें झालें. तेव्हां, लोकांचें ज्या ठिकाणीं वास्तव्य नाहीं अशा ठिकाणीं तो गेला, आणि वेटोळें घालून बसणाऱ्या भुजंगाप्रमाणें आपला देह संकुचित करून कांहीं कालपर्यंत तेथें राहिला. इंद्र नाहींसा झाला असतां जगत् उद्विग्न झालें; पृथ्वी उद्ध्वस्त झाल्यासारखी दिसूं लागली; तिच्यांतील उदक नाहींसें झालें; अरण्येंही शुष्क झालीं; अनावृष्टीमुळें सर्व सरोवरें आणि नद्या ह्यांतील प्रवाह बंद पडले; आणि सर्व प्राणी क्षुब्ध झाले. ह्याप्रमाणें ह्या जगताचा क्षय होऊं लागला असतां देव गोंधळून गेले, आणि विष्णूनें पूर्वीं सांगितलेल्या यज्ञाचें त्यांना स्मरण झालें. नंतर, उपाध्याय व ऋषि ह्यांसहवर्तमान, जेथें इंद्र भयभीत होऊन बसला होता तेथें सर्व देवगण गेले, तों सहस्रनयन इंद्र ब्रह्महत्येनें ग्रस्त झाला आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां, रामा, महात्म्या महेंद्राच्या मागें लागलेली ब्रह्महत्या निवृत्त होण्याकरितां त्या सुरेश्वर विष्णूला उद्देशून त्यांनीं अश्वमेध केला. नंतर यज्ञ समाप्त झाला असतां ब्रह्महत्या महात्म्या देवांकडे गेली, आणि "मला तुम्ही जागा कोठें देणार?" म्हणून त्यांना विचारूं लागली. तेव्हां देव संतुष्ट व प्रसन्न होऊन तिला म्हणाले, "हे दुस्तर ब्रह्महत्ये, तूं स्वत: आपले चार भाग कर."

"महात्म्या देवांचें हें भाषण श्रवण केल्यावर, जिचें वास्तव्य दु:खकारक आहे अशा त्या ब्रह्महत्येनें विचार करून इंद्राशिवाय दुसऱ्या ठिकाणीं वसतिस्थान मागून घेतलें: ती म्हणाली, "वर्षाऋतूंतील चार महिने ज्यांना उदकाची समृद्धि असते, अशा नद्यांचे ठिकाणीं मी पाण्यांचा गर्व नाहींसा करणारी व स्वेच्छेनें चालणारी ब्रह्महत्या तेच चार महिनेपर्यंत वास्तव्य करीन. त्याचप्रमाणें, एका अंशानें मी सर्वकाल भूमीचे ठिकाणीं ऊषररूपानें वास्तव्य करीन, हें मी तुम्हांला सत्य सांगत आहें. माझा जो तिसरा अंश आहे, त्या अंशानें मी विषयवासनेनें भरलेल्या तरुणी स्त्रियांचे ठिकाणीं तीन दिवसपर्यंत वास्तव्य करीन, आणि तितका काल लोटेपर्यंत मी त्यांच्या समागमसुखाचा विघात करीन; आणि त्याचप्रमाणें, हे सुरश्रेष्ठहो, निरपराधी ब्राह्मणांवर मिथ्या आरोप करून जे त्यांच्या वधाला कारण होतील, त्यांच्या ठिकाणीं मी चौथ्या अंशानें राहीन."

"ह्यावर देव तिला म्हणाले, "हे दुर्वासे,

तुझ्या म्हणण्याप्रमाणें होवो; तूं सर्व आपल्या इच्छेप्रमाणें शेवटास ने." नंतर आनंदित झालेल्या देवांनीं इंद्राला वंदन केलें, व इंद्रही निश्चिंत आणि पापरहित झाला. इंद्र स्थानापन्न झाला असत सर्व जगतामध्यें शांतता झाली, व त्या अद्भुत फल देणाऱ्या इंद्रानें यज्ञाची प्रशंसा केली. हे रघुनंदना, अश्वमेधाचें फल अशा प्रकारचें आहे; ह्यास्तव तूं अश्वमेध कर."

ह्याप्रमाणें अत्यंत मनोहर असलेलें लक्ष्मणाचें उत्कृष्ट भाषण श्रवण करून, इंद्राप्रमाणें तेजस्वी व पराक्रमी असलेल्या महात्म्या रामाचें अंतःकरण आनंदित झालें, व तो संतुष्ट झाला.

## सर्ग सत्यायशींवा.

—:०:—

### इल राजाचें वृत्त.

तदनंतर राम हंसत हंसत म्हणाला:—हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, वृत्रवध आणि अश्वमेधाचें फल हें जें तूं सविस्तर सांगितलें आहेस, तें अगदीं बरोबर आहे. हे सौम्या, कर्दम प्रजापतीचा एक इल म्हणून अत्यंत धार्मिक पुत्र आमच्या ऐकण्यांत आहे. तो श्रीमान इल बाल्हीक देशाचा अधिपति होता. तो महायशस्वी राजा सर्व पृथ्वी पादाक्रांत करून राष्ट्राचें पुत्रवत् परिपालन करीत असे. मोठेमोठे पूज्य सुर, महाधनाढ्य दैत्य, नाग, राक्षस, गंधर्व आणि फारच मोठे यक्षही भयभीत होऊन त्याची नित्य प्रशंसा करीत असत. तो महायशस्वी राजा तशा प्रकारचा असून धर्मनिष्ठ व वीर्यवान होता; आणि मनानेंही मोठा उदार होता. एकदा मनोहर चैत्रमासीं सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान तो महापराक्रमी राजा रमणीय वनामध्यें मृगया करूं लागला. मृगया करितां करितां अरण्यामध्यें शेंकडों हजारों मृगांचा त्यानें वध केला; तथापि त्या राजाची तृप्ति झाली नाहीं. ह्याप्रमाणें अनेक प्रकारच्या दहा दहा हजार मृगांचा त्या महात्म्याच्या हातून वध होऊं लागला, आणि कार्तिकेयाची ज्या ठिकाणीं उत्पत्ति झाली, त्या ठिकाणीं तो राजा जाऊं लागला. त्या प्रदेशामध्यें, ज्याच्याकडे पहाणेंही शक्य नाहीं असा सुरेश्वर शंकर सर्व अनुयायांसहवर्तमान पार्वतीला रमवीत होता. तो वृषध्वज उमापति देवी पार्वतीचें प्रिय करण्याकरितां स्त्रीरूप धारण करून त्या प्रदेशामध्यें वास्तव्य करीत असतो. पर्वतावरून येत असलेले उदकाचे प्रवाह त्या प्रदेशामध्यें आहेत. त्या वनांत, ज्या ज्या ठिकाणीं पुरुष म्हणविणारे प्राणी व वृक्ष होते, ते सर्व स्त्रीजन झाले; आणि इतरही जें म्हणून कांहीं होतें, तें सर्व स्त्रीसंज्ञेस पात्र झालें. इतक्यांत तो कर्दमपुत्र इल राजा हजारों मृगांचा वध करीत करीत त्या ठिकाणीं आला. लक्ष्मणा, त्या ठिकाणीं आल्यानंतर, हिंस्र पशु, मृग व पक्षी ह्यांसहवर्तमान सर्व स्त्रीरूप झालें असून आपणही अनुयायांसहवर्तमान स्त्री झालों आहों असें जेव्हां त्याच्या दृष्टीस पडलें, तेव्हां आपली ती अवस्था पाहून त्याला मोठें दुःख झालें; आणि उमापति शंकराचा तो प्रभाव आहे असें समजून आल्यावर तर त्याला भयच वाटूं लागलें! तदनंतर सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान तो राजा कपर्दकसंज्ञक जटाजूट धारण करणाऱ्या महात्म्या शितिकंठ देवाला शरण गेला. तेव्हां देवी पार्वतीसहवर्तमान तो महेश्वर वर देण्यास उद्युक्त झाला, आणि स्वतः त्या कर्दम प्रजापतीच्या पुत्राला हास्यपूर्वक म्हणाला, "हे महाबलाढ्य राजर्षे कर्दमपुत्रा, उठ; हे सौम्य, हे सदाचरणसंपन्न, पुरुषत्वाशिवाय तुला जो वर हवा असेल तो तूं मागून घे."

शोकाकुल झालेल्या त्या राजाला शंकरानें ह्याप्रमाणें पुरुषत्व देण्याचें नाकारलें, व स्त्रीरूप झालेल्या त्या राजाला त्या सुरश्रेष्ठापासून दुसरा वर मागून घेणें रुचलें नाहीं. तदनंतर, मोठ्या शोकानें

ग्रस्त झालेला तो राजा मन अगदीं एकाग्र करून व शैलराजकन्या उमा देवीला प्रणिपात करून म्हणाला," हे वरावरिष्ठात्रि, हे वरदे, त्रैलोक्यामध्यें स्त्री म्हणून तूंच आहेस; आणि, हे देवि, तुझें दर्शन व्यर्थ जाणारें नाहीं. ह्यास्तव, तूं माझ्यावर कृपादृष्टि कर."

अशी राजानें प्रार्थना केली असतां रुद्राला संमत असलेल्या त्या देवीनें त्या राजर्षीचें हृद्गत जाणिलें, आणि ती सौम्य शब्दांनीं शंकराचे सांनिध त्याला म्हणाली, "तुला अर्धा वर देणारा देव असून, अर्धा वर देणारी मी आहें. तस्मात्, आम्हां स्त्रीपुरुषांपासून तूं आपल्या इच्छेप्रमाणें अर्धा अर्धा वर मागून घे."

देवीचा हा अनुपम व अद्भुत वर श्रवण करून राजाच्या मनाला हर्ष झाला, आणि तो म्हणाला, " हे देवि, माझ्यावर जर तूं प्रसन्न झाली आहेस, आणि पृथ्वीमध्यें जर तूं रूपानें अप्रतिम आहेस, तर एक महिना मी तुझ्याप्रमाणें स्त्री होऊन पुनरपि एक महिना पुरुष व्हावें."

अशी त्याची इच्छा जाणून, मनोहर मुद्रेनें युक्त असलेली ती देवी पार्वती शुभ शब्दांनीं त्याला म्हणाली, "तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच होईल; आणि, राजा, पुरुष झाल्यावर तुला स्त्रीत्व स्मरणार नाहीं, व स्त्री झाल्यावर दुसरा महिना लोटेपर्यंत तुला पुरुषत्वाची आठवण राहणार नाहीं." लक्ष्मणा, ह्याप्रमाणें तो कर्दमपुत्र इल राजा एक महिना पुरुष होत असे, आणि नंतर एक महिना इला म्हणून त्रैलोक्यसुंदरी स्त्री होत असे.

# सर्ग अठ्यायशींवा.

—:०:—

## बुधाला इलादर्शन.

रामानें सांगितलेली ती इलसंबंधी कथा श्रवण करून लक्ष्मण व भरत हे अतिशय विस्मित झाले, आणि हात जोडून त्या राजाच्या स्त्रीपुरुषत्वाची सविस्तर हकीकत त्यांनीं रामाला पुनरपि विचारली. ते म्हणाले, "स्त्री झाल्यामुळें दुःस्थितीस पोहोंचलेला तो राजा कसा वागत असे ? आणि तो पुरुष झाल्यावर आपलें वर्तन कसें ठेवीत असे ?"

हें त्यांचें उत्कंठेनें युक्त असलेलें भाषण श्रवण करून ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें त्या राजाचा इत्थंभूत वृत्तांत त्यांना कथन केला. तो म्हणाला, "त्या पहिल्याच महिन्यामध्यें भुवनसुंदरी स्त्री होऊन स्त्रीरूप झालेल्या त्या पूर्वीच्या अनुयायांनीं ती परिवेष्टित झाली. नंतर, कमलपत्रांप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी ती त्रैलोक्यसुंदरी वृक्ष, झुडपें व लता ह्यांनीं व्याप्त झालेल्या त्या वनामध्यें सत्वर प्रवेश करून पायींच संचार करूं लागली. बरोबर असलेलीं सर्व वाहनें सभोंवतीं सोडून देऊन विस्तीर्ण पर्वतांच्या मध्यभागीं ती इला त्या वेळीं क्रीडा करूं लागली. त्या वनामध्यें पर्वताचे समीपच नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं युक्त आणि अत्यंत मनोहर असें एक सरोवर होतें. त्या सरोवराचे ठिकाणीं सोमपुत्र बुध त्या इलेच्या दृष्टीस पडला. तो बुध उदय पावलेल्या पूर्ण चंद्राप्रमाणें आपल्या देहानें झळकत होता; उदकामध्यें तो तीव्र तपश्चर्या करीत होता; तो अजिंक्य होता; आणि तो यशस्वी, यथेष्ट वागणारा व दयाळू होता. स्त्रीरूप झालेल्या त्या प्राचीन पुरुषांसहवर्तमान ती इला विस्मित होऊन क्रीडेच्या योगानें तें सर्व सरोवर क्षुब्ध करून टाकीत होती. ती दृष्टीस पडल्याबरोबर बुध मदनबाणांच्या अधीन होऊन गेला; त्याचें मन त्याला आवरेनासें झालें; आणि उदकामध्यें त्याची वृत्ति पालटली. त्रैलोक्यांतील स्त्रियांपेक्षाही अधिक मनोहर असलेल्या त्या इलेकडे तो पाहूं लागला असतां, त्याच्या अंतःकरणामध्यें तिच्यासंबंधानें विचार उत्पन्न झाला. 'देवतांहूनही अधिक अशी ही स्त्री कोण बरें असावी ! देवांगना, नागकन्या, दैत्यांगना आणि अप्सरा ह्यांमध्येंही आजपर्यंत

अशा रूपानें सुशोभित असलेली कोणीही स्त्री माझ्या दृष्टीस पडली नाहीं. दुसऱ्यानें जर हिचा स्वीकार केला नसेल, तर ही स्त्री मला योग्य होईल. ' असा विचार मनांत आणून तो उदकांतून निघून तीरावर आला. तदनंतर, आश्रमामध्यें आल्यावर त्या धर्मात्म्यानें त्या उत्कृष्ट तरुणी स्त्रियांना आह्वान केलें असतां त्यांनीं त्याला वंदन केलें. तेव्हां, " ही लोकसुंदरी कोणाची आहे, व ही येथें कशाकरितां आली आहे, हें सर्व तुम्ही मला सत्वर कथन करा " असें त्या धर्मात्म्यानें त्यांना विचारलें असतां, मधुर शब्दांनीं युक्त असलेला तो मधुर व शुभ प्रश्न श्रवण करून त्या सर्व स्त्रिया मधुर वाणीनें त्याला म्हणाल्या, " ही सुंदरी सर्वदा आमची स्वामिनी आहे; आणि ही अविवाहित असून आम्हांसहवर्तमान वनांत संचार करीत असते. "

" स्पष्ट शब्दांनीं युक्त असें त्या स्त्रियांचें हें भाषण श्रवण केल्यानंतर पवित्र संवर्त विद्येचा त्यानें जप केला. तेव्हां त्या राजाचा तो संपूर्ण वृत्तांत इत्थंभूत समजून आल्यावर तो मुनिश्रेष्ठ बुध इलेच्या त्या सर्व स्त्रीरूप सख्यांना म्हणाला, " येथें पर्वततटाकावर तुम्ही किन्नरस्त्रिया होऊन रहा; ह्या पर्वताचे ठिकाणीं तुम्ही आपलें वसतिस्थान सत्वर तयार करा; मुळें, पत्रें व फलें ह्यांवर तुम्ही सर्व स्त्रिया नित्य उपजीविका करीत जा; आणि किंपुरुष नामक भर्त्यांचा तुम्ही स्वीकार करा. "

" हें सोमपुत्र बुधाचें भाषण श्रवण केल्यानंतर, त्या स्त्रिया बुधाच्या योगसामर्थ्यामुळें किन्नरी झाल्या, आणि त्या असंख्य स्त्रिया त्या पर्वतासमीप वास्तव्य करूं लागल्या. "

# सर्ग एकुणनव्वदावा.

—:०:—

## पुरूरव्याचें जन्म.

स्त्रियांना किन्नरीत्व प्राप्त झाल्याचें श्रवण केल्यावर लक्ष्मण व भरत हे उभयतां " आश्चर्य आश्चर्य " म्हणून प्रजाधिपति रामाला म्हणाले. नंतर राम म्हणाला, " त्या सर्व किन्नरी दुसरीकडे गेल्या असें पाहून त्या रुपवती इलेला तो ऋषिश्रेष्ठ बुध हंसत हंसत म्हणाला, " हे सुंदरि, तुझें मुख अत्यंत मनोहर आहे, व मी चंद्राचा अतिशय प्रिय पुत्र आहें. ह्यास्तव, सप्रेम दृष्टीनें व भक्तीनें तूं माझा स्वीकार कर. "

" स्वजनरहित अशा एकांतस्थलामध्यें त्याचें भाषण श्रवण करून इला त्या अत्यंत मनोहर बुधाला म्हणाली, " हे सौम्य, मी स्वतंत्र असून आपल्या अधीन आहें; ह्यास्तव, हे सोमनंदन, मला आपण आज्ञा करा, आणि इच्छेस येईल त्याप्रमाणें आपण माझ्याशीं वागा. "

" तिचें हें अद्भुत भाषण श्रवण केल्यानंतर चंद्रपुत्र बुधाला हर्ष झाला, व तो कामी चंद्रपुत्र तिच्याशीं रममाण होऊं लागला. तेव्हां मनोहर मुद्रेनें युक्त अशा त्या इलेशीं अत्यंत रममाण होत असलेल्या त्या कामी बुधाचा वैशाख मास एका क्षणाप्रमाणें निघून गेला. ह्याप्रमाणें महिना पूर्ण झाला असतां, पूर्ण चंद्राप्रमाणें ज्याचें मुख आल्हादकारक आहे असा तो कर्दम प्रजापतीचा पुत्र इल शय्येवर निद्रिस्थ असतांना जागा झाला, तों सरोवरामध्यें वर हात करून व आहाररहित राहून सोमपुत्र बुध तपश्चर्या करीत असल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां तो इल राजा त्याला म्हणाला, " भगवन्, अनुयायांसहवर्तमान मी दुर्गम पर्वतावर आलों; परंतु तें सैन्य माझ्या दृष्टीस पडत नाहीं! ते माझे अनुयायी कोणीकडे बरें गेले? "

" स्त्रीत्वाची ज्याला आठवण नाहीं अशा त्या राजर्षीचें तें शुभ भाषण ऐकून घेऊन मनोहर वाणीनें सांत्वन करीत करीत तो बुध त्याला म्हणाला, " प्रचंड पाषाणवृष्टीमुळें तुझ्या सेवकांचा निःपात झाला असून वायु व पर्जन्य ह्यांच्या भीतीनें व्याकुल झाल्या कारणानें तूं आश्रमामध्यें निजून राहिला होतास. तुझें देव बरें करो, तूं आतां धीर धर, निर्भय व निश्चिंत हो, आणि फलमूलें भक्षण करून तूं खुशाल ह्या ठिकाणीं रहा. "

" बुधाच्या ह्या भाषणानें त्याला धीर आला; परंतु सेवकजनांचा क्षय झाल्यामुळें तो दीन झालेला राजा शुभ शब्दांनीं त्याला म्हणाला, " ब्रह्मन्, मी आपल्या राज्याचा त्याग करितों. कारण, भृत्यांवांचून क्षणभरही राहण्यास मी समर्थ नाहीं. ह्यास्तव, आपण मला जाण्याची अनुज्ञा द्यावी. धर्मनिष्ठ व महायशस्वी असा माझा ज्येष्ठ पुत्र शशबिंदु म्हणून प्रख्यात आहे; त्याला माझें राज्य मिळेल. सुखाचा उपभोग घेत असलेले राज्यांतील सेवक व भार्या ह्यांना सोडून राहण्यास मी समर्थ नाहीं. ह्यास्तव, हे महातेजस्वी मुने, आपण माझ्या इच्छेविरुद्ध कांहींएक भाषण करूं नका. "

" ह्याप्रमाणें तो राजाधिराज इल अत्यंत आश्चर्यकारक भाषण करूं लागला असतां बुध सांत्वनपूर्वक त्याला म्हणाला, " येथेंच वास्तव्य करण्याचा तूं विचार कर. हे महाबलाढ्य कर्दमपुत्रा, तूं काळजी करूं नको. आजपासून एक संवत्सरपर्यंत तूं येथें रहा; म्हणजे मी तुझें हित करीन."

" पवित्र कर्म करणाऱ्या त्या बुधाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर, त्या ब्रम्हवेत्त्यानें सांगितल्याप्रमाणें त्यानें तेथें वास्तव्य करण्याचें योजिलें. महिनाभर स्त्री होऊन तो इल बुधाशीं एकसारखा अतिशय रममाण होत असे; आणि एक महिना पुरुष होऊन आपलें चित्त धर्माकडे लावीत असे. तदनंतर, त्या सुंदरी इलेला नवव्या महिन्यांत सोमपुत्र बुधापासून पुरूरवस् म्हणून एक भव्य पुत्र झाला. तो पुत्र उत्पन्न होतांक्षणीं त्या सुंदरीनें तो महाबलाढ्य व कांतीनें बुधासारखा असलेला पुत्र त्याच्या पित्याचे हातीं दिला. नंतर, संवत्सरापैकीं अवशिष्ट राहिलेल्या ज्या दिवसांमध्यें तो इल पुरुष झाला, ते दिवस पूर्ण होत तोंपर्यंत बुधानें जितेंद्रिय राहून धर्मयुक्त कथांच्या योगानें त्याचें मन रमविलें."

## सर्ग नव्वदावा.

—:०:—

### अश्वमेध यागानें इलेला पुरुषत्वप्राप्ति.

ह्याप्रमाणें त्या पुरूरव्याची ती अद्भुत उत्पत्ति रामानें कथन केली असतां, महायशस्वी भरत व लक्ष्मण पुनरपि त्याला म्हणाले, " हे पुरुषश्रेष्ठा, संवत्सरपर्यंत चंद्रपुत्रासमीप राहिल्यानंतर त्या इलेनें काय केलें हें आपण कथन करा. "

भरत-लक्ष्मणांचें तें मधुर वाक्य ऐकून इलाच्या संबंधानें पुढला वृत्तांत कथन करण्याकरितां राम त्यांना म्हणाला, " शूर इल एकदा पुरुष झाल्यानंतर महाबुद्धिमान व महायशस्वी बुधानें परम उदार संवर्त, भृगुपुत्र च्यवन मुनि, अरिष्टनेमि, प्रमोदन, मोदकर व दुर्वास मुनि ह्यांना निमंत्रण केलें, आणि ते आल्यावर तो धैर्यानें त्यांना म्हणाला, " हा महापराक्रमी राजा इल कर्दम प्रजापतीचा पुत्र होय. ह्याची अवस्था काय झाली आहे हें ऐकून घ्या, आणि ती अवस्था निवृत्त होण्यास कल्याणकारक उपाय कोणता तो तुम्ही योजा. "

" ह्याप्रमाणें महात्म्या द्विजांसहवर्तमान त्यांचा संवाद चालला आहे, तोंच महातेजस्वी कर्दम त्या आश्रमाला प्राप्त झाले; आणि नंतर पुलस्त्य, क्रतु व मूर्तिमान वषट्कार आणि महातेजस्वी प्रणव हेही त्या आश्रमामध्यें आले. ह्याप्रमाणें परस्परांचा समागम झाला असतां ते सर्व आनं-

दित झाले, आणि बाल्हीक देशाधिपतीचें हित व्हावें या उद्देशानें ते पृथक् पृथक् भाषण करूं लागले. प्रथम, पुत्राकरितां अत्यंत हितकारक भाषण कर्दमांनीं केलें: ते म्हणाले, "द्विजहो, राजाचे कल्याण कोणत्या उपायानें होईल ह्याविषयीं माझें भाषण आपण श्रवण करा. वृषध्वज शंकरावांचून ह्या राजाचा दुःस्थितिरूप रोग निवृत्त होण्यास दुसरें औषध नाहीं. सारांश, महात्म्या शंकराला प्रिय जो अश्वमेध क्रतु, त्यापेक्षां ब्रह्महत्येचें पातक निवृत्त करणारा दुसरा यज्ञ नाहीं. तस्मात् आपण सर्वांनीं राजाकरितां दुर्घट अश्वमेध करावा."

"ह्याप्रमाणें कर्दमानें सांगितलें असतां रुद्राच्या आराधनेकरितां तो यज्ञ करण्याचें सर्व द्विजश्रेष्ठांनीं मनांत आणिलें. संवर्ताचा एक मरुत्त म्हणून प्रख्यात असलेला व शत्रुसमुदायाचा पराजय करणारा जो राजर्षि शिष्य होता, त्यानें तो यज्ञ केला. तो महायज्ञ बुधाश्रमासमीप झाला, व त्याच्या योगानें महायशस्वी रुद्र अतिशय संतुष्ट झाला. ह्याप्रमाणें यज्ञ समाप्त झाला असतां संतुष्ट झालेला उमापति शंकर इल राजाचे संनिध मोठ्या आनंदानें त्या सर्व द्विजांना म्हणाला, "द्विजश्रेष्ठहो, तुम्हीं भक्तिपुरःसर केलेल्या अश्वमेधामुळें मी प्रसन्न झालों आहें. ह्यास्तव, ह्या बाल्हीक राजाला प्रिय असलेली अशी कोणती शुभ गोष्ट मी करूं?"

"शंकराचें हें भाषण श्रवण करून ते स्वकार्यदक्ष द्विज इला पुरुष होण्याविषयीं त्या सुरश्रेष्ठाची प्रार्थना करूं लागले. तेव्हां महादेवानें प्रसन्न होऊन पुनरपि इलेला पुरुषत्व दिलें, आणि नंतर तो महातेजस्वी शंकर अंतर्धान पावला. ह्याप्रमाणें अश्वमेध संपूर्ण होऊन शंकर अदृश्य झाला असतां ते सर्व दूरदर्शी द्विज आल्या मार्गानें परत गेले. नंतर इल राजानें बाल्हीक देश सोडून दिला, आणि मध्यदेशांत एक प्रतिष्ठान म्हणून यशस्वी व उत्कृष्ट नगर त्यानें वसविलें. शत्रुसमूह जिंकणारा शशबिंदु राजर्षि बाल्हीक देशामध्यें राहूं लागला, आणि इल राजा प्रतिष्ठान नगरामध्यें वास्तव्य करूं लागला. त्या इल राजाला योग्य वेळीं अनुपम ब्रह्मलोक प्राप्त झाला, व त्याचा पुत्र राजा पुरूरवा प्रतिष्ठान नगरामध्यें राज्य करूं लागला. हे पुरुषश्रेष्ठहो, अशा प्रकारचा अश्वमेधाचा प्रभाव आहे. पूर्वी स्त्री असलेल्या इल राजाला अश्वमेधाच्या योगानें पुरुषत्व प्राप्त झालें आहे, आणि इतरही दुर्लभ गोष्टी ह्या यज्ञाच्या योगानें अनेक लोकांना प्राप्त झाल्या आहेत."

## सर्ग एक्याण्णवावा.

—:०:—

### अश्वमेध यागाची तयारी.

ही कथा सांगून श्रीरामचंद्र पुनः लक्ष्मणाला म्हणाले:—लक्ष्मणा, वसिष्ठ, वामदेव, जाबालि, काश्यप व सर्व विद्यांत निपुण आणि अश्वमेधांतील अग्रगण्य द्विज ह्या सर्वांना निमंत्रण करून आणून, सावधानपणानें अश्वमेधाकरितां एक सुलक्षणी अश्व सोडण्याचें माझ्या मनांत आहे.

रामाचें हें भाषण श्रवण करून शीघ्रगति लक्ष्मणानें सर्व द्विजांना आह्वान करून रामाला भेटविलें. तेव्हां पादाभिवंदन केलेल्या त्या देवतुल्य अजिंक्य रामाला अवलोकन करून त्यांनीं त्याला आशीर्वाद दिले असतां रामानें हात जोडिले, आणि धर्माला अनुसरून अश्वमेधासंबंधानें त्या द्विजश्रेष्ठांशीं त्यानें भाषण केलें. तेव्हां त्या द्विजांनीं शंकराला नमस्कार केला, आणि अश्वमेधाची सर्व प्रकारें प्रशंसा केली. अद्भुत अर्थानें युक्त असें अश्वमेधसंबंधी त्या द्विजांचें भाषण श्रवण करून राम अतिशय संतुष्ट झाला, आणि त्यांनीं तें अनुष्ठान करण्याचें कबूल केलें असें समजून तो लक्ष्मणाला म्हणाला, "लक्ष्मणा, महात्म्या सुग्रीवाला तूं निरोप पाठीव कीं, 'मोठे

वानर आणि अनुयायी वानरांचे अनेक समुदाय बरोबर घेऊन महोत्सव पाहण्याकरितां तूं ये.' इच्छेप्रमाणें संचार करणाऱ्या अनेक राक्षसांसहवर्तमान अतुलपराक्रमी बिभीषणही यज्ञास आला पाहिजे; आणि माझ्या मनाप्रमाणें वागणारे जे महाभाग्यवान राजे, तेही यज्ञभूमि अवलोकन करण्याकरितां अनुयायांसहवर्तमान सत्वर येणें अवश्य आहे. लक्ष्मणा, लक्ष्यपूर्वक अनुष्ठान करणारे असे जे द्विज दुसऱ्या देशांत असतील, त्याही सर्वांना तूं अश्वमेधाकरितां निमंत्रण कर. तपोधन ऋषि आणि अन्य देशांतील सर्व द्विज ह्यांना तूं सपत्नीक येण्याविषयीं निमंत्रण कर; आणि ताल धरणारे नट व नर्तक ह्यांनाही तूं निमंत्रण कर. नैमिषारण्यामध्यें गौतमी नदीचे तीरीं विशाल यज्ञमंडप तयार करण्याविषयीं तूं आज्ञा कर. कारण, तें नैमिषारण्य पवित्र व उत्कृष्ट आहे. हे महाबाहो, सर्व ठिकाणीं शांति सुरू होवोत, आणि ऋतूंमध्यें श्रेष्ठ असलेला हा महायज्ञ अवलोकन करून शेंकडों धर्मवेत्ते कृतार्थ होवोत. हे धर्मज्ञ, राष्ट्रांतील लोकांना तूं सत्वर आमंत्रण कर. ते सर्व लोक तुष्ट व पुष्ट होतील, आणि रीतीप्रमाणें मानमान्यता झाल्यावर परत जातील. ज्यांत कूट नाहीं अशा तांदुळांनीं लादलेले एक लक्ष पशु, तीळ, मूग, हरबरे, हुलगे व उडीद ह्यांनीं लादलेले दहा दहा हजार पशु, आणि ह्याच मानानें मीठ, तूप, तेल व चंदनाचीं खोडें इतकें सामान पुढें जाऊं दे. अनेक कोटि मोहोरा-पुतळ्या व त्यांच्या शेंकडोंपट रुप्याचें नाणें बरोबर घेऊन भरतानें सावधपणानें पुढें जावें. मार्गामध्येंही जागोजागीं दुकानें घालणारे व्यापारी, सर्व प्रकारचे नट व नर्तक, आचारी आणि नित्य तरुणावस्थेंत असलेल्या अनेक स्त्रिया ह्यांनीं भरताबरोबर जावें; सैन्यें पुढें जावीं; आणि व्यापारी, लहान लहान मुलें, वृद्ध माणसें व द्विज ह्यांना घेऊन सैनिकांनीं सावधपणानें जावें. मजूर, सुतार, सराफ, माझ्या सर्व माता, राजकुमारांचीं अंतःपुरें, दीक्षेकरितां माझी सुवर्णाची पत्नी, आणि कर्मवेत्ते ऋषि ह्यांना बरोबर घेऊन महायशस्वी भरतानें पुढें जावें.''

मोठमोठ्या मूल्यवान डेरेराहुट्या आणि भक्ष्य व पेय पदार्थ महाबलाढ्य राजांकरितां व त्यांच्या मोठ्या अनुयायांकरितां पुढें पाठवून देण्याविषयीं रामानें आज्ञा केली. तेव्हां शत्रुघ्नासहवर्तमान भरत निघून गेला; महात्मे वानर सुग्रीवाबरोबर निघून गेले; सर्व श्रेष्ठ विप्रांनीं वाढण्याचें काम पतकरलें; आणि अनेक राक्षसांनीं व राक्षसस्त्रियांनीं परिवेष्टित असलेल्या बिभीषणानें महातपस्वी व महात्म्या ऋषींचें आदरातिथ्य करण्याचें काम आपल्याकडे घेतलें.

## सर्ग ब्याणवावा.

—:०:—

### यज्ञसमारंभ.

ती सर्व यज्ञसामग्री पूर्णपणें पुढें पाठविल्यानंतर भरताग्रज रामानें लक्षणसंपन्न, कृष्णवर्ण व सर्व यज्ञपशूंमध्यें श्रेष्ठ असा अश्व सोडिला; अश्वाच्या संरक्षणाकडे ऋत्विजांसहवर्तमान लक्ष्मणाची त्यानें योजना केली; आणि नंतर सैन्य बरोबर घेऊन तो नैमिषारण्यांत गेला. तेथें गेल्यावर तो अद्भुत यज्ञमंडप त्याच्या दृष्टीस पडला, तेव्हां महापराक्रमी रामाला अतुल हर्ष झाला, आणि "हा भव्य आहे" असें तो म्हणाला. तो नैमिषारण्यामध्यें वास्तव्य करूं लागला असतां सर्व भूपतींनीं त्याच्याकडे नजराणे आणिले, व त्या भूपतींचा रामानेंही उलट सत्कार केला; म्हणजे अन्न, पान वगैरे सेवन करण्यास योग्य असलेले पदार्थ, वस्त्रें आणि सर्व उपकरणें त्यांना त्यानें अर्पण केलीं. राजांच्या आदरसत्काराकडे शत्रुघ्नासहवर्तमान भरताची योजना झाली होती; सुग्रीवासहवर्तमान महात्मे वानर शुद्ध राहून ब्रा-

ह्मणांना वाढीत होते; अनेक राक्षसांसहवर्तमान विभीषण अतिशय तत्पर राहून महातपस्वी ऋषींची शुश्रूषा करीत होता; आणि महाबलाढय पुरुषश्रेष्ठ राम महात्मे राजे व त्यांचे अनुयायी ह्यांच्या डेरेराहुट्यांविषयीं आज्ञा करीत होता. ह्याप्रमाणें सर्व कामांची चांगली व्यवस्था लागली असतां अश्वमेध याग सुरू झाला, आणि लक्ष्मण रक्षण करीत असतांना अश्वसंचारालाही आरंभ झाला.

अशा प्रकारचा त्या नृपश्रेष्ठ रामाचा उत्कृष्ट यज्ञ सुरू झाला असतां, "याचक संतुष्ट होईपर्यंत कोणाचेंही भय न बाळगितां इच्छेप्रमाणें त्यांना हवें तें तूं दे" ह्या शब्दांशिवाय दुसऱ्या तऱ्हेचा निषेधवाचक शब्द त्या महात्म्यांच्या मुखांतून निघालाच नाहीं. हे शब्द निघतांक्षणीं नानाप्रकारचीं शर्करायुक्त पक्वान्नें व इतरही सर्व अपेक्षित वस्तु हीं याचकांना मिळाल्याशिवाय राहिलींच नाहींत. कारण, याचकांच्या ओंठाबाहेर शब्द निघाला नाहीं तोंच वानरांनीं व राक्षसांनीं ती ती वस्तु त्यांना अर्पण केलेलीच दृष्टीस पडत असे. राजाच्या त्या—तुष्ट व पुष्ट जनांनीं व्याप्त झालेल्या—श्रेष्ठ यज्ञांत मलिन, दीन अथवा कृश कोणीच नव्हता. जे महात्मे चिरजीवी मुनि त्या ठिकाणीं आलेले होते, त्यांच्याही स्मरणांत दानसमुदायांनीं अलंकृत झालेला तशा प्रकारचा यज्ञ नव्हता. ज्याला सुवर्णाची अपेक्षा असे, त्याला सुवर्ण मिळत असे; ज्याला द्रव्याची इच्छा असे, त्याला द्रव्यलाभ होत असे; आणि रत्नार्थी पुरुषाला रत्नप्राप्ति होत असे. रुपें, सोनें, रत्नें व वस्त्रें ह्यांचें दान एकसारखें चाललें असल्यामुळें त्यांचे ढीगच तेथें दृष्टीस पडत होते. "इंद्र, चंद्र, यम व वरुण ह्यांपैकीं सुद्धां अशा प्रकारचा यज्ञ पूर्वी कोणाच्या हातून झाल्याचें आम्हीं पाहिलें नाहीं" असें तपस्वी म्हणूं लागले. हातांत पदार्थ घेऊन वानर व राक्षस सर्व ठिकाणीं उभे होते; आणि वस्त्रें, धन व अन्न मागणाऱ्या याचकांना ते एकसारखे देत होते. असो. ह्याप्रमाणें त्या नृपश्रेष्ठ रामाचा सर्वगुणसंपन्न अश्वमेध यज्ञ पूर्ण संवत्सर लोटेपर्यंत कधी न होतां उत्तरोत्तर चांगल्या रीतीनें चालला होता.

## सर्ग त्र्याण्णवावा.

—:०:—

### सभेमध्यें रामायणगान करण्याविषयीं वाल्मीकींची कुशलवांना आज्ञा.

तशा प्रकारचा तो अत्यंत अद्भुत यज्ञ सुरू झाला असतां भगवान वाल्मीकि ऋषि त्वरेत्वरेनें तेथें आले; अद्भुत दिसणारा तो दिव्य यज्ञ अवलोकन केल्यावर त्यांच्या बरोबर असलेल्या ऋषिगणांनीं एका बाजूला पवित्र झोंपड्या तयार केल्या; आणि अन्नादिकांनीं भरलेले अनेक गाडे व उत्कृष्ट फुलें आणि मूलें ही वाल्मीकि महर्षींच्या मनोहर मार्गासंनिध जवळच त्यांनीं आणून ठेविलीं. तेव्हां ते वाल्मीकि आपल्या आनंदित झालेल्या दोन शिष्यांना म्हणाले, "तुम्ही जा, आणि अवधान देऊन मोठ्या आनंदानें संपूर्ण रामायण काव्य गा. ऋषींचीं पवित्र स्थानें, ब्राह्मणांचीं वसतिस्थानें, उपमार्ग, राजमार्ग, राजांचीं गृहें, रामाचें निवासस्थान, आणि जेथें अनुष्ठान चाललें आहे तेथें ऋत्विजांसमोर इतक्या ठिकाणीं तुम्ही विशेषतः गायन करीत जा. पर्वतशिखरावर उत्पन्न झालेलीं हीं नानाप्रकारचीं स्वादिष्ट फलें सेवन करून तुम्ही गायन करीत जा. वत्सहो, फलें व निर्मल मूलें सेवन केल्यानें तुम्हांला श्रम होणार नाहींत, व तुमच्या स्वरालाही कमीपणा येणार नाहीं. ऋषि बसले असतांना जर भूपति रामानें तुमचें गायन ऐकण्याकारितां तुम्हांला बोलाविलें, तर तुम्ही उभयतां मेळ बसवून गात जा. नानाप्रकारच्या श्लोकसंख्यांनीं युक्त असे जे रामायणांतील सर्ग

मीं पूर्वी तुम्हांला सांगितले आहेत, त्यांपैकीं वीस सर्ग तुम्हीं प्रत्येक दिवशीं मधुर वाणीनें गात जा. परंतु धनाचा अभिलाष धरून यत्किंचित्‌ही लोभ दाखवूं नका. कारण, सर्वदा फलमूलांवर उपजीविका करणाऱ्या आश्रमवासी जनांना धनाशीं काय कर्तव्य आहे ? तुम्ही कोणाचे मुलगे असा जर रामानें तुम्हांला प्रश्न केला, तर 'वाल्मीकीचे दोन शिष्य' असें तुम्ही त्या राजाला उत्तर द्या. मधुर स्वर काढणाऱ्या ह्या तारा, व अपूर्व स्वर ज्या ठिकाणीं निवत असतात असें तारांना आधारभूत असलेलें स्थान ह्या दोन्ही ठिकाणीं नाद काढून तुम्ही निशःकपणें अत्यंत मधुर गायन करीत जा. आरंभापासून तुम्ही गा; परंतु राजा समीप असतांनाही, दुसऱ्या ठिकाणीं असल्याप्रमाणें हातापायांचे वगैरे यथेष्ट चाळे करून त्याचा अवमान करूं नका. कारण, धर्मदृष्टीनें पाहूं गेलें असतां राजा सर्व प्राण्यांचा पिता आहे. ह्यास्तव, तुम्ही उद्यांक प्रभातकालीं स्वरांचा मेळ बसेल अशा रीतीनें उल्हासपूर्वक स्वस्थ चित्तानें मधुर गायन करा."

ह्याप्रमाणें त्या मुनींनीं वारंवार त्यांना बजाविलें, आणि नंतर ते परम उदार वाल्मीकि महर्षि स्वस्थ बसले. तेव्हां 'आम्ही असें करूं' इतकें सांगून शत्रूंचें दमन करणारे ते उभयतां सीताकुमार पर्णकुटिकेंतून बाहेर पडले. सारांश, शुक्राचार्यांनीं पढविलेली नीतिसंहिता लक्ष्यांत ठेवणारे अश्विनीकुमारच कीं काय अशा त्या कुमारांनीं ऋषींनीं उच्चारलेली ती अद्‌भुत वाणी लक्ष्यांत ठेविली, आणि गायनाविषयीं अतिशय उत्सुक होऊन त्यांनीं ती रात्र आनंदांत काढली.

## सर्ग चौऱ्याण्णवावा.

--:०:--

### रामायणश्रवण.

रात्र उजाडल्यानंतर त्या उभयतां कुमारांनीं स्नान करून अग्नीमध्यें होम दिला, आणि वाल्मीकि मुनींनीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्या ठिकाणीं यांनीं तें सर्व गाऊन दाखविलें. प्राचीन आचार्यांनीं जी निर्माण केली आहे, जी पूर्वी कधीं ऐकण्यांत आलेली नाहीं, गायनधर्मांनें जी अलंकृत आहे, अनेक प्रमाणांनीं जी बद्ध आहे, व स्वरांचें जिच्यामध्यें संमेलन आहे, अशी ती गायनपद्धति बालकांपासून श्रवण केल्यानंतर रामाला उत्सुकता प्राप्त झाली. नंतर, अनुष्ठानामध्यें वेळ सांपडला असतां राजानें महर्षि, राजे व वेदवेत्ते ह्यांना बोलावून आणिलें; आणि त्याचप्रमाणें पौराणिक, शब्दवेत्ते वृद्ध द्विज, स्वरलक्षणें जाणणारे उत्सुक द्विजश्रेष्ठ, सामुद्रिक जाणणारे, संगीतशास्त्रवेत्ते, विशेषतः पौरजन, चरणांतील अक्षरांचा संबंध जाणणारे, छंदःशास्त्रामध्यें निपुण, स्वरमात्रांचे विभाग जाणणारे, ज्योतिःशास्त्रपारंगत, अनुष्ठान व कल्पसूत्र जाणणारे, अनुष्ठानांतील न्यूनाधिक्य जाणणारे, व्यवहारामध्यें युक्ति योजण्याविषयीं कुशल, तार्किक, बहुश्रुत, वेदवेत्ते, पुराणज्ञ, वैदिक द्विजश्रेष्ठ, आश्चर्यकारक श्लोक करण्यामध्यें निपुण, धर्मशास्त्रवेत्ते आणि गायनांत व नृत्यांत निपुण ह्या सर्वांना त्यानें बोलावून आणिलें, व त्यांमध्यें ते गवई त्यानें बसविले. श्रोते येऊन बसल्यानंतर, मनुष्यलोकीं ज्याचा अभाव आहे असें तें मधुर गायन सुरू झालें असतां त्यांतील गुणसमृद्धीमुळें कोणालाही तें पुरेसें झालें नाहीं. सर्व मुनिगण आणि महाबलाढ्य राजे आनंदित झाले, आणि नेत्रांनीं त्या कुमारांना प्राशन करूनच टाकीत आहेत कीं काय इतक्या उत्सुकतेनें ते एकसारखे त्यांच्याकडे पाहूं लागले. नंतर, लक्ष्य लावून ऐकत बसलेले ते सर्वजण आपआपसांत म्हणूं लागले कीं, "बिंबापासून काढलेलें प्रतिबिंबच कीं काय असे हे उभयतां कुमार अगदीं रामासारखे दिसत आहेत. फार कशाला ? ह्या गाणाऱ्या कुमारांनीं जर जटावल्कलें धारण

केलीं नसतीं, तर रामांत आणि ह्या कुमारांत आम्हांला कांहींएक भेद आढळून आला नसता."

ह्याप्रमाणें नगरांतील व देशांतील लोकांचें आपआपसांत संभाषण चाललें आहे तोंच नारद मुनींनीं दर्शविलेला सर्ग प्रथम म्हणून तेथून वीस सर्ग होत तोंपर्यंत त्यांनीं अनुक्रमानें सर्ग गाऊन दाखविले. असो. ते वीस सर्ग श्रवण केल्यानंतर अपराह्णकाल झाला, तेव्हां भ्रातृवत्सल राम भ्रात्याला म्हणाला, "ह्या महात्म्यांना तूं सत्वर अठरा हजार मोहोरा दे, आणि दुसरें जें त्यांना हवें असेल तें तूं दे."

ही रामाची आज्ञा होतांक्षणीं त्या काकुत्स्थानें त्या बालकांपैकीं प्रत्येकाला तितकें द्रव्य सत्वर दिलें; तथापि तो सुवर्ण देऊं लागला असतां कुशलवांनीं तें स्वीकारलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर विस्मयचकित होऊन ते महात्मे म्हणाले, "ह्याचा आम्हांला उपयोग काय? वनांतील फलें व मूलें ह्यांवर उपजीविका करण्याविषयीं तत्पर असून वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या आम्हांला ह्या सुवर्णरूप द्रव्याचा वनांत काय उपयोग आहे?"

ह्याप्रमाणें ते भाषण करीत असतांना, उत्सुकतेनें श्रवण करीत असलेले ते सर्व श्रोते रामासुद्धां अतिशय विस्मित झाले; आणि तें काव्य त्यांना कसें प्राप्त झालें हें ऐकण्याविषयीं उत्सुक झालेला तो महातेजस्वी राम त्या उभयतांना म्हणाला, "हें काव्य किती आहे? हें रचणाऱ्या महात्म्या कवीचें निवासस्थान कोणतें? ह्या महाकाव्याचा कर्ता कोण आहे? आणि तो मुनिश्रेष्ठ सांप्रत कोठें आहे?"

असें राम विचारूं लागला असतां ते त्याला म्हणाले, "ज्या काव्यांत तुझें हें चरित्र पूर्ण दर्शविलें आहे, त्या ह्या काव्याचें कर्तृत्व भगवान वाल्मीकि मुनींकडे असून ते यज्ञभूमीमध्यें आले आहेत. त्या तपस्वी कवीनें चोवीस हजार श्लोक ग्रथिले असून शंभर उपाख्यानें ह्या काव्यांत ग्रथिलीं आहेत. राजा, आमचा गुरु जो ऋषि, त्या महात्म्यानें तुझ्या चरित्राला उद्देशून प्रथमपासून सहा कांडें सातव्या उत्तरकांडासहवर्तमान रचिलीं आहेत, व एकंदर पांचशें सर्ग केले आहेत; आणि तुझ्या आयुष्यांतील सर्व गोष्टी ह्या काव्यामध्यें ग्रथित केल्या आहेत. हें श्रवण करण्याची जर तुला इच्छा झाली असेल, तर फावल्या वेळीं तूं कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान स्वस्थ मनानें हें ऐकून घे."

ह्यावर "होय" असें रामानें म्हटलें असतां त्या रघुवंशजांनीं रामाची अनुज्ञा घेतली, आणि मुनिश्रेष्ठ वाल्मीकि ज्या ठिकाणीं होते, त्या ठिकाणीं ते आनंदित होऊन गेले. नंतर रामही मुनि व महात्मे राजे ह्यांसह कर्मशालेमध्यें गेला.

## सर्ग पंचाणवावा.

—:०:—

### रामाचा वाल्मीकि मुनींना निरोप.

धर्मात्म्या रामानें अनेक दिवसपर्यंत मुनि, राजे व वानर ह्यांसहवर्तमान तें उत्कृष्ट शुभ गीत श्रवण केलें, आणि तें गीत चाललें असतांना, कुशलव हे सीतेचे पुत्र आहेत असें समजल्यावर रामानें त्या सभेमध्यें त्यांसंबंधानें भाषण केलें; प्रथमतः आपल्याच बुद्धीनें तो राम आचरणानें शुद्ध असलेले दूत बोलावून त्यांना म्हणाला, "तुम्ही भगवान वाल्मीकि मुनींकडे जा, आणि त्यांना माझा असा निरोप कळवा कीं, 'सीतेचें आचरण जर स्वाभाविकच शुद्ध असेल, अथवा आश्रमांत वास्तव्य केल्यामुळें ती जर निर्दोष झाली असेल, तर महर्षींची अनुज्ञा घेऊन तिनें आपल्या शुद्धीविषयीं येथें शपथ करावी.' असा भगवान वाल्मीकि मुनींना निरोप कळवून त्या मुनींचा व सीतेचा अभिप्राय तुम्ही समजून घ्या; आणि ती जर आपल्या आचरणाविषयीं खात्री करून देण्यास तयार असेल,

तर तसें मला त्वकर येऊन कळवा. उदयीक प्रभातकाळीं जनककन्या मैथिलीनें सभेमध्यें स्वतः-वरील व माझ्यावरील अपवाद दूर करण्याकरितां शपथ करावी."

रामाचें हें अत्यंत अद्भुत भाषण श्रवण केल्यानंतर दूत "आज्ञा" असें म्हणाले, आणि मुनिश्रेष्ठ वाल्मीकींकडे गेले. तेथें गेल्यानंतर त्या महातेजस्वी, उज्ज्वल व महात्म्या वाल्मीकि मुनींना त्यांनीं प्रणाम केला, आणि रामाचे सौम्य व मधुर शब्द त्यांनीं त्यांना सांगितले. तेव्हां त्यांचें तें भाषण श्रवण करून व रामाचा अभिप्राय जाणून ते महातेजस्वी ऋषि म्हणाले, "तुमचें देव बरें करो, असें होईल. राम जसें म्हणत आहे तसें सीता करील. कारण, पति हेंच स्त्रीचें दैवत होय."

ह्याप्रमाणें वाल्मीकि मुनींनीं सांगितलें असतां ते सर्व महावेगवान दूत रामाकडे आले, व त्यांनी तें मुनींचें सर्व भाषण रामाला कळविलें. तेव्हां महात्म्या वाल्मीकि महर्षीचें म्हणणें श्रवण केल्यानंतर तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम आनंदित झाला, आणि तेथें जुळलेल्या ऋषींना व राजांना अनुलक्षून म्हणाला "शिष्यांसहवर्तमान आपण भगवानांनीं, अनुयायांसहवर्तमान राजांनीं, व दुसऱ्या कोणाला इच्छा असल्यास त्यानेंही सीतेची शपथ पहावी."

महात्म्या राघवाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर "उत्तम उत्तम" असे शब्द सर्व श्रेष्ठ ऋषींच्या मुखांतून उच्च स्वरानें निघाले; आणि "हे पुरुषश्रेष्ठा, पृथ्वीमध्यें तुझ्याच ठिकाणीं हें संभवनीय आहे; इतराच्या ठिकाणीं हें संभवनीय नाहीं" असें म्हणून ते महात्म राजे रामाची प्रशंसा करूं लागले. ह्याप्रमाणें निश्चय केल्यानंतर "उदयीक ही गोष्ट घडेल" असें सांगून शत्रुनाशक रामानें त्या सर्वांना जाण्याविषयीं निरोप दिला. सारांश, उदयीक शपथेचा निर्णय होईल असा विचार करून त्या महापराक्रमी व महात्म्या नृपश्रेष्ठ रामानें त्या सर्व महात्म्या मुनींना व राजांना जाण्याविषयीं निरोप दिला.

## सर्ग शहाण्णवावा.

—:०:—

### वाल्मीकींचें सीतेच्या शुद्धतेविषयीं भाषण.

ती रात्र उजाडल्यानंतर तो महातेजस्वी राम यज्ञमंडपामध्यें गेला, आणि त्यानें सर्व ऋषींना बोलावून आणिलें. तेव्हां वसिष्ठ, वामदेव, जाबालि, काश्यप, विश्वामित्र, दीर्घतमा, महातपस्वी दुर्वास, पुलस्त्य, शक्ति, भार्गव, वामन, दीर्घायु मार्कंडेय, महायशस्वी मौद्गल्य, गर्ग, च्यवन, धर्मवेत्ता शतानंद, तेजस्वी भरद्वाज, अग्निपुत्र सुप्रभ, नारद, पर्वत व महायशस्वी गौतम हे आणि इतरही उज्ज्वल तपश्चर्या करणारे मुनि उत्सुकता उत्पन्न झाल्यामुळें तेथें आले; महावीर्यवान राक्षस व महाबलाढय वानर हेही सर्व महात्मे उत्सुकतेनें तेथें आले; आणि त्याचप्रमाणें हजारों क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अनेक देशांहून आलेले सदाचरणसंपन्न ब्राह्मण हेही सर्व सीतेची शपथ अवलोकन करण्याकरितां तेथें आले. तेव्हां सर्व समाज येऊन पाषाणाप्रमाणें स्तब्ध बसला आहे असें श्रवण केल्यावर मुनिश्रेष्ठ वाल्मीकि सीतेसहवर्तमान सत्वर तेथें आले. सीता ही रामाची मूर्ति मनांत आणून, हात जोडून व मान खालीं घालून त्या ऋषींच्या मागून येत होती, व त्या वेळीं तिच्या नेत्रांतून अश्रु चालले होते! ब्रह्मदेवाच्या मागोमाग जाणाऱ्या श्रुतीप्रमाणें वाल्मीकि मुनींच्या मागून येत असलेली सीता दृष्टीस पडतांक्षणीं "शाबास शाबास" असा शब्द उच्च स्वरानें जिकडे तिकडे होऊं लागला; आणि नंतर दुःखाच्या उत्पत्तीमुळें वृद्धिंगत झालेल्या शोकानें सर्वांचें मन व्याकुल होऊन गेल्यामुळें सर्वांच्याच मुखांतून "हाय, हाय! अरेरे" असे

उद्गार निघूं लागले! "शाबास रामा" असें कांहींजण म्हणूं लागले; "शाबास सीते!" असेही शब्द कांहीं लोक उच्चारूं लागले; आणि कांहीं प्रेक्षकजन तर त्या उभयतांचीही उच्च स्वरानें प्रशंसा करूं लागले.

नंतर वाल्मीकि मुनि सीतेला बरोबर घेऊन त्या जनसमूहामध्यें प्रविष्ट झाले, आणि रामाला म्हणाले, "हे दाशरथे, लोकापवादाकरितां माझ्या आश्रमासमीप जिचा तूं त्याग केलास, ती ही धर्मानें वागणारी पतिव्रता सीता. लोकापवादाची भीति बाळगणाऱ्या तुझी खात्री करण्यास ही तयार आहे. तूं तिला अनुज्ञा दे. जुळे झालेले हे उभयतां जानकीनंदन तुझेच अजिंक्य पुत्र आहेत हें मी तुला सत्य सांगतों. हे रघुवंशजा, मी प्रचेतसाचा दहावा पुत्र आहें. अनृत भाषण केल्याचें मला कधीं स्मरत नाहीं. हे पुत्र तुझे आहेत. ही मैथिली जर दोषयुक्त असेल, तर अनेक सहस्त्र वर्षेंपर्यंत जी मीं तपश्चर्या केली आहे तिचें फल मला प्राप्त होणार नाहीं! मैथिली जर पापरहित असेल, तरच, आजपर्यंत जें कायिक, वाचिक व मानसिक पातक माझ्या हातून घडलें नाहीं त्याचें फल मला प्राप्त होईल! राघवा, सीता शुद्ध आहे असा पांच ज्ञानेंद्रियें व सहावें मन ह्यांच्या योगानें माझा निश्चय झाल्यावर वनांतील जलप्रवाहासमीप मीं हिचा स्वीकार केला. ह्या सीतेचें आचरण शुद्ध आहे; ही पापरहित आहे; आणि पति हेंच हिचें दैवत आहे. लोकापवादाला भ्यालेल्या तुझी खात्री ही करून देईल. सारांश, हे राजपुत्रा, ही सीता अंतःकरणानेंही शुद्ध आहे असें दिव्य ज्ञानानें मला कळून आलें आहे, व ही प्रियतमा शुद्ध आहे असें तुला समजलें असूनही लोकापवादामुळें तुझें अंतःकरण कलुषित झाल्या कारणानें तूं हिचा त्याग केला आहेस!"

# सर्ग सत्याण्णवावा.

—:०:—

## सीतेची शपथ व तिचा भूप्रवेश.

वाल्मीकि मुनींनीं असें सांगितलें असतां जनसमूहामध्यें असलेली ती श्रेष्ठ सीता अवलोकन करून रामानें हात जोडिले, व तो म्हणाला, "हे महाभाग्यवान धर्मज्ञ मुने, हें आपलें म्हणणें बरोबर आहे. ब्रह्मन्, आपल्या निष्कलंक शब्दांनीं माझी खात्री झाली आहे. पूर्वी देवांचे संनिध सीतेची शपथ होऊन माझी खात्री झाली, व नंतर मीं तिला घरांत येण्याची अनुज्ञा दिली. परंतु लोकापवाद दुस्तर आहे असें समजून मीं मैथिलीचा त्याग केला! मुनिश्रेष्ठा, ही मिथिलकन्या सीता निष्पाप आहे असें विदित असूनही लोकापवादाच्या भयामुळें मीं हिचा त्याग केला. ह्यास्तव, ह्या अपराधाबद्दल आपण मला क्षमा करावी. जुळे झालेले हे पुत्र कुशलव माझे आहेत हेंही मी जाणून आहें. ह्यास्तव, जगतामध्यें शुद्ध ठरलेल्या सीतेचे ठिकाणीं माझें प्रेम असो."

रामाचा अभिप्राय जाणून सीतेच्या त्या शपथप्रसंगीं सर्व सुरश्रेष्ठही तेथें आले. ब्रह्मदेवाला पुढें करून आदित्य, वसु, रुद्र, विश्वेदेव आणि मरुद्गण हे सर्व तेथें आले; आणि सर्व साध्यदेव, सर्व महर्षि, नाग, सुपर्ण आणि सिद्ध हेही सर्व आनंदित होऊन तेथें आले. तेव्हां देव आणि ऋषि ह्यांना अवलोकन करून पुरुषश्रेष्ठ राम पुनरपि म्हणाला, "निष्कलंक ऋषिवचनांवरून माझी खात्री झाली आहे. ह्यास्तव, जगतामध्यें शुद्ध ठरलेल्या वैदेहीचे ठिकाणीं माझें प्रेम असो."

हें रामाचें भाषण झाल्यानंतर, तेथें आलेले देवप्रभृति सर्व प्राणी सीतेच्या शपथसमयीं आश्चर्यचकित झाले. नंतर, दिव्य गंधानें युक्त, शुभ, पवित्र व मनोहर अशा सुरश्रेष्ठ वायूनें त्या सर्व जनसमुदायाला सर्व प्रकारें आनंद दिला. तेव्हां

कृतयुगाप्रमाणें तें दिव्य वायूचें अद्‌भुत आणि अचिंत्य वाहणें सर्व राष्ट्रांपासून आलेले लोक लक्ष्यपूर्वक अनुभवूं लागले.

नंतर, चतुर्दश भुवनांतील सर्व लोक एकत्र जुळलेले अवलोकन करून, काषायवस्त्र परिधान केलेल्या सीतेनें हात जोडिले; आणि खालीं पहात पहात ती म्हणाली, "रघूत्तम रामाशिवाय मीं जर इतर पुरुष मनांत आणिला नसेल, तर ही विष्णुपत्नी भूदेवी मला विवर देईल. मनानें, कायेनें व वाचेनें जर मी रामाचेंच आराधन करीत असेन, तर ही विष्णुपत्नी भूमाता मला द्वार देईल. रामाशिवाय दुसऱ्या पुरुषाची मला ओळखही नाहीं हें जर माझें म्हणणें सत्य असेल, तर ह्या विष्णुपत्नी भूमीनें मला प्रवेश करण्यास मार्ग द्यावा."

ह्याप्रमाणें सीता शपथ करूं लागली असतां भूतलापासून निघालेलें एक दिव्य, अनुपम व अद्‌भुत सिंहासन तेथें दृष्टीस पडूं लागलें. तें दिव्य सिंहासन दिव्य देह धारण केलेल्या व दिव्य रत्नांनीं अलंकृत झालेल्या अमितपराक्रमी नागांनीं मस्तकांवर धारण केलें होतें. त्या सिंहासनावर प्रत्यक्ष भूदेवी होती. तिनें सीतेला हातांनीं उचलून घेतलें, आणि तिचें अभिनंदन करून तिला सिंहासनावर बसविलें. नंतर ती सीता सिंहासनावर बसून रसातलामध्यें प्रवेश करीत आहे असें दृष्टीस पडतांक्षणीं एकसारखी दिव्य पुष्पांची वृष्टि सीतेवर झाली! देवांमध्यें "शाबास! शाबास!" असा फारच मोठा शब्द एकाएकीं निघाला, आणि, "हे सीते, ज्या तुझें आचरण अशा प्रकारचें आहे, त्या तुझी धन्य असो! धन्य असो!" असे नानाप्रकारचे शब्द, सीतेचा प्रवेश अवलोकन करितांक्षणीं अंतरिक्षांत असलेल्या देवांनीं हर्षयुक्त मनानें उच्चारले! यज्ञमंडपामध्यें असलेले ते सर्व मुनि व पुरुषश्रेष्ठ राजे न थांबतां एकसारखें आश्चर्यच करीत राहिले; अंतरिक्षामध्यें व भूमीवर असलेले सर्व चराचर प्राणी, महादेहधारी दानव, आणि पातालामध्यें वास्तव्य करणारे नागराज हेही सर्व आश्चर्यच करीत राहिले; कांहीं लोक आनंदानें गर्जना करूं लागले; कांहींजण विचारच करीत बसले; कांहीं रामाकडेच पाहूं लागले; आणि कांहींची मति गुंग होऊन गेल्यामुळें ते सीतेसंबंधानेंच विचार करीत राहिले. सीतेचा भूप्रवेश अवलोकन केल्यानंतर, मुनिप्रभृतींचा जो तेथें परस्पर समागम झाला, त्याच्या योगानें सर्व जगत् एक मुहूर्तपर्यंत मोहितच झाल्यासारखें दिसूं लागलें!

## सर्ग अठ्ठ्याण्णवावा.

—:०:—

### रामाचा शोक व कोप.

विदेहराजकन्या सीता रसातलामध्यें प्रविष्ट झाली असतां, "हे साध्वि, शाबास! शाबास!" म्हणून सर्व वानर आणि मुनि रामाचे संनिध आक्रोश करूं लागले. तेव्हां दंडरूप काष्ठावर रेलून रामानें मस्तक खालीं घातलें; त्याचें मन खिन्न झालें; आणि अत्यंत दुःख झाल्यामुळें नेत्रही अश्रूंनीं भरून आले. पुढें एकसारखे अश्रु ढाळीत ढाळीत पुष्कळ वेळपर्यंत रुदन केल्यानंतर क्रोध व शोक ह्यांनीं व्याप्त झालेला तो राम म्हणाला, "ज्या अर्थीं मूर्तिमती श्रीच असलेली सीता माझ्या समक्ष नाहींशी झाली आहे, त्या अर्थीं पूर्वीं कधींही न अनुभविलेल्या शोकसागरामध्यें माझें मन जसें काहीं मग्न होऊन जाणार आहे! पूर्वीं महासागराचे परतीरीं लंकेमध्यें रावणानें नेऊन ठेविल्यामुळें माझ्या दृष्टीआड झालेली सीता तेथूनही जर मीं आणिलेली आहे, तर भूतलापासून तिला परत आणणें मला काय कठिण आहे! हे भूदेवि, माझी सीता तूं परत दे; नाहीं तर तूं मला जाणून आहेस त्याप्रमाणें

मी तुला क्रोध दाखवीन. खरोखर तूं माझी सासू आहेस. कारण, नांगराचा फाळ घेऊन जनक पूर्वी नांगरीत असतांना त्यानें तिला तुझ्यापासून बाहेर काढिलें. तस्मात्, सीता तरी मला परत दे, किंवा तिच्याप्रमाणें तूं मलाही प्रवेश करण्यास मार्ग दे. ती पातालामध्यें असो किंवा स्वर्गामध्यें जावो, मी तिच्यासहवर्तमान वास्तव्य करणार! त्या सीतेला तूं आणून दे; मैथिलीकरितां सांप्रत मी मत्त झालों आहें. हे भूदेवि, माझी जशी होती तशी सीता तूं जर मला परत न देशील, तर पर्वत व वनें ह्यांसहवर्तमान तुझ्या संपूर्ण रूपाला मी पीडा देईन. मी भूमीचा नाश करून टाकीन; येथें सर्वत्र उदकच झालें तरी चिंता नाहीं!"

### ब्रह्मदेवमुखें रामसांत्वन.

ह्याप्रमाणें क्रोध व शोक ह्यांनीं व्याप्त झालेला तो राम बोलूं लागला असतां देवगणांसहवर्तमान ब्रह्मदेव त्याला म्हणाला, "रामा, हे सुव्रता, तूं क्रोध करूं नको; हे शत्रुनाशका, पूर्वीचें स्वरूप आणि ठरलेला विचार तूं लक्ष्यांत आण. हे महापराक्रमी पुरुषश्रेष्ठा, मीं तुला स्मरण केलें पाहिजे असें नाहीं. ह्या बिकट प्रसंगीं आपल्या वैष्णव अवताराची तूं आठवण कर. पूर्वी तुला आश्रयभूत असलेली साध्वी सीता निर्मल आहे; आणि तुझा आश्रय करून राहणें हेंच जें तप, त्या तपाच्या सामर्थ्यानें ती सुखानें नागलोकीं गेली आहे. स्वर्गामध्यें हिचा तुझ्याशीं पुनरपि समागम होईल ह्यांत संशय नाहीं. ह्या सभेमध्यें मी जें सांगत आहें तें तूं लक्ष्यांत ठेव. काव्यामध्यें उत्कृष्ट असें हेंच तूं श्रवण केलेलें काव्य असून, ह्या काव्यानेंच तुझ्या सर्व चरित्राचें स्पष्टीकरण होईल ह्यांत संशय नाहीं. हे वीरा, जन्मापासून जें कांहीं तुला सुख व दुःख भोगावें लागलें आहे, व पुढें तुझ्या चरित्रामध्यें जें कांहीं घडून येणार आहे, तें सर्व वाल्मीकि मुनीनें ह्या काव्यांत ग्रथित केलें आहे. रामा, हें आदिकाव्य सर्व तुझ्याच आधारावर आहे. कारण, काव्यांमध्यें ज्याची कीर्ति होणें योग्य आहे असा रघुवंशज रामावांचून दुसरा कोणी नाहीं. देवांसहवर्तमान मीं पूर्वी तुझें सर्व दिव्य, अद्भुत व निष्कपट सत्य भाषण श्रवण केलें आहे. हे पुरुषश्रेष्ठा, धर्माकडे लक्ष्य देऊन तूं स्वस्थ हो, आणि अवशिष्ट राहिलेलें भविष्य काव्य रामायण तूं श्रवण कर. हे महायशस्वी रामा, उत्तर म्हणून जो ह्या काव्याचा उत्कृष्ट शेष राहिला आहे, तो तूं ऋषींसहवर्तमान श्रवण कर. हें उत्कृष्ट काव्य इतरानें श्रवण करणें योग्य नाहीं. हे रघुनंदना वीरा, महर्षींप्रमाणें असलेल्या तुलाच हें श्रवण केलें पाहिजे."

इतकें सांगून त्रैलोक्यपति ब्रह्मदेव बांधवांसहवर्तमान देवांना बरोबर घेऊन स्वर्गलोकीं गेला. परंतु ब्रह्मलोकीं वास्तव्य करणारे जे महात्मे व तेजस्वी ब्रह्मर्षि त्या ठिकाणीं होते, ते ब्रह्मदेवाची अनुज्ञा घेऊन अवशिष्ट राहिलेलें रामायण श्रवण करण्याकरितां परत आले. तदनंतर, देवाधिदेव ब्रह्मदेवानें उच्चारलेली शुभ वाणी श्रवण करून महातेजस्वी राम वाल्मीकि महर्षींना म्हणाला, "भगवन्, ब्रह्मलोकीं वास्तव्य करणाऱ्या ऋषींना माझें पुढलें चरित्र म्हणजे उत्तर रामायण श्रवण करण्याची इच्छा आहे. ह्यास्तव, उद्यीक त्या भागाला आरंभ व्हावा."

ह्याप्रमाणें ठरवून त्यानें कुशलवांचा अंगीकार केला; त्या जनसमाजाला जाण्याची अनुज्ञा देऊन तो पुत्रांसहवर्तमान वाल्मीकि मुनींच्या पर्णकुटिकेमध्यें गेला; आणि सीतेच्या शोकामध्येंच त्यानें ती रात्र घालविली.

## सर्ग नव्याण्णवावा.

—:०:—

### श्रीरामाचे यज्ञ.

रात्र उजाडल्यावर महर्षींना बोलावून आणि-

त्यानंतर, " तुम्ही निःशंकपणें गा " असें रामानें पुत्रांना सांगितलें. नंतर, महात्मे महर्षि बसले असतांना उत्तर म्हणून प्रसिद्ध असलेलें भविष्य काव्य त्या कुशलवांनीं गाइलें. सत्याच्या सामर्थ्यानें सीता भूतलांत प्रविष्ट झाली असतां, तो यज्ञ समाप्त झाल्यावर रामाचें मन अतिशय खिन्न झालें; वैदेही दृष्टीआड झाल्यामुळें त्याला हें सर्व जगत् शून्य दिसूं लागलें; आणि तो अतिशयच शोकाकुल झाल्यामुळें त्याचें मन अस्वस्थ झालें. सर्व राजे, ऋक्ष, वानर व राक्षस ह्यांना निरोप देऊन श्रेष्ठ ब्राह्मणांच्या समाजालाही त्यानें द्रव्यदानपूर्वक जाण्याची अनुज्ञा दिली; आणि त्या सर्वांना अनुज्ञा दिल्यानंतर सीतेचें चिंतन करीत करीत तो अयोध्येंत प्रविष्ट झाला. त्या रघुनंदनानें जानकीशिवाय दुसऱ्या भार्येचा स्वीकार केला नाहीं; प्रत्येक यज्ञाचे प्रसंगीं पत्नीकरितां तो सुवर्णाची सीता करीत असे. दहा हजार वर्षेंपर्यंत तो अश्वमेध करीत राहिला, आणि विपुल सुवर्णदानपूर्वक त्यानें वाजपेय क्रतु, हे अश्वमेध क्रतूंच्या दसपट केले. अग्निष्टोम, अतिरात्र व महादक्षिणायुक्त गोसव यज्ञही त्यानें केले; आणि विपुल दक्षिणेनें युक्त असे इतर क्रतुही त्यानें केले. ह्याप्रमाणें धर्मानें वागून राज्य करीत असतांना त्या महात्म्या रामाचा फारच मोठा काल लोटला. ऋक्ष, वानर व राक्षस हे त्या रघुवंशजश्रेष्ठ रामाच्या आज्ञेमध्यें होते, आणि इतर राजेही प्रत्यहीं त्याला आनंद देत असत. पर्जन्यवृष्टि वेळेवर होत असे; जिकडे तिकडे सुबत्ता असे; दिशा निर्मल असत; नगरें व प्रांत हीं तुष्ट व पुष्ट प्रजाजनांनीं व्याप्त झालेलीं असत; अकालीं मृत्यु कोणालाही येत नसे; प्राण्यांना कोणत्याही प्रकारचा रोग होत नसे; आणि राम राज्य करीत असतांना कोणताही अनर्थ गुदरत नसे.

### राममातांचें निधन.

असें होतां होतां बराच काळ लोटल्यानंतर, पुत्रपौत्रांनीं परिवेष्टित असलेली यशस्विनी राममाता कौसल्या परलोकीं गेली. तिच्या मागोमाग सुमित्रा व यशस्विनी कैकेयी ह्याही नानाप्रकारचीं धर्मकृत्यें करून स्वर्गवासी झाल्या; स्वर्गलोकीं राजा दशरथासहवर्तमान त्या सर्व महाभाग्यवती स्त्रियांची भेट होऊन त्या आनंदानें राहिल्या; आणि सर्व प्रकारच्या धर्माचरणानें मिळणाऱ्या सुखाचा त्या तेथें उपभोग घेऊं लागल्या. राम वेळोवेळीं विशेष प्रकार न करितां त्या सर्व मातांना उद्देशून तपस्वी ब्राह्मणांना मोठमोठीं दानें देत असे; पितरांना उद्देशून ब्राह्मणांना देण्यास योग्य अशा उत्कृष्ट वस्तु तो अर्पण करीत असे; आणि देवांना व पितरांना संतुष्ट करण्याकरितां तो धर्मात्मा राम अत्यंत दुस्तर यज्ञ करीत असे. ह्याप्रमाणें यज्ञांच्या योगानें नानाप्रकारचें पुण्य सर्वदा संपादन करणाऱ्या त्या रामाचीं अनेक वर्षें सुखानें गेलीं.

## सर्ग शंभरावा.

—:०:—

### भरताला पुत्रांसह गंधर्वांवर पाठविणें.

कांहीं काल लोटल्यानंतर, केकयदेशाधिपति युधाजित् राजानें, आपला गुरु जो अंगिरस मुनींचा पुत्र महातेजस्वी गार्ग्य मुनि, त्याला महात्म्या रामाकडे पाठविलें; आणि दहा हजार अश्व, ऊर्णावस्त्रें, रत्नें, उत्कृष्ट प्रकारचें अद्भुत कापड, व शुभ भूषणें असा अनुपम नजराणा त्यानें प्रेमपूर्वक रामाकडे पाठविला. महर्षि गार्ग्य हे मातुल अश्वपतीनें पाठविलेलें तें महाधन घेऊन आले आहेत असें श्रवण करितांक्षणीं, राम कनिष्ठ भ्रात्यांसहवर्तमान एक कोसपर्यंत त्यांना सामोरा गेला, आणि बृहस्पतीचें पूजन करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्यानें त्या गार्ग्य मुनींचें पूजन केलें. ह्याप्रमाणें त्या ऋषींचें पूजन करून त्या द्रव्याचा त्यानें स्वीकार केला; मातुलाचें सर्व प्रकारें कुशल-

वृत्त त्यानें विचारलें; आणि ते भगवान मुनि बसल्यानंतर तो त्यांना म्हणाला, " साक्षात् बृहस्पतीप्रमाणें वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असे आपण भगवान जें कळविण्याकरितां येथें आलां आहां, असें तें मातुलाचें म्हणणें तरी काय आहे ?"

रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर, आपलें अद्भुत कार्य सविस्तर कथन करण्याकरितां ते महर्षि रामाला म्हणाले, " हे महापराक्रमी रामा, तुझा मातुल जो युधाजित्, त्यानें तुला उद्देशून प्रेमानें काय सांगितलें आहे हें तुझी मर्जी असल्यास ऐक. सिंधुनदाच्या दोन्ही बाजूंस अतिशय सुशोभित व फलमूलांनीं भरलेला हा गंधर्व प्रदेश आहे; आणि गंधर्वराज शैलूषाचे महाबलाढ्य व युद्धनिपुण असे तीन कोटि गंधर्वपुत्र आयुधें घेऊन त्याचें रक्षण करीत आहेत. रामा, त्या गंधर्वांचा पराजय करून तें शुभ गंधर्वनगरही तूं जिंकून घे; आणि त्या देशामध्यें तूं आपलीं दोन नगरें सुव्यस्थित वशीव. त्या ठिकाणीं दुसऱ्याची गति नाहीं; व तो देश तर फार उत्तम आहे. ह्यास्तव, असें करण्याचें तूं मनामध्यें आण. मी ही तुला अहिताची गोष्ट सांगत नाहीं. "

महर्षींच्या मुखें मातुलाचें तें भाषण श्रवण केल्यानंतर राम संतुष्ट झाला; आणि " ठीक आहे " असें म्हणून त्यानें भरताकडे पाहिलें. नंतर तो राम हात जोडून त्या द्विजाला म्हणाला, " ब्रह्मर्षे, हे उभयतां कुमार त्या देशामध्यें जातील. हे उभयतां वीर तक्ष व पुष्कल भरताचे पुत्र होत. अत्यंत धर्मनिष्ठ असलेल्या ह्या पुत्रांचें संरक्षण करण्यास भरतमातुल युधाजित् सिद्ध असल्यास, भरताला पुढें करून सैन्य व अनुयायी ह्यांसहवर्तमान हे पुत्र गंधर्वपुत्रांचा वध करून दोन नगरें तेथें वसवितील; आणि तीं श्रेष्ठ नगरें वसवून त्या ठिकाणीं पुत्रांची स्थापना केल्यानंतर अतिधार्मिक भरत पुनरपि माझ्याकडे परत येईल. "

ह्याप्रमाणें ब्रह्मर्षींना सांगितल्यानंतर सैन्य व अनुयायी ह्यांसहवर्तमान भरताला जाण्याची आज्ञा देऊन रामानें त्या उभयतां कुमारांनाही अभिषेक केला. तेव्हां सौम्य नक्षत्रावर गार्ग्य मुनींना पुढें करून सैन्य व कुमार ह्यांसहवर्तमान भरत बाहेर पडला. रघुवंशज राम जिला पोहोंचविण्याकरितां लांबपर्यंत गेला अशी ती देवांनाही अजिंक्य असलेली सेना नगरांतून बाहेर पडली असतां इंद्रयुक्त देवसेनेप्रमाणें दिसूं लागली. मोठमोठे राक्षस व इतरही मांसभक्षक प्राणी रक्तप्राशनाच्या इच्छेनें भरताच्या मागोमाग गेले; गंधर्वपुत्रांचें मांस भक्षण करण्याच्या उद्देशानें अति दारुण मांसभक्षक प्राणी हजार हजार जमून निघाले; आणि हजारों सिंह, व्याघ्र, वराह व आकाशांत संचार करणारे पक्षी हेही सेनेच्या पुढें जाऊं लागले.

असो; दीड महिना लोटेपर्यंत, कांहींएक व्याधि न होतां त्या सेनेचे मार्गामध्यें मुक्काम झाले, आणि तुष्ट व पुष्ट जनांनीं व्याप्त असलेली ती सेना दीड महिना लोटल्यानंतर केकय देशाला गेली.

## सर्ग एकशें पहिला.

—:०:—

### गंधर्वांचा पराजय व भरतपुत्रांची नगरस्थापना.

सेनापति भरत त्या मुनींसहवर्तमान आल्याचें श्रवण करून केकयदेशाधिपति युधाजिताला पराकाष्ठेचा आनंद झाला, व तो केकयराज प्रचंड जनसमूह बरोबर घेऊन त्वरेनें गंधर्वांवर निघाला. भरत व युधाजित् शीघ्र गमन करणाऱ्या योद्धयांना बरोबर घेऊन सैन्य व अनुयायी ह्यांसहवर्तमान गंधर्वनगराप्रत आले; आणि भरत प्राप्त झाल्याचें श्रवण करतांच ते महावीर्यवान गंधर्वही युद्धाकरितां एकत्र जमून सर्व बाजूंनीं गर्जना करूं लागले. तदनंतर, शरीरावर रोमांच उठवि-

णारें तुमल युद्ध सुरू झालें; परंतु तें महाभयंकर युद्ध सात दिवस सुरू राहिलें तरी उभयतांपैकीं कोणाचाच जय झाला नाहीं. शोणितरूप द्रवानें युक्त असलेल्या नद्या चोहोंकडे वाहूं लागल्या; नरदेह त्यांतून वाहून जाऊं लागले; आणि खड्ग, शक्ति व चाप हे मकर त्यांमध्यें संचार करूं लागले. नंतर रामानुज भरत क्रुद्ध झाला, व कालाचें संवर्त म्हणून अतिभयंकर अस्त्र त्यानें गंधर्वांवर सोडलें! तेव्हां संवर्त नामक कालपाशानें बद्ध व विदीर्ण झालेल्या त्या तीन कोटि गंधर्वांचा एका क्षणांत त्या महात्म्या भरतानें वध केला! अशा प्रकारें, महात्मे तीन कोटि गंधर्व ज्यामध्यें एका क्षणांत वध पावले, असें भयंकर युद्ध पूर्वी कधीं अवलोकन केल्याचें देवांना स्मरलेंही नाहीं!

ह्याप्रमाणें त्या सर्वांचा वध झाला असतां कैकेयीपुत्र भरतानें त्या ठिकाणीं धनधान्यांनीं समृद्ध व उत्कृष्ट अशीं दोन पुरें वसविलीं; व त्या मनोहर गंधर्वदेशांतील तक्षशिला नगरीमध्यें आपल्या तक्षसंज्ञक पुत्राची स्थापना करून गांधार देशांतील पुष्कलावत नगरामध्यें त्यानें आपल्या पुष्कल नामक पुत्राची स्थापना केली. तीं दोन्ही नगरें धनांच्या व रत्नांच्या राशींनीं भरलेलीं होतीं; वनांच्या योगानें त्यांना शोभा आलेली होती; प्रत्येकाचे ठिकाणीं पुष्कळच चांगल्या चांगल्या गोष्टी असल्यामुळें स्पर्धेनें तीं नगरें एकमेकांवर ताणच करीत आहेत कीं काय असा भास होत होता; तीं नगरें निष्कपट व्यवहारामुळें फारच मनोहर भासूं लागलीं होतीं; उपवनें व वाहनें ह्यांनीं तीं गजबजून गेलेलीं होतीं; त्यांतील दुकानें एकमेकांपासून विलग होतीं; तीं मोठीं रम्य असून असंख्य उत्कृष्ट वस्तूंनीं सुशोभित होतीं; अत्यंत मनोहर अशा सात सात मजली उत्कृष्ट इमारतींनीं तीं व्याप्त झालेलीं होतीं; शोभा आणणाऱ्या विशाल देवालयांनींही तीं सुशोभित झालेलीं होतीं; आणि ताल, तमाल व बकुल ह्या वृक्षांनींही तीं रमणीय दिसत होतीं. असो.

अशीं नगरें पांच वर्षांमध्यें वसवून भरत पुनरपि अयोध्येला परत आला. नंतर, ब्रह्मदेवाला वंदन करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्या श्रीमान भरतानें प्रत्यक्ष दुसरा मूर्तिमान धर्मच कीं काय अशा त्या महात्म्या रामाला अभिवंदन केलें; गंधर्वांचा अनुपम वध व देशामध्यें नगरांची स्थापना ह्या संबंधानें इत्थंभूत वर्तमान त्याला कळविलें; आणि तें श्रवण करून राम त्याच्यावर प्रसन्न झाला.

## सर्ग एकशें दुसरा.

—:०:—

### लक्ष्मणकुमारांना अभिषेक.

नंतर, संतुष्ट झालेला राम भ्रात्या लक्ष्मणाला म्हणाला, "हे सुमित्रानंदना, हे तुझे पुत्र अंगद व चंद्रकेतु धर्मशास्त्रांमध्यें निपुण व महापराक्रमी असून राज्य चालविण्यास योग्य आहेत. मी ह्यांना राज्याभिषेक करितों. ह्यांना योग्य असा चांगला देश तूं पहा. तो रमणीय असावा, आणि त्यांत कसलीही पीडा नसावी; म्हणजे हे धनुर्धारी त्या ठिकाणीं सुखानें राहतील. ज्या ठिकाणीं राजांना उपसर्ग लागणार नाहीं, व आश्रमांचा नाश होणार नाहीं, असा प्रदेश तूं पहा."

ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां भरत म्हणाला, "हा कारुपथसंज्ञक देश मोठा रमणीय असून व्याधिरहित आहे. ह्या ठिकाणीं महात्म्या अंगदानें एक नगर वसवावें, आणि चंद्रकेतूकरितां आरोग्यसंपन्न व मनोहर असें चंद्रकांत नगर वसवावें."

भरताचें हें म्हणणें रामानें मान्य केलें, व तो देश स्वाधीन करून घेतला. नंतर, निर्मल आचरण करणाऱ्या रामानें रमणीय व स्वभावतःच सुरक्षित अशी अंगदीया म्हणून रम्य नगरी अंगदाकरितां

वसविली, आणि शरिरानें दृढ असलेल्या चंद्रकेतूकरितां दिव्य अमरावती नगरीच कीं काय अशी चंद्रकांता म्हणून विख्यात असलेली नगरी त्यानें मल्लभूमीमध्यें वसविली. तदनंतर, युद्धामध्यें हार न जाणाऱ्या रामाला, लक्ष्मणाला व भरताला आनंद झाला, आणि त्यांनीं त्या उभयतांना राज्याभिषेक केला. उभयतां कुमारांना राज्याभिषेक करून त्यांनीं त्या विचारी कुमारांपैकीं अंगदाला पश्चिमदेशाकडे व चंद्रकेतूला उत्तरप्रदेशाकडे पाठविलें. सुमित्रानंदन लक्ष्मण अंगदाच्या मागोमाग गेला, आणि भरत चंद्रकेतूच्या मागून गेला. लक्ष्मण अंगदीया नगरीमध्यें एक वर्ष राहिला, व आपल्या अजिंक्य पुत्र अंगदाचें स्थिरस्थावर झाल्यानंतर तो अयोध्येला परत आला. त्याचप्रमाणें भरतही चंद्रकेतूसमीप आणखी एक वर्ष राहिला, व पुनरपि अयोध्येला परत येऊन तो रामचंद्राची सेवा करूं लागला. रामचरणांची शुश्रूषा करण्याविषयीं तत्पर असलेल्या उभयतां अति धर्मनिष्ठ लक्ष्मणभरतांना दीर्घ काल लोटलेलाही प्रेमामुळें अल्प भासूं लागला. ह्याप्रमाणें, धर्म व लोककार्य ह्यांविषयीं सर्वदा तत्पर असलेल्या त्या भ्रात्यांचीं दहा हजार वर्षें लोटलीं. सारांश, अयोध्येमध्यें चिरकाल क्रीडा करून कृतकृत्य झालेले ते वैभवसंपन्न त्रिवर्ग भ्राते इंधनयुक्त, आहुतिमुळें उज्ज्वल तेज प्राप्त झालेल्या, व द्रव्यांनीं युक्त झालेल्या महायज्ञांतील तीन अग्नींप्रमाणें उत्कृष्ट रीतीनें शोभूं लागले!

## सर्ग एकशें तिसरा.

—:०:—

### कालाचें श्रीरामाकडे आगमन.

राम धर्माविषयीं तत्पर होऊन वागत असतांना इतका काळ लोटल्यानंतर, काल हा तपस्व्याच्या रूपानें राजद्वारासमीप आला आणि म्हणाला, " मी अतिबलाढ्य व महातेजस्वी महर्षींचा महाबलाढ्य दूत कांहीं कार्याच्या उद्देशानें रामाची भेट घेण्याकरितां येथें आलों आहें. "



त्याचें भाषण श्रवण करून सुमित्रापुत्र लक्ष्मणानें तो तापस आल्याचें रामाला सत्वर निवेदन केलें; तो म्हणाला, " रामा, राजनीतीमुळें तूं दोन्ही लोक संपादन कर. सांप्रत, तपश्चर्येच्या योगानें सूर्यतुल्य तेजस्वी असा एक दूत आपली भेट घेण्याकरितां आला आहे. "

लक्ष्मणाचें हें भाषण श्रवण करून, 'त्या महातेजस्वी मुनीला आंत येऊं दे ' असें रामानें सांगितलें असतां, ' होय ' असें म्हणून लक्ष्मणानें त्या मुनीला आंत आणिलें. किरणांनीं ताप देत असलेल्या सूर्याप्रमाणें तो मुनि तेजाच्या योगानें जसा कांहीं प्रज्वलितच दिसत होता. असो. आपल्या तेजानें झळकत असलेल्या रघुवंशजश्रेष्ठ रामाकडे तो मुनि आला, आणि " तुझा अभ्युदय असो " असें मधुर वाणीनें रामाला म्हणाला. तेव्हां महातेजस्वी रामानें त्याचें अर्घ्यपूर्वक पूजन करून ' निष्प्रतिबंध कुशल आहे ना ? ' म्हणून त्याला विचारलें.

ह्याप्रमाणें रामानें कुशलप्रश्न केला असतां, वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तो महायशस्वी मुनि सुवर्णनिर्मित सिंहासनावर बसला. तेव्हां राम त्याला म्हणाला, " हे महामते, आपलें स्वागत असो. ज्यांच्याकडून आपण दूत ह्या नात्यानें आलां आहां, त्यांचें म्हणणें मला कळवा. "

ह्याप्रमाणें रामानें निरोप कळविण्याविषयीं विनंती केली असतां तो मुनि म्हणाला, " तुला जर हित होण्याची इच्छा असेल, तर तूं आणि मी असे दोघेच असतांना एकांतामध्यें हा निरोप सांगावयाचा आहे. जो कोणी आपलें भाषण श्रवण करील अथवा आपल्याकडे पाहील, त्याचा तुझ्या हातून वध झाला पाहिजे. हें जर तुला कबूल असेल, तर त्या श्रेष्ठ मुनींचें म्हणणें तुला विदित होईल. "

ह्यावर ' ठीक आहे ' असें सांगून राम लक्ष्म-

णाला म्हणाला, " लक्ष्मणा, द्वारपाल दूर करून तूं द्वाराशीं उभा रहा. ऋषि व मी ह्या उभयतांचें भाषण चाललें असतांना जो श्रवण करील, अथवा अवलोकन करील, त्याचा खरोखर मी वध करीन."

अशा प्रकारें, आज्ञेला अनुसरून वागणाऱ्या लक्ष्मणाची द्वाराचे ठिकाणीं योजना केल्यानंतर राम त्याला म्हणाला, " हे मुने, आपण काय तें कथन करावें. ज्यांनीं आपणांला पाठविलें आहे, त्यांचा इष्ट निरोप ऐकण्याची इच्छा माझ्याही मनांत उत्पन्न झाली आहे. ह्यास्तव, आपण काय असेल तें निःशंकपणें कथन करावें."

## सर्ग एकशें चौथा

—:०:—

### ब्रह्मसंदेशकथन.

तो मुनि म्हणाला:—राजा, मी कशाकरितां आलों आहें हें तूं ऐक. हे महाबलाढ्य, पितामह ब्रह्मदेवानें मला पाठविलें आहे. हे शत्रुसमूहविजयी वीरा, तुझ्या पूर्वावस्थेंतील मी तुझा पुत्र आहें, व सर्वांचा संहार करणारा मी काल मायेच्या योगानें उत्पन्न झालों आहें. त्रैलोक्याधिपति प्रभु ब्रह्मदेवाचा तुला निरोप आहे, तो असा—हे सौम्य, लोकांचें रक्षण करण्याकरितां भूलोकीं वास्तव्य करण्याविषयीं आपण केलेली कालमर्यादा समाप्त झालेली आहे. पूर्वी मायेच्या योगानें लोकांचा संहार करून आपण महासागरामध्यें निद्रिस्थ असतांना मला उत्पन्न केलें आहे. प्रथमतः, भव्य फणांनीं युक्त व उदकामध्यें शयन करणारा तो अनंत नाग आपण मायेनें उत्पन्न केल्यावर, मधु व कैटभ असे दोन महाबलाढ्य प्राणी आपण उत्पन्न केले; त्यांच्या अस्थिराशींनीं ही भूमि व्याप्त झाली, आणि ही पर्वतांनीं व्याप्त होऊन मेदिनी ह्या संज्ञेस पात्र झाली. नाभीपासून उत्पन्न केलेल्या सूर्यतुल्य दिव्य कमलाचे ठिकाणीं मला उत्पन्न करून सृष्टि उत्पन्न करण्याचें सर्व काम आपण मजवर सोपविलें. ह्याप्रमाणें आपण माझ्यावर सृष्टीचा भार टाकिला असतां आपणां जगदीशांपाशीं मी आलों, आणि " ज्या अर्थी मला आपण तेज दिलें आहे, त्या अर्थी भूतांचें रक्षण आपण करा " अशी मीं आपली प्रार्थना केली. तेव्हां त्या सनातन असह्य रूपापासून तुम्हीं भूतांचें रक्षण करण्याकरितां विष्णुत्व स्वीकारलें; आणि भ्रात्यांचें वीर्य वृद्धिंगत करणारे आपण अदितीचे ठिकाणीं वीर्यवान पुत्राच्या रूपानें उत्पन्न झालां असून, समय उपस्थित झाल्यास त्या भ्रात्यांना साहाय्यही करीत असतां. हे श्रेष्ठ, प्रजा उच्छिन्न होऊं लागल्यामुळें रावणाचा वध करण्याच्या उद्देशानें आपण मानवांमध्यें अवतीर्ण होण्याचें मनांत आणिलें. सारांश, पूर्वी स्वतःच अकरा हजार वर्षेपर्यंत मनुष्यांमध्यें वास्तव्य करण्याचा निश्चय करून तुम्ही मनुष्यांमध्यें अवतीर्ण होण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें आपल्या इच्छेला अनुसरून आपण मनुष्यांमध्यें येथें पुत्रत्व स्वीकारलें, आणि आपल्या संकल्पाप्रमाणें आपली आयुर्मर्यादाही पूर्ण झाली. आतां, हे नृपश्रेष्ठ, देवांसमीप आपण येण्याचा समय प्राप्त झाला आहे इतकें सुचविणें हें आमचें कर्तव्य आहे. आतां, हे महाराज, येथें राहून प्रजेचें रक्षण करण्याची जर अजूनही आपली इच्छा असेल, तर आपलें देव बरें करो, हे वीर, आपण येथेंच वास्तव्य करावें; अथवा, देवलोकीं येण्याची जर आपली इच्छा असेल, तर विष्णुरूप नाथ प्राप्त झाल्यामुळें देव सनाथ होऊन निश्चित होतील. रामा, असा ब्रह्मदेवानें आपणांस निरोप सांगितला आहे.

कालानें सांगितलेला हा ब्रह्मदेवाचा निरोप श्रवण करून राम त्या सर्वनाशक कालाला हंसत हंसत म्हणाला, " देवाधिदेव ब्रह्मदेवाचें अत्यंत अद्भुत भाषण श्रवण केल्यामुळें आणि तुझें आगमन झाल्यामुळें, मला मोठा

आनंद झाला आहे. तिन्ही लोकांच्या कार्याकरितां ज्या अर्थी माझा अवतार आहे, त्या अर्थी, मी जेथून आलों तेथें जाण्यास आतां तयार आहें. तुझें आगमन मीं मनामध्यें चिंतिलेलेंच होतें; त्या संबंधानें मला आतां विचार करण्याचें कारण नाहीं. हे सर्वनाशक काला, माझ्या अधीन असलेल्या देवांच्या सर्व कृत्यांमध्यें मी असणें अवश्य आहे. ह्यास्तव, ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें मी तिकडे येतों."

## सर्ग एकशें पांचवा.

—:०:—

### कालरामसंवादसमयीं दुर्वास ऋषींचें आगमन!

ह्याप्रमाणें त्यांचा संवाद चालला असतांना रामाच्या दर्शनाकरितां दुर्वास मुनि राजद्वाराशीं आले; आणि 'माझ्या कार्याचें अतिक्रमण होऊं नये एतदर्थ रामाची व माझी तूं सत्वर भेट कर' असें लक्ष्मणाला म्हणाले.

दुर्वास मुनींचें हें भाषण श्रवण करून लक्ष्मणानें त्या महात्म्यांना अभिवंदन केलें आणि म्हटलें, "भगवन्, आपलें काय कार्य आहे तें सांगावें. कोणतें कार्य करण्याविषयीं मला आपली आज्ञा आहे? ब्रह्मन्, राम कांहीं कार्यामध्यें व्यग्र आहे. ह्यास्तव, आपण एक मुहूर्तपर्यंत वाट पहावी."

हें श्रवण करितांक्षणीं ऋषिश्रेष्ठ दुर्वास मुनींची मुद्रा क्रोधानें कलुषित झाली, आणि दृष्टीनें दग्धच करीत आहेत कीं काय अशा रीतीनें लक्ष्मणावर डोळे वटारून त्याला ते म्हणाले, "हे सुमित्रानंदना, ह्या क्षणीं मी आल्याचें तूं रामाला निवेदन कर. नाहीं तर तुला, अयोध्या नगरीला, ह्या देशाला आणि रामालाही मी शाप देईन; इतकेंच नव्हे, तर भरताला व तुमच्या संततीलाही मी शाप देईन! क्रोध दाबून ठेवण्यास मी समर्थ नाहीं!"

त्या महात्म्याचें हें भयंकर भाषण श्रवण करून, त्याचा परिणाम लक्ष्मणानें मनामध्यें आणिला, आणि "मला एकाला मरण आलें तरी चिंता नाहीं; परंतु सर्वांचा नाश होणें उचित नव्हे" असा निश्चय करून त्यानें ते मुनि आल्याचें रामाला निवेदन केलें. लक्ष्मणाचें भाषण श्रवण करितांक्षणीं रामानें कालाला जाण्याची अनुज्ञा दिली, आणि त्वरेत्वरेनें बाहेर येऊन आत्रिपुत्र मुनींचें त्या राजानें दर्शन घेतलें. नंतर, तेजानें झळकत असलेल्या त्या महात्म्यांना अभिवंदन करून व हात जोडून "काय आज्ञा आहे?" असा रामानें प्रश्न केला. तेव्हां रामानें केलेला तो प्रश्न श्रवण करून मुनिश्रेष्ठ समर्थ दुर्वास रामाला म्हणाले, "धर्मवत्सला रामा, हे राघवा, हजार वर्षेपर्यंत, मीं स्वीकारलेल्या अनशनरूप व्रताची आज समाप्ति झाली आहे. ह्यास्तव, हे निष्पापा, जें तयार असेल तें भोजन स्वीकारण्याची माझी इच्छा आहे."

हें भाषण श्रवण केल्यानंतर रामाच्या मनाला संतोष झाला; त्यानें त्या मुनिश्रेष्ठांना सिद्ध असलेलें अन्न भोजनार्थ अर्पण केलें; आणि तें अमृततुल्य अन्न भक्षण केल्यानंतर "रामा, तुझी धन्य आहे" इतकें बोलून ते मुनि आपल्या आश्रमाला परत गेले. परंतु कालानें उच्चारलेल्या शब्दांचें स्मरण झाल्यामुळें रामाला मात्र दुःख झालें; दुःखानें अतिशय संतप्त होऊन त्यानें त्या शब्दांचा घोर परिणाम लक्ष्यांत आणिला; तो खिन्न होऊन अधोमुख झाला; व त्याच्या तोंडांतून शब्दही निघेनासा झाला. तदनंतर, कालानें उच्चारलेल्या शब्दांचा परिणाम त्यानें पुनरपि मनामध्यें आणिला, आणि "हें सर्व नाहींसें होणार" असा मनांत निश्चय करून तो महायशस्वी राम स्वस्थ उभा राहिला!

# सर्ग एकशें सहावा.

—:०:—

## लक्ष्मणविसर्जन.

राहूनें ग्रस्त केलेल्या चंद्राप्रमाणें दीन व अधोमुख झालेल्या रामाला अवलोकन करून लक्ष्मण आनंदित झाला, आणि मधुर स्वरानें रामाला म्हणाला, "हे महापराक्रमी रामा, माझ्याकरितां आपण काळजी करूं नका; अशा प्रकारची कालगति पूर्वसंचितानें ठरलेलीच आहे. हे सौम्य, माझा निःशंकपणें वध करून तूं प्रतिज्ञेचें परिपालन कर. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, भ्रष्टप्रतिज्ञ पुरुष नरकामध्यें पडतात. हे महाराज, माझे ठिकाणीं जर आपलें प्रेम असेल, व माझ्यावर जर आपली कृपादृष्टि असेल, तर निःशंकपणें माझा वध करून आपण धर्माचें रक्षण करावें."

लक्ष्मणानें ह्याप्रमाणें भाषण केलें असतां रामाचें मन क्षुब्ध झालें; आणि मंत्री व पुरोहित ह्यांना बोलावून आणून, दुर्वास मुनींचें आगमन व आपण तपस्व्याशीं केलेली प्रतिज्ञा हें वर्तमान त्यानें त्यांना कथन केलें. हें श्रवण करून, उपाध्यायांसहवर्तमान सर्व मंत्री स्वस्थ बसले; परंतु महातेजस्वी वसिष्ठ म्हणाले, "हे महापराक्रमी व महायशस्वी रामा, हा शरिरावर रोमांच उठविणारा क्षय होणार असून लक्ष्मणाशीं तुझा वियोग होणार हें मला समजून चुकलें आहे! ह्यास्तव, काल अनुल्लंघनीय असल्यामुळें तूं ह्या लक्ष्मणाचा त्याग कर; आपली प्रतिज्ञा व्यर्थ करूं नको. कारण, प्रतिज्ञा भ्रष्ट झाल्यास धर्माचा लय होईल; आणि धर्माचा लय झाला असतां देवगण व ऋषिगण ह्यांसहवर्तमान सर्व स्थावरजंगमात्मक त्रैलोक्याचा नाश होईल. ह्यास्तव, हे पुरुषश्रेष्ठा, लक्ष्मणाच्या वियोगानें त्रैलोक्याचें रक्षण करून तूं जगत् स्वस्थ कर."

ह्याप्रमाणें एकत्र जुळलेल्या त्या सभासदांचें धर्म व अर्थ ह्यांना अनुसरून असलेलें भाषण श्रवण करून राम सभेमध्यें लक्ष्मणाला म्हणाला, "लक्ष्मणा, धर्महानि होऊं नये एतदर्थ मी तुझा त्याग करितों. कारण, त्याग आणि वध हे दोन्ही साधूंनीं सारखेच मानिले आहेत."

रामानें असें भाषण करितांक्षणींच लक्ष्मणाचे नेत्र अश्रूंनीं व्याकुल झाले, व तो स्वगृहीं न जातां त्वरेत्वरेनें सरयूचे तीरीं गेला. तेथें गेल्यावर त्यानें स्नान केलें; हात जोडून सर्व इंद्रियांचें संयमन केलें; व तो श्वासही सोडीनासा झाला. ह्याप्रमाणें श्वासोच्छ्वास न सोडितां समाधि लावून बसलेल्या त्या लक्ष्मणावर इंद्र, अप्सरांचे समुदाय व ऋषिगण ह्यांसहवर्तमान सर्व देवांनीं पुष्पवृष्टि केली! कोणत्याही मनुष्याच्या दृष्टोत्पत्तीस न येतां देहासहवर्तमान महाबलाढ्य लक्ष्मणाला घेऊन इंद्र स्वर्गलोकीं गेला; विष्णूचा चतुर्थांश परत आल्याचें पाहून सुरश्रेष्ठांना आनंद व हर्ष झाला; आणि ते सर्व राघवाची प्रशंसा करूं लागले.

# सर्ग एकशें सातवा.

—:०:—

## कुशलवांना अभिषेक आणि शत्रुघ्नाला निमंत्रण

लक्ष्मणाचा त्याग केल्यानंतर दुःख व शोक ह्यांनीं व्याप्त झालेला राम पुरोहित, मंत्री व पौरजन ह्यांना म्हणाला, "धर्मवत्सल वीर भरताला मी आज अयोध्याधिपति म्हणून राज्याभिषेक करीन, आणि नंतर वनांत जाईन. ह्यास्तव, तुम्ही राज्याभिषेकाला लागणारें साहित्य विलंब न करितां घेऊन या. लक्ष्मणानें स्वीकारलेल्या मार्गाचें मी आजच अवलंबन करणार आहें."

रामाचें हें भाषण श्रवण करून सर्व प्रजाजनांनीं आपलीं मस्तकें भूमीवर अतिशय नम्र केलीं, आणि गतप्राण झाल्याप्रमाणें ते निश्चेष्ट झाले. भरतालाही रामाचें भाषण श्रवण करून कांहीं

पुत्रेनासे झालें, आणि राज्याची निंदा करून तो म्हणाला, "राजा, हे रघुनंदना, तुला सोडून राज्याची अथवा स्वर्गसुखाची मला अपेक्षा नाहीं हें मी शपथपूर्वक सत्य सांगतों. हे प्रजाधिपते, कोशल देशामध्यें वीर कुश आणि उत्तरकोशलामध्यें लव ह्याप्रमाणें ह्या कुशलवांना आपण राज्याभिषेक करा, आणि शीघ्र गमन करणाऱ्या दूतांनीं शत्रुघ्नाकडे जाऊन ह्या आपल्या गमनाविषयीं विलंब न करितां त्याला सत्वर कळवूं द्या."

भरताचें हें भाषण श्रवण करून व प्रजाजन दुःखानें संतप्त झाल्यामुळें अधोमुख झाले आहेत असें पाहून वसिष्ठ मुनि म्हणाले, 'वत्सा रामा, भूमीवर पडलेल्या ह्या प्रजाजनांकडे लक्ष्य दे, आणि ह्यांना कोणतें कार्य इष्ट आहे तें समजून घेऊन त्याप्रमाणें कर. तूं ह्यांच्या इच्छेचा विघात करूं नको.'

वसिष्ठ मुनींच्या ह्या भाषणावरून रामानें प्रजाजनांना उठविलें, आणि 'मी काय करूं' असा त्यांना प्रश्न केला. तेव्हां ते सर्व प्रजाजन म्हणाले, "रामा, तूं जिकडे जाशील तिकडे तुझ्या मागोमाग आम्ही येऊं. प्रजाजनांवर जर तुझी प्रीति असेल, ह्यांच्यावर तुझें जर अनुपम प्रेम असेल, आणि आमचा जर तुला त्याग करावयाचा नसेल, तर पुत्र व भार्या ह्यांसहवर्तमान आम्ही स्वर्ग, तपोवन, दुर्गम अरण्य, नदी आणि सागर ह्यांपैकीं जिकडे तूं जाशील तिकडे तुझ्या बरोबरच येऊं. हे ईश्वरा, तूं आम्हां सर्वांना घेऊन चल. ह्यांत आम्हांला पराकाष्ठेचा आनंद होणार असून हाच आमचा मुख्य वर आहे. सारांश, राजा, तुझ्याबरोबर येण्याविषयीं सर्वदा आमच्या मनाला आनंद वाटत आहे."

प्रजाजनांची ही दृढ भक्ति अवलोकन करून रामानें आपल्या कर्तव्याचा परिणामही लक्ष्यांत आणिला; त्याच दिवशीं त्या कोसल देशामध्यें वीर कुश व उत्तरकोसल देशामध्यें लव ह्याप्रमाणें त्या उभयतां महात्म्या कुशलवांना राज्याभिषेक केला; अभिषेक केल्यानंतर उभयतां पुत्र त्यानें आपल्या अंकावर बसविले; नंतर हजारों रथ, दहा दहा हजार गजांचे समुदाय, व दहा हजार अश्व इतकें धन प्रत्येकाला देऊन त्या उभयतांना त्यानें त्यांच्या नगरांकडे पाठविलें; आणि तुष्ट व पुष्ट जनांना आश्रयभूत अशा भ्रात्या कुशलवांना त्यानें आपल्या नगरामध्यें पाठविल्यावर महात्म्या शत्रुघ्नाकडे त्यानें दूत रवाना केले.

## सर्ग एकशें आठवा.

--:०:--

### शत्रुघ्नाचें आगमन.

रामाची आज्ञा झालेले ते शीघ्रगामी दूत मार्गामध्यें वास्तव्य न करितां सत्वर मधुरा नगरीमध्यें गेले; आणि ह्याप्रमाणें तीन अहोरात्रांत मधुरा नगरीला गेल्यानंतर त्या सर्व दूतांनीं शत्रुघ्नाला तें इत्थंभूत वर्तमान कळविलें. लक्ष्मणाचा परित्याग, रामाची प्रतिज्ञा, पुत्रांना झालेला अभिषेक, व मागोमाग जाण्यासंबंधानें प्रजाजनांची दृढ भक्ति निवेदन करून ते म्हणाले, "विचारी रामानें विंध्य पर्वतासमीप कुशावती म्हणून रम्य नगरी कुशाकरितां केली आहे; श्रावस्ती म्हणून एक रम्य नगरी लवाकरितां तयार करून त्यानें विख्यात केली आहे; आणि अयोध्या जनरहित करून महारथि राम व भरत स्वर्गगमनाच्या उद्योगाला लागले आहेत."

ह्याप्रमाणें महात्म्या शत्रुघ्नाला सर्व निवेदन करून ते दूत स्वस्थ राहिले, आणि "राजा, त्वरा कर" असें पुनरपि म्हणाले.

उपस्थित झालेल्या घोर कुलक्षयासंबंधानें दूतांनीं केलेलें तें भाषण श्रवण करून रघुनंदन शत्रुघ्नानें मंत्री व कांचन नामक पुरोहित ह्यांना बोलावून आणिलें, आणि भ्रात्यांसहवर्तमान आपल्या दे-

ह्याचा होणारा वियोग व इतरही सर्व इत्थंभूत वर्तमान त्यानें त्यांना कळविलें. नंतर त्या प्रजाधिपति वीर शत्रुघ्नानें आपल्या दोन पुत्रांना राज्याभिषेक केला. तेव्हां सुबाहूला मधुरा नगरी मिळाली, व शत्रुघातीला वैदिश नगर प्राप्त झालें; असो. पुत्रांना राज्याभिषेक केल्यानंतर शत्रुघ्नानें मधुरा नगरीमध्यें असलेली ती सेना दोन भाग करून दोन पुत्रांना वांटून दिली; धनाचाही योग्य विभाग करून त्या राजानें त्यांची स्थापना केली; आणि मधुरेमध्यें सुबाहूला व वैदिश नगरामध्यें शत्रुघातीला स्थापल्यानंतर तो फक्त एक रथ बरोबर घेऊन अयोध्येला गेला, तों अग्नीप्रमाणें उज्वल आणि बारीक रेशमी वस्त्र धारण केलेला महात्मा राम सनातन मुनींसहवर्तमान बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. नंतर त्यानें रामाला अभिवंदन केलें, आणि धर्माचें चिंतन करीत असलेला तो जितेंद्रिय शत्रुघ्न हात जोडून धर्मवेत्त्या रामाला म्हणाला, "हे रघुनंदना राजा, दोन पुत्रांना राज्याभिषेक करून आपल्या बरोबर येण्याविषयीं मीं निश्चय केला आहे असें आपण समजा. बरोबर येण्याशिवाय मला आज आपण दुसरी कांहींएक आज्ञा करूं नका. हे वीर, विशेषतः माझ्यासारख्याच्या हातून आपल्या आज्ञेचा भंग व्हावा अशी माझी इच्छा नाहीं"

## निरवानिरव.

शत्रुघ्नाचा हा यथार्थ निश्चय जाणून रघूत्तम राम "ठीक आहे" असें म्हणाला, इतक्यांत यथेष्ट रूप धारण करणारे ते वानर आणि ऋक्ष व राक्षस ह्यांचे अनेक गण उड्या टाकीत तेथें आले. स्वर्गलोकीं गमन करण्यास सिद्ध असलेल्या रामाचें दर्शन घेण्याकरितां सुग्रीवाला पुढें करून ते सर्व वानर आले. नंतर, रामाचें भूतलावरील वास्तव्य संपूर्ण झालें असें समजल्यावर देवपुत्र, ऋषिकुमार व गंधर्वनंदन हे सर्व तेथें आले आणि म्हणाले, "राजा, तुझ्याबरोबर जाण्याकरितां आम्ही जुळून येथें आलों आहों. हे पुरुषश्रेष्ठा, आम्हांला सोडून जर तूं जाशील, तर यमदंड उगारून तूं आमचा वधच केल्यासारखें होईल!"

हें त्यांचें बोलणें चाललें आहे तों महाबलाढ्य सुग्रीवही रीतीप्रमाणें त्या वीरांना वंदन करून प्रार्थना करण्यास तयार झाला: तो म्हणाला, "हे प्रजाधिपते, वीर अंगदाला अभिषेक करून मी आलों आहें. राजा, तुझ्याबरोबर येण्याविषयीं माझा निश्चय झाला आहे असें तूं समज."

ह्याप्रमाणें त्यानें विनंती केली असतां राम 'ठीक आहे' असें हंसत हंसत म्हणाला; आणि नंतर राक्षसराज बिभीषणाला तो महायशस्वी राम म्हणाला, "बिभीषणा, हे महावीर्यवान राक्षसाधिपते, जोंपर्यंत भूतलावर प्रजा आहे, तोंपर्यंत लंकेमध्यें राहून तूं आपला देह धारण कर. सूर्य, चंद्र व पृथ्वी हीं जोंपर्यंत आहेत, आणि जोंपर्यंत जगतामध्यें माझी कथा प्रचलित आहे, तोंपर्यंत तेथें तुझें राज्य असो. मित्रत्वानें मीं तुला आज्ञा केली आहे, व तूं माझ्या आज्ञेप्रमाणें वागणें अवश्य आहे. तूं धर्मानें प्रजेचें रक्षण कर. ह्यावर कांहींएक उत्तर करूं नको. शिवाय, हे महाबलाढ्य राक्षसराज, इक्ष्वाकूंचें कुलदैवत जो जगन्नाथ, त्याचें तूं आराधन कर; इंद्रासहवर्तमान देवही त्याचें नेहमीं आराधन करीत असतात; इतकेंच तुला सांगून ठेवण्याचें माझ्या मनांत आहे."

ह्या रामाच्या आज्ञेकडे लक्ष्य देऊन बिभीषणानें 'आज्ञा' असें म्हणून रामाचें म्हणणें मान्य केलें.

ह्याप्रमाणें बिभीषणाला सांगितल्यानंतर राम हनुमानाला म्हणाला, "जिवंत राहण्याविषयीं तूं निश्चय केला आहेस. ह्यास्तव, तूं आपली प्रतिज्ञा व्यर्थ करूं नको. हे वानराधिपते, जोंपर्यंत जगतामध्यें माझ्या कथा प्रचलित राहतील,

